# सोऽहम्

## एक संदेशवाहक

ऋषिकेश कानडे

टीप: आजपासून तुमच्या आयुष्यात घडणाऱ्या घटना लक्षात ठेवा.

कदाचित, त्यावर एखादे पुस्तक लिहिले जाऊ शकेल.

ई साहित्य प्रतिष्ठान

सोहम – एक संदेश वाहक

लेखक : ॠषिकेश कानडे

मोबाईल : 7385414077

ई मेल :  hrishikesh.kanade@yahoo.in



प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : २६ जुलै २०१६

# ई साहित्य प्रतिष्ठान

मित्रहो , सहजासहजी फुकट काहीच मिळत नाही. न आरोग्य न धन न संपदा. काहीही मिळवायचं तर संघर्ष आणि श्रम करावेच लागतात. “गोलमाल” करून, मेकओव्हर सर्व काही मिळवता येतं असा गैरसमज माध्यमांद्वारे सर्वत्र पसरवला जात आहे. झटपट श्रीमंती, आठ दिवसांत गोरेपणा, महिन्याभरात लांबसडक केस, एक हनुमान यंत्र गळयात बाधले की आजारांपासून मुक्ती अशा जाहिराती माथी मारल्या जात आहेत. अशा वेळी अर्थपूर्ण पुस्तकं वाचून माणूस “जमिनीवर” येतो. फुकट काहीच मिळत नसतं. प्रत्येक गोष्टीसाठी कुणाला न कुणाला कष्ट पडतात. कधी आपल्याला, कधी आपल्या आईवडलांना, गुरूंना, तर कधी समाजातील इतरांना.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तकं विनामूल्य मिळतात. पण ती लिहिण्यासाठी लेखकांचे कष्ट व बुद्धी लागलेले असतात. आणि या एकेका पुस्तकाची किंमत म्हणुन लेखक हजारो लाखो रुपये मिळवू शकतात. पण मराठी वाचकांना विनामूल्य पुस्तकं मिळावी, व मराठीत वाचन संस्कृती वाढावी म्हणून असंख्य लोक प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांत ई साहित्य प्रतिष्ठान व हे सर्व लेखक सहभागी आहेत. आपण या अभियानात सहभागी झालात का?

आपण ई साहित्य प्रतिष्ठानचे VIP सभासद झालात का?

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे.

आपल्या ओळखीच्या दहा मराठी लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन कामं.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

अधिक माहितीसाठी, आम्ही कोण ते जाणून घेण्यासाठी एकदातरी www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठा

"दरम्यान याच टेंशनमध्ये, सोहमचे ऑफिसमधल्या एका व्यक्तीसोबत भांडण झाले. ते थेटपणे सोहमला काहीच बोलले नाहीत. पण सोहमला उद्देशून, त्याच्या शेजारी बसलेल्या व्यक्तीला म्हणाले **"आधी चारित्र्यावर लागलेले डाग मिटव आणि मग भांड".**

त्याच दिवशी तो माझ्याकडे प्रस्ताव घेऊन आला.

मागे ऑफिसमधली हीच व्यक्ती म्हणाली होती, तुला येणारे अनुभव कुठेतरी लिहून ठेव. पुढे उपयोगी पडतील.

कोण होते ते? देव तर नव्हते? त्यांना आधीपासून तर माहिती नव्हते, की सोहम पुढे जाऊन अशी गोष्ट लिहिणार आहे?. त्यांने मुद्दामहूनच तर सोहमला ही गोष्ट लिहिण्यासाठी प्रवृत्त तर केले नसावे?

**त्यांनाच माहिती.**

# सोऽहम्

## अनुक्रमणिका

**विशेष: थेट गोष्टच वाचू नका, आधी अनुक्रमणिका (लक्षपूर्वक) जरूर वाचा.**

**टीप: आजपासून तुमच्या आयुष्यात घडणाऱ्या घटना लक्षात ठेवा. कदाचित, त्यावर एखादे पुस्तक लिहिले जाऊ शकते.**


१. वाचकांसाठी खास पत्र.

२. गुरूंचे आभार.

३. सोहमचे माझ्याकडे प्रस्ताव घेऊन येणे, मी प्रस्ताव नाकारणे आणि नंतर स्वीकारणे. (गोष्ट इथूनच सुरु होते. ही प्रस्तावना नाहीये).

४. पुस्तक पूर्ण करण्यासाठी, मला मिळालेले देवाचे संकेत आणि अनुभव.

५. पहिल्यांदाच पुस्तक कसे लिहिले जाते? हा माझा अनुभव (लेखक बनायचे असेल, तर हा अनुभव नक्की वाचा. देव आपल्याला कशाप्रकारे मदत करतो? हे समजून येईल).

६. श्री विष्णूचे दशावतार

७. सोहमच्या आजोबांचे पुण्यात येणे, आई-बाबांचे लग्न, मोठ्या बहिणीचे निधन (स्वर्गवास)

८. सोहमचा जन्म आणि बालपण

९. इयत्ता तिसरी, चौथी आणि पाचवीतले पराक्रम

१०. वेडा संशोधक, इयत्ता सहावी, सातवीतले पराक्रम

११. इयत्ता आठवी, नववी, सोहमचे घरून पळून जाणे, बालाजीची आयुष्यातली एन्ट्री, शनी महाराजांचे प्रथमच आयुष्यात आगमन, पहिला प्रेमभंग

१२. शाखाबदल, कॉलेजचे पहिले आणि दुसरे वर्ष.

१३. गणिताने केलेली गोची आणि पुन्हा पहिले, दुसरे तिसरे आणि चौथे वर्ष, तीन-चार प्रेम प्रकरणे, पितरांचा संदेश.

१४. पुन्हा गणिताने केलेली गोची, पुन्हा ४ वर्षांचे शिक्षण, अजून काही प्रेम प्रकरणे (सोहमचे शाळेनंतर, एकूण १० वर्ष पुढे शिक्षण चालू असणे), सोहमची २४ मांजर, देवीची भेट, १३चा आकडा आयुष्यात येणे, कॅरेक्टरलेस प्रकरणाची सुरुवात, आपण संमोहित झाले असण्याची जाणीव होणे, सोहमचा मोबाईल हॅक होणे, एकाच प्रेमाचा ७-८ वेळा भंग.

१५. मांजरांचे मृत्यू, मांजरांना राम-दऱ्याला सोडून येणे, पहिली नोकरी, कॅरेक्टर प्रकरणाची वाढ, मोठ्या, श्रीमंत लोकांशी पंगा, जीवनमरणाच्या रेषेवर पोचणे

१६. १३च्या आकड्याने पिच्छा न सोडणे, राहू महादशा, शनी महाराजांची एन्ट्री, मुचकुंद राजाची गोष्ट, नाथद्वाराची माहिती, कालेश्वरमची माहिती (इथे एकाच मंदिरात दोन शिवलिंग आहेत), बद्रचलमची माहिती (श्री विष्णूच्या २४ अवतारांचे मंदिर, इथे देवाला रात्री पाळणा म्हणून झोपवले जाते, आणि त्या वेळेस सामान्य भक्तांना तिथे उपस्थित राहता येते), ६ महिन्यात ५ वेळा ख्वाजा, गरीब नवाजांने अजमेरला आणि ब्रम्हदेवाने पुष्करला बोलावणे, पुष्करची माहिती, ब्रम्हदेवाद्वारे गायत्री मंत्राची निर्मिती, स्वामी समर्थांची एन्ट्री, सोहमची साडे-साती, "मुली धोका देत नाहीत." मुली थोड्या भावनिक असतात एवढेच."

१७. आत्म्यांचे सोहमशी संपर्क साधणे, भीतीदायक स्वप्नांचा अर्थ, धोक्याची सूचना मिळणे, सलमान खानची एन्ट्री (हो, खराखुरा सलमान खान), भेट द्वारकेची माहिती.

१८. सोहमचे पहिले लग्न, राधेची भेट, ९ जुन्या गर्ल-फ्रेंड्स = नव दुर्गा, सीतेची भेट, १३ब चा उलगडा, श्री स्वामी समर्थांचे आगमन, सोहमचे अक्कलकोट्ला जाणे, शनी महात्म्य, सोहमचे संमोहनातून बाहेर निघणे, स्वसंमोहन, (self hipnotization), सहस्त्रनामाचे महत्व, करोडपती सोहम, ऑफिसमधले देव, गुरु महादशा, गुरूंचे आगमन, बालाजीचे लग्न, कालहस्तीची माहिती, शेवटी एकदाची मानसीशी भेट होणे, लग्न टाळण्यासाठी शनी महाराजांने संकेत देणे, सिद्धिविनायक, बालाजीचे लग्न, घर नंबर १३, सोहमचे दुसरे लग्न.

१९. सोहमने त्याच्या काही प्रिय व्यक्तींसाठी लिहिलेली पत्र (ही पत्र नक्की वाचा, मुख्य रहस्य या पत्रांमध्येच लपले आहे), शेवटचा धक्का (गुरु नानक).

## १. वाचकांसाठी खास पत्र

ज्या कोणालाही या गोष्टीतले रहस्य, सस्पेंस माहिती आहे. त्यांने कृपया, रहस्य इतरांना सांगू नये. सर्वांना पुस्तक वाचू द्यावे.

तर, प्रिय वाचकांनो,

आयुष्याची दिशा सापडत नाही का? देवामध्ये मन लागत नाही का? कधी कधी फार राग येतो का? रागाच्या भरात वाईट गोष्टी बोलून जाता का? बोलल्यानंतर पश्चाताप होतो का? मन फार हळवे झाले आहे का? कोणत्याच गोष्टीत रस वाटत नाही का? थोडासा अपमान झाला, की रडावेसे वाटते का? कधी कधी जीव द्यावासा वाटतो का? कोणाचे तरी आपल्यावर लक्ष आहे, कोणीतरी आपल्यावर पाळत ठेऊन आहे, असे वाटते का? बेडीमध्ये अडकल्यासारखे वाटते का? कोणीतरी आपल्याला संमोहित केले आहे, असे वाटते का? संमोहनामधून बाहेर पडावेसे वाटते का?

नक्की हे पुस्तक वाचा. सोहमसुद्धा असाच संमोहित झाला होता. त्याच्याबरोबरही असेच घडले होते. तुम्हाला ही गोष्ट समजावी, तुम्हीही संमोहनातून बाहेर पडावात, म्हणून हे लिहित आहे. तुम्ही नक्कीच संमोहनातून बाहेर पडू शकता. तुमचेही देवावर, प्राण्यांवर, भरपूर प्रेम आहे. हे प्रेम बाहेर पडू द्या.

जो कोणी ही गोष्ट पूर्ण वाचेल, त्याला त्याच्या पुढच्या आयुष्यात पावला-पावलावर, देवाची, सोहमची आणि माझी आठवण येत राहील. देवाच्या आपल्यावर असणाऱ्या कृपेचा अनुभव येत राहील. प्राण्यांविषयी मनात दया निर्माण होईल. जे कोणी या घडीला संमोहित झाले आहेत, ते संमोहनातून बाहेर येतील. आणि देवाची भक्ती करू लागतील.

गुरु नानकांना त्यांच्या आयुष्याची दिशा कशी सापडली? हे समजेल? स्वामी समर्थ, गोंदवलेकर महाराज काय म्हणून गेले आहेत? हे समजेल. देवाचा संदेश समजेल.

पण ही रहस्य समजण्यासाठी, गोष्ट पूर्ण वाचली तर गेली पाहिजे, नाही का? त्यासाठी, सोहमचे आयुष्य समजून घेतले पाहिजे, नाही का?

## २. गुरूंचे आभार

आज गुरुपोर्णिमा आहे. लहानपणी, कधीच गुरुपोर्णिमेचे महत्व समजले नाही. तसेच, गुरूंचे महत्व सुद्धा समजले नाही. शाळेत जेव्हा हुषार मुले स्टेजवर जाऊन, सरस्वती पूजन, व्यास पूजन करायची. तेव्हा आमचे लक्ष पेढ्याच्या आणि लाडूच्या प्रसादकडे असायचे. नेहमी वाटायचे "कधी संपणार हे सगळे? आणि कधी खेळायला मिळणार?" "कसे हळू हळू सरस्वती पूजन चालले आहे?" अरे लावा एकदाची समई आणि सोडा आम्हाला पटकन प्रसाद देऊन" असे आम्ही टवाळखोर मुले मनात म्हणायचो.

तसे, मी नेहमीच शाळेत, कॉलेजमध्ये, शेवटच्या बाकावर बसणारा मुलगा होतो. शिक्षकांना वेगळी वेगळी नावे ठेवण्यात, त्यांच्या एखाद्या लकबेचे, जाणून बुझून अनुकरण करण्यात, आम्ही नेहमीच पटाईत होतो. कोणी शिक्षक मारतात, फार कडक शिस्तीचे असून शिक्षा करतात, म्हणून ते हिटलर, कोणाची दाढी, खुदा गवाह सिनेमातल्या अमिताभ बच्चन सारखी आहे, म्हणून त्यांना खुदा गवाह, कोणी पी.टीच्या तासाला भरपूर व्यायाम करून घेते, म्हणून रिंग मास्टर. अशी, लहानपणी आम्ही शिक्षकांना नावे ठेवली होती. एखाद्या मॅडम कशा बोलतात, कशे हातवारे करतात, याचे वर्णन करणे म्हणजे ऑस्कर मिळाल्यासारखा वाटायचा लहानपणी.

पण आज जेव्हा आयुष्यात मागे वळून पहातो, गुरुजनांनी केलेले उपकार आठवतो. तेव्हा स्वत:चा राग येतो. पण, "देरसे आये पर दुरुस्त आये" म्हणतात ना? तसेच, काही काळाने का होईना पण, गुरूंचे महत्व मला आता समजू लागले आहे. कदाचित आयुष्याच्या या वळणावरच, गुरूंचे महत्व मला कळण्याचे प्रयोजन, देवानेच केले असावे.

शिक्षक जीव तोडून शिकवतात, कधी कधी शिक्षा सुद्धा करतात. मुली तशा जन्मत:च सिन्सिअर असतात. पण, मुले म्हणजे विचारूच नका. मुलांना वळण लावण्यासाठी, शिक्षकांना कधी कधी कठोर व्हावेच लागते. पण, आजकाल असे काही नवीन कायदे आले आहेत की, शिक्षकांचीच पोलीस कम्प्लेंट केली जाते. शिक्षकांने एखाद्या, माझ्यासारख्या मुलाला चांगले वळण लावावे की नाही?

तर हे पुस्तक, ही गोष्ट, माझ्या आत्तापर्यंतच्या सर्व गुरुंच्या चरणी अर्पण.

**३. सोहमचे माझ्याकडे प्रस्ताव घेऊन येणे, मी प्रस्ताव नाकारणे आणि नंतर स्वीकारणे. (गोष्ट इथूनच सुरु होते. ही प्रस्तावना नाहीये).**

तर साधारणपणे दोन वर्षाअगोदर, एका जवळच्या व्यक्तीने, तिच्या आयुष्यावर एक पुस्तक लिहिण्याचा माझ्यासमोर एक प्रस्ताव मांडला. पण, मी काही तो मनावर घेतला नव्हता. मी काही मोठा लेखक नाही. आणि मी सुद्धा माझ्या आयुष्यात इतका व्यस्त होतो, की असा कधी विचारच नव्हता केला. तसेच, पुस्तक लिहायचे म्हणले, तरी लिहिण्याचा दांडगा अनुभव नव्हता. मोठे मोठे अर्थपूर्ण शब्द माहिती नव्हते. कुठे कोणत्या म्हणीचा, वाक्याचा वापर करायचा? हे सुद्धा माहिती नव्हते. फक्त काही छोट्या, एक-दोन पानांच्या गोष्टी लिहिल्या होत्या. काही मित्र, मैत्रिणी (खास करून मैत्रिणी, कारण मुली तशा जास्त भावनिक असतात) म्हणायचे "यार, तुझ्या गोष्टी वाचून पाणी येत डोळयात".

एखादी २०० पान असणारी वही भरून जाईल, एवढंच माझं लेखन होत. एवढंच छोटस, माझं आत्तापर्यंतच यश. नेमकी, मी लिहिलेल्या कवितांची आणि गोष्टींची वही सुद्धा काही वर्षांअगोदर हरवली होती.

तर असो, ज्या व्यक्तीने माझ्यासमोर हा प्रस्ताव मांडला. ती सुद्धा अशीच एक, माझ्या गोष्टी आवडणारी व्यक्ती. पण, शेवटी मी त्या व्यक्तीचा प्रस्ताव नाकारला.

मी त्याला म्हणालो "यार सोहम, तू स्वत:सुद्धा चांगल्या गोष्टी, कविता लिहितोस की. मग तूच का हे पुस्तक नाही लिहित?"

तर, तो म्हणाला "अरे मित्रा, जर मी पुस्तक लिहिले, तर मी स्वत:बद्दल चांगले तेवढेच लिहील, वाईट लिहिणार नाही. आणि, एखाद्या तटस्थ, त्रयस्थ व्यक्तीने जर माझ्याबद्दल काही लिहिले, तर तो माझे आयुष्य व्यवस्थित समजून लिहू शकेल". रावणाने स्वत:ची गोष्ट लिहिली असती, तर त्याच्या गोष्टीमध्ये, त्याने स्वत:ला हिरो बनवले असते. रामाने स्वत:ची गोष्ट लिहिली असती, तर लोक त्याला अभिमानी समजले असते. कृष्णाने त्याची गोष्ट लिहिली असती, तर लोक त्याला गर्विष्ठ समजले असते. ना रामाने स्वत:ची गोष्ट लिहिली, ना कृष्णाने आणि ना रावणाने". "म्हणून मी तुला विचारले होते. आणि असेही, मी फक्त काही गोष्टी आणि कविता लिहिल्या आहेत. तूच माझ्यावर चांगली गोष्ट लिहू शकला असतास. तुझ्या म्हणण्याप्रमाणे, तू मोठे मोठे शब्द जरी लिहित नसलास, तरी आपल्या रोजच्या वापरातले शब्दच लिहितोस. त्यामुळे, तू काय लिहिले आहेस आणि तुला काय म्हणायचे आहे? हे सहज कळते. तू वापरलेल्या शब्दांचा अर्थ, डिक्शनरी

(शब्दकोश) मध्ये शोधत बसायला लागत नाही. पण, तू सुद्धा नाही म्हणालास."

मी सोहमचा हिरमोड केला होता. तसे त्याच्या बोलण्यात तथ्य होते. कधी कधी माझ्या गोष्टी वाचताना, गोष्टीचा शेवट काय आहे? हे माहिती असूनही मलाच रडू यायचे. पण, मुंगीने आकाश पेलण्याचे काम, तो माझ्यावर टाकत होता.

पण, साधारणपणे सहा महिन्यापूर्वी मला एक स्वप्न पडले. पूर्ण आठवत नाही स्वप्न, पण एवढेच कळाले की आपण मरत आहोत, अगदी शेवटच्या पायरीपर्यंत पोचलो आहोत. श्वासोच्छ्वास बंद पडत होता. हालचाल करता येत नव्हती, घाम फुटला होता. पण बहुतेक गुरूंना चिंता होती, झोपेत सुद्धा त्यांने बुद्धी दिली. मी मनातच स्वत:ला म्हणालो "देवाचे नाव घे, देवाचे नाव घे".

आता मी जागे असताना भरपूर वेळा ऐकले होते, वाचले होते की "अन्ते: मती: तथा गती:". म्हणजे प्राण शरीरातून निघताना आपली बुद्धी जशी असते, त्यावरच आपला पुढचा जन्म ठरतो. जर मी देवाचे नाव घेतले असते, तर थेट त्याच्याकडेच पोचणार होतो. तर मी देवाचे नाव घेऊ लागलो. आणि काय आश्चर्य? साक्षात बालाजीची मूर्ती माझ्या स्वप्नात आली.

आपला मेंदू झोपेत सुद्धा कार्यरत असतो. दिवसभरात, आपल्या आयुष्यात आत्तापर्यंत घडलेल्या गोष्टी या मेंदूत साठवलेल्या असतात. त्यापैकीच एक गोष्ट मला आठवली. ती म्हणजे, लग्न ठरवायच्या वेळी आमच्यात मुली मुलांच्या घरी येतात. हे कलियुग आहे. पाश्चात्य संस्कृतीचा प्रभाव वाढतो आहे. अर्थातच, मी सुद्धा कधीतरी पाश्चात्य संस्कृतीचा अनुभव घेतच असतो म्हणा. खरे सांगायचे तर, सोहममुळेच आपल्या भारतीय संस्कृतीवर माझे, थोडे का होईना प्रेम बसले आहे.

असो, ब्राम्हण मुली, त्यातच जर शिकलेल्या असतील. तर त्यांच्या अपेक्षा सुद्धा मोठ्या मोठ्या असतात. आजकाल मुलगी इंजिनिअर असली, तर थेट अमेरिकेची भाषा सुरु करते. डॉक्टर असली तर डॉक्टर मुलगाच शोधला जातो, परदेशातला असेल तर दुधात साखर. म्हणजे, माझ्यासारख्या मध्यम शिक्षित मुलांचे तर हालच होतात. बरं, एखादा मुलगा गावाकडे रहात असेल, तर त्याचे लग्न ठरणे म्हणजे फार अवघड गोष्ट झाली आहे आजकाल. तसे काही मुली अपवाद असतात. पण, गावातल्या बहुतेक मुली आधीच शहरातला मुलगा शोधत असतात आणि शहरातल्या मुली परदेशातला.

माझ्या लग्नाच्या वेळी आम्हालाही असेच अनुभव येऊ लागले. काही मुलींचे पालक म्हणायचे "एवढ्या छोट्या घरात राहणार होय आमची मुलगी?". आमच्या छोट्या घराची, त्या वेळी नसणाऱ्या ऐपतीची थट्टाच केल्यासारखी वाटायची. बरं, त्यांचा नकार असेल, तर तसे कळवावे की नाही? पण थेट प्रश्नच

विचारला जायचा - "मुलगा आणि मुलगी, एवढ्या छोट्याश्या घरात झोपणार कुठे? वेगळी बेड-रूम नाही वाटतं?"

काही मुली तर आमचे घर पाहून, त्यांच्या पालकांकडे फार विचित्र नजरेने बघायच्या. आणि नजरेनेच खुणवायच्या की "अश्या घरात तुम्ही माझे लग्न करणार होय?". अर्थातच, माझ्यासमोरच.

तर असो, त्या वेळी आम्ही ठरवले होते, "आपण मोठे घर घ्यायचे." तर असेच मोठे घर घेण्यासाठी, भावाने मोठे कर्ज घेतले होते.

घर घेताना, बाबांना आलेला सेवा-निवृत्तीचा सगळाच पैसा देउन टाकला. थोडक्यात काय? तर त्या वेळेस काहीच पैसा शिल्लक नव्हता. आणि डोक्यावर कर्ज सुद्धा होते. अगदी आजारपणात वापरता येईल इतका पैसाही शिल्लक नव्हता. म्हणजेच, आई-बाबांच्या म्हातारपणासाठी लागणारा सगळा पैसा घरात गुंतवला होता. आई-बाबा पूर्णपणे आमच्यावरच अवलंबून झाले होते. असेही, मी आणि भाऊ काही सरकारी नोकरीत नव्हतो, की पुढे जाऊन पेन्शन वगैरे मिळणार होती. खाजगी कंपनीत काम करताना आधीच, पुढे आपल्यासाठीसुद्धा पैसे साठवून ठेवावे लागतात, हे आता कळू लागले होते.

तसे, सरकारी नोकरी मिळवण्याचा भरपूर प्रयत्न झाला आमच्याही कडून. पण, काम नाही होऊ शकले. आणि साधारणपणे ३० वर्ष पूर्ण झाली, तसा मी वयाच्या अटीमुळे सरकारी नोकरी शोधण्याच्या स्पर्धेमधून आपोआप बाद झालो. यातही माझे कर्तव्य अफाट असेच होते म्हणा. हो, नापास होण्यासाठी सुद्धा काहीतरी कर्तव्य असावेच लागते की.

असो, तर आता स्वप्नात माझ्या समोर बालाजी होता. पण, मेंदू अजूनही कार्यरत असल्यामुळे मला हे ही कळत होते की "जर मी मेलो, तर सगळी जबाबदारी भावावरच पडणार". मी देवाला म्हणालो "देवा, आत्ता जर मी आलो, तर भावावर संकटच कोसळेल रे." मला थोडा वेळ दे. मी कर्ज फेडतो आणि मग तुझ्याकडे येतो.".

आणि काय आश्चर्य? मला जाग आली. माझा श्वास अजूनही अडकलेलाच होता. मी १-२ मिनिट प्रयत्न केला. कपाटाच्या आधाराने उभा राहिलो आणि श्वास घ्यायचा प्रयत्न केला. तेव्हा कुठे मला श्वास घेता आला.

आता, आपल्याला माहितीच आहे. बालाजीने, त्याच्या लग्नाच्या वेळी कुबेराकडून कर्ज घेतले होते. त्यामुळे अर्थातच, डोक्यावर कर्ज असण्याचा अर्थ त्याच्याशिवाय कोणाला चांगला माहिती असणार?

इथेही, देवाने आपल्याला दाखवून दिलेच होते "कलियुगात माणसांना, त्यांच्या लग्नासाठी कर्ज काढावे लागेल". तर, मी सुद्धा असाच, देवाच्या वचनांवर विश्वास बसलेला एक व्यक्ती. फक्त, याच्यामागचे लॉजिक मात्र सोहमने समजावले.

गेल्या सहा महिन्यात, जवळ जवळ अर्धे कर्ज, फेडून सुद्धा टाकलय भावाने. हळू हळू मी या कर्जाच्या भारातून मोकळा होत आहे.

पण, गेली ३० वर्ष या शरीराने जी धावपळ केली होती, जे कष्ट केले होते. वेळेवर न जेवणे, व्यवस्थित न जेवणे, उशिरा झोपणे, उशिरा उठणे, चुकीचा आहार, इत्यादी सवयींमुळे, आता या वयातच हे शरीर फार थकून गेलय. बाकी काही त्रास नाही मला  पण मान आणि खांदे रोजच अवघडतात. सकाळी उठल्यावर पहिले दोन तास डोके सुन्न पडू लागते. गेली काही वर्ष, माझी केसं गळण्यामागचे बहुधा हेच कारण असावे. तसा मी एवढा टकला नाही झालो अजून. पण, कधीकधी अर्धचंद्र बाहेर पडतोच. बहुतेक खांद्याच्या वर, डोक्यापर्यंत रक्त पुरवठा व्यवस्थित होत नसावा. कधी कधी उजव्या कानाने कमी ऐकू येते. बहुतेक, वेळ जवळ आलीये माझी. पुराणात सांगितल्याप्रमाणे काही लक्षणे जाणवत आहेत मला.

तर मी ठरवले, "आयुष्य किती आहे ते माहिती नाही. पण, मरण्याआगोदर आपण पुस्तक लिहायचे. आपण सोहमचा प्रस्ताव मान्य करायचा". असेही, पुस्तक लिहिल्यामुळे मलासुद्धा काहीना काही अतिरिक्त उत्पन्न मिळणारच होते.

शेवटी, मी सोहमची गोष्ट लिहायला घेतली. हे आत्तापर्यंत तुम्हाला समजलेच असेल म्हणा. पण, दरम्यान जेव्हा साधारणपणे १२० पाने लिहून झाली होती. तेव्हा मी, माझ्या आजारपणावर काहीतरी उपचार करावे म्हणून पंचकर्म चिकित्सा करायची ठरवली. सुरुवातीला, पंचकर्म चिकित्सा म्हणजे काय असते? कशी केली जाते? वगैरे अनुभव घेण्यासाठी, मी फक्त एकाच दिवसाची पंचकर्म चिकित्सा करून घेण्याचे ठरवले. तर, असे एक दिवसाची चिकित्सा करून मी परत घरी आलो.

२-४ दिवसांनेच मला कामानिमित्त ४ दिवसांसाठी हैदराबादला जावे लागले. जाताना ए.सी मध्ये प्रवास करण्याची फार इच्छा निर्माण झाली. जाता-येतानाचा प्रवास, तिकडचे २ दिवसाचे रहाणे ए.सी मधेच झाले. आणि व्हायचे तेच झाले होते. अपूर्ण पंचकर्म चिकित्सा केल्यामुळे आणि ४ दिवस ए.सी मध्ये राहिल्यामुळे, शरीरातला वात आता, पोटात न साठता थेट मानेपर्यंत आणि कानापर्यंत पोचला. माझे शरीर म्हणजे "आधीच दुष्काळ आणि त्यात तेरावा महिना" असे झाले होते. जिथे नको तिथेच नेमका वात जाऊन बसला होता.

घरी आल्यावर अचानकच एके दिवशी, उजव्या नव्हे तर डाव्या कानात असह्य वेदना होऊ

लागल्या. दोन दिवस लसणाचे तेल टाकून कसेतरी सहन केले. पण, दुखणे वाढतच चालले होते. शेवटी डॉक्टर कडे गेलो आणि औषधे घेतली. आता डाव्या कानानेही कमी ऐकू येऊ लागले होते. आधीच, उजव्या कानाने मला ७०-८०% ऐकू येत होते. त्यातच डाव्या कानानेही विकेट टाकली. डाव्या कानाने फक्त २०-३०% च ऐकू येत होते. म्हणायला, दोन्ही कान मिळून माझी सेंच्युरी होऊ शकली असती. पण, दोनशे चेंडूत.

कानात खाजवावेसे वाटत होते म्हणून, मी मेडिकल मधून ईअर बड विकत घेऊन कान टोकरत बसलो. "विकतचे दुखणे" यालाच म्हणत असावे, कानाच्या पडद्याला माझ्या हातून इजा झाली. डाळींबाच्या दाण्याएवढे बीळ पडले. होते नव्हते, तेही ऐकू येणे बंद झाले होते.

### ४. पुस्तक पूर्ण करण्यासाठी मला मिळालेले देवाचे संकेत आणि अनुभव.

पण, लिहिण्यासाठी ऐकू येत नसले तरी चालते. म्हणून, वेदनाशामक घेतल्यावर बरे वाटले, की मी गोष्ट पूर्ण करण्याच्या संकल्पावर परत येऊ लागायचो. मी देवाशी मनातच बोलू लागलो "देवा, काम फार मोठे आहे, मला लिखाणाचा काहीच अनुभव नाही." पण गोष्ट तुझ्याशीच संबंधित आहे म्हणल्यावर ती मस्त होईलच." पण मला हे जमेल का रे? तू मदत करशील का रे?"

त्या वेळी घरात टी. व्ही चालू होता. कोणती तरी जाहिरात लागली होती. आणि नेमके त्यामधले पात्र म्हणाले "जर आपले स्वप्नं पूर्ण होत असेल, तर मी कशाला मागे राहू?" आता ही गोष्ट देवच माझ्याकडून लिहून घेणार. गोष्ट प्रसिद्ध झाली, तर पैसे मला मिळणार. मग देवाचे कसले स्वप्न पूर्ण होणार होते? देवालाच माहिती. कदाचित, आपल्या भक्ताची प्रत्येक इच्छा पूर्ण करणे, हेच देवाचे स्वप्न असावे.

असो, मला वाटले देवच बोलला. तसे रोजच देव मला काही ना काही संकेत देतच असतो. कधी कधी आवाजातून, कधी लिखाणातून, कधी स्वप्नातून. महत्वाचे म्हणजे, देवाचा संकेत मानला तर संकेत असतो. नाहीतर, ज्यांना ज्यांना आपण देवाचा संकेत सांगतो, तो सरळ आपल्याला वेडा ठरवून मोकळा होतो.

आता आजचीच गोष्ट सांगतो, कालपर्यंत, माझा भाऊसुद्धा मला म्हणत होता "तू थोडा वेडा आहेस रे", तू काय सांगतोस, काय करतोस काहीच कळत नाही".

आता त्याचेही लग्नाचे वय झाले असल्यामुळे त्याच्यासाठीही मुली पहाणे सुरूच आहे. आजच एक मुलगी आली होती. ती गोंदवलेकर महाराजांची भक्त आहे. तिने का कोण जाणे? तिला स्वत:ला आलेले गोंदवलेकर महाराजांचे अनुभव माझ्या भावाला सांगायला सुरुवात केली. तिने तिचे अनुभव सांगितल्यावर माझ्या भावाला मी आठवलो. आजच तो म्हणत होता "हो की रे दादा, तू खरं बोलत होतास".

मी बरा होइल, की १-२ वर्षात निरोप घेईल हे सांगता येत नाही. पण, मरणारच असेल, तर लोकांपर्यंत ही गोष्ट पोचवूनच मरतो की.

आता प्लॅन तर ठरला. पण स्टोरी कुठाय? आहे, स्टोरी सुद्धा आहे. स्टोरी समजून घेण्यासाठी मी, ज्याने माझ्यासमोर प्रस्ताव मांडला त्या सोहमकडे गेलो. तसे मी आणि सोहम लहानपणापासूनच एकत्रच वाढलो आहोत. आमच्या आवडी निवडी आणि सवयीसुद्धा बऱ्याचश्या मिळत्या जुळत्या असल्यामुळे, आमची मैत्री अजूनही टिकून आहे. तसे, नाईलाज म्हणा किंवा नशीब म्हणा. पण, मी, सोहम आणि आमचा अजून एक मित्र, लहानपणापासून एकमेकांना सहन करत आलो आहोत.

लहानपणापासूनच आम्ही सोबतच वाढलो असल्यामुळे, आम्ही एकमेकाला बऱ्यापैकी ओळखतो. महत्वाची गोष्ट म्हणजे, आमच्या जन्मवेळेमध्ये फारसे काही अंतर नसल्यामुळे, आमच्या कुंडलीतले सगळे ग्रह सुद्धा सारखेच होते. आता आमच्या कुंडलीत ग्रहस्थिती जवळपास सारखीच असल्यामुळे, आमची नशिबही तशीच एकमेकासारखी आहेत.

जेव्हा सोहम चुकायचा, तेव्हा आमचा दुसरा मित्र, त्याला आपण सोहम पार्ट टू म्हणू. सोहम पार्ट टू असे नाव का ठेवले असेल? तर, याचेही नाव सोहमच. सोहम आणि सोहम पार्ट टू, हे दोघे म्हणजे अगदी विरुद्ध ध्रुव. त्यांचे कधीच एकमेकाशी पटले नाही. दोघांनाही दर वेळेस वाटायचे की "आपणच बरोबर आहोत आणि समोरचा चुकला आहे". तर, जेव्हा सोहम वागायला काही चुकायचा, तेव्हा सोहम पार्ट टू त्याला चूक दाखवून द्यायचा. पण लहानपणापासूनच सोहमचे जगण्याचे सूत्र होते "ऐकावे जनाचे आणि करावे मनाचे".

मनाचेच ऐकल्यामुळे सोहम नेहमी गोत्यात यायचा. आणि अर्थातच, त्याचे जिवलग मित्र म्हणून आम्ही दोघे सुद्धा. (सोहम किती गोत्यात आला होता? याचा थोडासा अंदाज तुम्हाला अनुक्रमणिकेवरून आलाच असेल). आणि अर्थातच, चुकीचा नाही वागला तरी, सोहम मात्र प्रत्येक गोष्टीत "सोहम पार्ट टू" ची चूक काढायचा.

अगदी सोहम म्हणल्याप्रमाणे, मी मात्र काय चांगले आणि काय वाईट? याचा जास्त विचार न करत बसता, त्या दोघांची घालमेल, भांडण तटस्थपणे पहात असायचो. असाही सोहमला आणि सोहम पार्ट टू ला "काय वाईट आणि काय चांगले" हे समजावून सांगण्यासाठी, मी काही फार मोठा तत्वज्ञानी नव्हतो. मी तरी काय बोलणार?

कदाचित यामुळेच, सोहमने मला त्याच्यावरची गोष्ट लिहिण्याची ऑफर दिली असावी.

तर, या सोहमच्या आयुष्यात येणाऱ्या चढ-उतारांचा मी एक साक्षीदार आहे. असेही, जे आयुष्य सोहम आत्तापर्यंत जगला आहे. ते एकाप्रकारे अतिशय परिपूर्ण असे आयुष्य आहे, असे मला वाटते. आपण ज्याला नशीब म्हणतो ते नशीब, दैव, सोहमच्या बाबतीत अतिशय विचित्र. पण, तेवढेच रहस्यमय आणि आनंददायी आहे, असे मला वाटते.

जी गोष्ट आपली असावी असे सगळ्यांना वाटते. ती गोष्ट देवाने सोहमच्या आयुष्यात लिहिली होती. प्रत्येकाला हवे असणारे, प्रत्येकाला हेवा वाटेल असे आयुष्य देवाने सोहमच्या नशिबी लिहिले होते.

तर, सोहम म्हणजे अगदी चित्रपटवेडा. सिनेमे पाहून पाहून त्याचे आयुष्य अगदी सिनेमातल्या गोष्टीसारखेच झाले होते. सोहम मला म्हणाला, "पात्रांची आणि जागांची नांवे बदलून टाक. बाकी सगळी गोष्ट मी सांगतो" एखाद्याने तरीही उचापत काढली, तर श्रापच देऊ. हो, सोहमच्या श्रापाची, त्याचा जिवलग मित्र असूनही मलासुद्धा भीती वाटते.

तर आधीच सांगतो "ही, एक काल्पनिक कहाणी आहे. फक्त मनोरंजनाच्या उद्देशानेच, ही गोष्ट

लिहिली आहे. हिचा कोणत्याही, जीवित अथवा मृत व्यक्तीशी संबंध नाही. काही संबंध आढळून आलाच, तर तो निव्वळ योगायोग समजावा. तसेच, कोणाच्याही, कोणत्याही भावना दुखावण्याचा या मागे हेतू नाही, एवढे समजून घ्यावे"

मी गोष्ट समजून घेतली. गोष्टीचा आराखडा ठरवला.

माझ्यापुढे नवीन प्रश्न उभा ठाकला "आता, गोष्ट लिहिताना ती कोणत्या रसात लिहायची? उदा. शृंगार रस, बीभत्स रस, कारूण रस, प्रेम रस वगैरे?" शेवटी मिक्स फ्रुट ज्यूस सारखे, सगळेच रस टाकायचे ठरले.

तेवढ्यात, फोन वाजू लागला. फोनवर बोलणे संपवून, मी फोन होता तिथे परत ठेवायला गेलो. तर तिथे अजून एक वर्तमान पत्र पडले होते. त्यावर लिहिले होते "गोष्ट रंजक करायची."

देवाने मला अजून एक संकेत दिला होता. पण, 'रंजक' या शब्दाचा अर्थ कसा काढायचा? जाउदे, सोप्पा अर्थच काढतो 'रंजक' म्हणजे "मनोरंजक".

दुसरा प्रश्न पडला - "गोष्ट गंभीर करायची की हास्यास्पद करायची? की साहसी (मारामारीची) करायची? की रहस्यमय करायची? इत्यादी." शेवटी ठरले, "सगळे आले पाहिजे गोष्टीत".

मी ठरवले, जसे सोहमचे आयुष्य रहस्यमय आहे. तसेच, मुख्यत्वे ही गोष्ट रहस्यमय करायची. पण, गोष्टीतली रहस्य शेवटी उघडी करायची. पहिल्याच भागापासून रहस्यांची दुनिया सुरु करायची. भरपूर दैविक आणि नैसर्गिक गोष्टींचा उलगडा होणारी करायची. देवाने मानवासमोर जी कोडी टाकली आहेत, त्यापैकी काही कोडी या गोष्टीतून उलगडायची. याच रहस्यांचा आधार घेऊन, गोष्टीत इतरही गोष्टी उदा. प्रेम, राग, द्वेष, दु:ख वगैरे वगैरे टाकायचे. तसेच, ज्योतिषी लोकांसाठी सुद्धा, देवाने रचलेल्या मायेची कोडी सोडवण्यासाठी, भरपूर गोष्टी या गोष्टीत उपलब्ध करून द्यायच्या.

जो कोणी ही गोष्ट पूर्ण वाचेल, त्याला त्याच्या पुढच्या आयुष्यात, पावला-पावलावर देवाची, सोहमची आणि माझी आठवण येत राहील. देवाच्या आपल्यावर असणाऱ्या कृपेचा अनुभव येत राहील. प्राण्यांविषयी मनात दया निर्माण होईल. जे कोणी या घडीला संमोहित झाले आहेत, ते संमोहनातून बाहेर येतील आणि देवाची भक्ती करू लागतील.

पण ही रहस्य समजण्यासाठी, गोष्ट पूर्ण वाचली तर गेली पाहिजे, नाही का? त्यासाठी सोहमचे आयुष्य समजून घेतले पाहिजे, नाही का?

**५. पहिल्यांदाच पुस्तक कसे लिहिले जाते? हा माझा अनुभव (लेखक बनायचे असेल, तर हा अनुभव नक्की वाचा. देव आपल्याला कशाप्रकारे मदत करतो? हे समजून येईल).**

आता मी एवढे सगळे तुम्हाला सांगतोय ते का? तर समजा, पुढे मागे खरंच जर हे पुस्तक प्रसिद्ध झाले. आणि जर मी, श्री. वि. वा. शिरवाडकर, श्री. पु. ल. देशपांडे, श्री. चेतन भगत, श्री. प्र. के. अत्रे इत्यादी महान लेखकांसारखा मोठा लेखक झालो. तर, पुढे भरपूर नवीन लेखकांना सुद्धा, या पुस्तकातून, माझ्या लिखाणाच्या अनुभवातून प्रेरणा मिळेलच की, "की, कसे पहिल्यांदाच पुस्तक लिहिले जाते."

तर, साधारणपणे गुरुपोर्णीमेच्याच दिवशी, ऑफिस मधून घरी येताना मस्त पैकी सुंदरमची मोठी वही विकत घेतली. एक बॉल पेन विकत घेतला. एकादशीच्या दिवशी मस्त पैकी लिखाण सुरु केले. सोहम तर या गोष्टीत आहेच आणि त्याबरोबरच देव सुद्धा आहे. आता, देवाची गोष्ट लिहायची म्हणल्यावर, त्याच्याच आवडीचे दिवस नको का निवडायला?

पण, हाताने लिहायचे म्हणजे फार कंटाळवाणे काम. "किती दिवस लिहू शकणार मी? कधी माझी गोष्ट पूर्ण होइल लिहून? बरं, मला काही थोडे-थोडके लिहायचे नव्हते. एखाद्या व्यक्तीचा तीस वर्षाचा कालखंड, अगदी प्रत्येक महत्वाच्या गोष्टीसोबत समजून घेऊन लिहिणे म्हणजे काही सोपे काम नव्हते.

बरं, काही खाडाखोड करायची तर कशी करायची? नवीन काही वाक्य मधेच टाकावे वाटले, तर कसे करायचे? मला लिखाणाचा काहीच अनुभव नाही. मग कसे पूर्ण होणार माझे पुस्तक."

पण, पुन्हा सकारात्मक विचार केला. स्वतःलाच म्हणालो "अरे तू सुरु तर कर."

दोन-तीन दिवस काहीतरी लिहिले. अजून २-३ दिवसांने मुंबईला एक काम निघाले. मी विचार केला, "मस्त एकांत मिळतोय लिहायला, तर वहीच घेऊन जाऊ. रेल्वेमध्येच लिहू बसल्या बसल्या." त्या दिवशी खरेच सांगतो, गोष्टीचा एक भाग मी पूर्ण लिहून सुद्धा टाकला.

किती पाने झाली असतील माहितीये? फक्त १५-१६.

मुंबई वरून पुण्याकडे येताना, साधारण पणे लोणावळा गेले असेल जेव्हा माझे लिहून पूर्ण झाले होते. शेजारचा माणूस म्हणाला "एवढे काय लिहितो आहेस?" मी म्हणालो, काही नाही, एक गोष्ट लिहितो आहे जी पुढे खूप प्रसिद्ध होणार आहे." माझा आत्मविश्वास आकाशाला भिडू लागला होता.

"बर पण, फक्त १५-१६ पानातच अर्धी गोष्ट पूर्ण झाली. म्हणजे, काय चुकत असेल माझे?"

तेवढ्यात, रेल्वे मध्ये एक वर्तमान पत्र (न्यूज पेपर) माझ्या समोर उडत येऊन शेजारच्या सीट खाली पडले. मला वाटलेच "देवाचा काही तरी संकेत असेलच याच्यावर." मी तो पेपर उचलला. हिंदी पेपर होता तो आणि त्यावर मोठ्या अक्षरात लिहिले होते, "लिखने से पहले पढना पडेगा". म्हणजे, "तुला काही तरी लिहायचे असेल तर, आधी लिखाण कसे करायचे याचा अभ्यास करावा लागेल". आता देवाचा अजून एक संकेत मिळाला होता. आता माझा आत्मविश्वास वाढत चालला होता. (आजच, एव्हाना गोष्ट पूर्ण होत आली होती. आणि दिनांक ०१.१०.२०१४ रोजी समजून आले, लिखने से पहले पढना पडेगा चा अर्थ होता "तू आजपर्यंत जे काही वाचन केले आहेस, जे सामान्यज्ञान मिळवले आहेस, त्याचा पूर्णपणे या गोष्टीत वापर करून घे).

पुन्हा थोडे मागे जाऊ.....

तसे, देवाने मला संकेत देणे माझ्यासाठी नेहमीचेच आहे. नेहमी वाटत राहते की देव आजूबाजूला उभाच आहे. कधीही बोलू शकतो. देवाने २-४ दिवस काही संकेत दिला नाही, की अगदी चुकल्यासारखे वाटते. मग देवाला आठवण करून द्यायला लागते. "देवा बराच काळ तुझा काही संकेत नाही मिळाला. मी योग्य मार्गाने तर पुढे चाललो आहे ना?"

जणू काही देव माझ्या प्रश्नाची वाटच पहात असतो आणि लगेच, कोणत्या ना कोणत्या रुपात संकेत देतोच देतो. देवाचे टायमिंग इतके अफलातून असते, की जणू काही मी कोणता प्रश्न विचारणार? हे त्याला माहितीच असते. आणि अर्थातच, प्रश्न विचारला रे विचारला की उत्तर समोर हजर असते.

पण, जर देव रोजच एवढे संकेत देतो, तर प्रत्यक्ष येऊन बोलत का नाही? दिसत का नाही?

असो, दिसेल कधीतरी.

तुमच्यासारखेच मलासुद्धा देवाला पहायचंय पण, त्याच्या चतुर्भुज रुपात. पुराणात जसे देवाचे वर्णन केले आहे, "चतुर्भुज, पितांबरधारी, मेघवर्ण, सुहास्यवदन वगैरे वगैरे". पण, अजून तरी तश्या रुपात तो दिसला नाही. अपवाद फक्त फोटोंचा, टी.व्ही वर लागणाऱ्या सिनेमांचा आणि मालिकांचा.

मला विश्वास आहे, लवकरच मला हव्या असलेल्या रुपात देवाचे दर्शन घडणार आहे.

(आत्ता जेव्हा वरच्या ८-१० ओळी लिहून झाल्या होत्या, तेव्हा भाऊ घरी आला. घरी दुसरे कोणीही नसल्यामुळे, त्याला चहा गरम करून देण्याची जबाबदारी माझी होती. नेमका तो सुद्धा पेपरच वाचत बसला होता. भावाच्या हातात चहाचा कप देताना, पुन्हा माझी नजर एका बातमीवर पडली. तिथे मोठ्या अक्षरात लिहिले होते "वेल प्लेड" (छान खेळलास). क्रिकेटमध्ये जर एखाद्या फलंदाजाने अवघड चेंडू व्यवस्थित खेळला, तर "वेल प्लेड" असे म्हणले जाते.

जणू काही देवच, वर लिहिलेल्या ओळींची स्तुती करत होता. मी चेंडू त्याच्या कोर्टात टाकणार, हे त्याला माहिती असावे. मी लिहिले की ते खरे होते, हे मला समजले आहे. आणि हे त्यालाही माहिती आहे. मी वरच्या ओळी लिहिणार, हे सुद्धा त्याला माहिती असावे. त्यामुळेच, स्वस्तात त्याचे हवे तसे दर्शन घेण्याच्या माझ्या आयडीयाला, त्याने आधीच "वेल प्लेड" म्हणून दुजोरा दिला असावा.)

असो, माझे विचार-चक्र पुन्हा सुरु झाले? "आता काय वाचायचे? मोठ्ठे लिखाण करायचे म्हणल्यावर मोठेच काहीतरी वाचायला लागेल." पण, त्यात सुद्धा एक अडचण होतीच की. आता मला मोठ्या लेखकांची नावे सुद्धा माहिती नाहीत. बरं, काही नावं माहिती असली, तरी त्यांची पुस्तकं कोणती? हे सुद्धा माहिती नाही." बरं, एखादे मोठे पुस्तक मिळेल सुद्धा, पण एवढे मोठे पुस्तक वाचायचे, समजून घ्यायचे, आत्मसात करायचे म्हणजे, २-३ महिने तरी लागणारच की. आणि मला जशी गोष्ट रहस्यमय करायची आहे, तसे काही वाचायला मिळेल असे वाटले नाही. तसेच, पुस्तकातून काय शिकायचे? हे सुद्धा कळायला डोके लागते. तसेच, वाचताना झोप येते हा पूर्वीचा अनुभव सुद्धा पाठीशी होता.

एव्हाना मला फार घाई झाली होती. पुस्तक वाचण्यात २-३ महिने घालवायचे म्हणजे अतीच वाटले मला. बरं मी घालवले सुद्धा असते २-३ महिने. पण, आडातच नाही तर पोहऱ्यात कुठून येणार? बरं, वाचायचे म्हणले तरी, दिनक्रम असा आहे, की रोजच वाचणे शक्य होइल असे वाटत नाही." वाचण्यात खंड पडला की, पुढचे पाठ मागचे सपाट असे होऊ शकते.

थोडक्यात काय? तर, अडचणीच अडचणी होत्या.

मी पुन्हा विचार केला, एकदा नव्हे २-३ वेळा विचार केला, ५-६ दिवस विचार केला, आणि देवाला मनात म्हणालो "देवा, माझे काम असे आहे, माझा दिनक्रम असा आहे, की मी काही वाचू शकणार नाही. जर मी वाचत बसलो, तर तुझ्याबद्दल विचार करू शकणार नाही. मी तुझ्यापासून दूर होइल रे." आणि तसेही तूच तर माझ्या शब्दांना नेहमीच खरे करत आला आहेस. तूच तर नेहमी माझ्या शब्दांमध्ये, ते खरे होण्याची ताकत दिली आहेस." "जर तुला वाटत असेल, की मी हे पुस्तक लिहावे, तर तुलाच हे पुस्तक लिहावे

लागेल". तुलाच माझ्या आत बसून हे पुस्तक लिहावे लागेल".

माझे म्हणजे असे आहे "काम तेरा और नाम मेरा." सगळे देवाकडूनच करून घेतो आणि नंतर स्वत:चे नाव लावतो.

मी पुढे देवाला म्हणालो "मी काही वेद व्यास नाही, की एकदम भारी लिखाण करू शकेल." तुझी गोष्ट जशी वेद-व्यासांने सांगितली आणि साक्षात गणपतीने लिहिली. तसा ना मी वेद व्यास आहे ना गणपती सारखी मला खूप तल्लख बुद्धी आहे. तसेच, या धावपळीत एवढे मोठे लिखाणकाम, ते सुद्धा पेनने आणि वहीवर करायचे म्हणजे एकदम अशक्य गोष्ट आहे रे." "बर, मी लिहील सुद्धा, पण काम धंद्याचे काय? जे कमावतो आहे ते सुद्धा कमावणे अशक्य होइल रे." आणि पेन ने लिहायचे म्हणजे फार कंटाळा येतो रे."

थोडक्यात काय, तर देवासमोर माझी सगळी उणी बाजू मी मांडली होती -

१. "वाचन करू शकणार नाही"

२. "पेन ने लिहू शकणार नाही."

३. "इंग्लिश काही एवढे भारी लिहिता येत नाहीत."

४. "हिंदी शब्द फार काही माहिती नाहीत."

५. "हिंदी, मराठी टायपिंग करता येत नाही."

"मग मी पुस्तक लिहिणार कसे?

दरम्यान, नव्याने सांगतो. साधारणपणे, १०० पाने पूर्ण झाली असतील आणि गणेशोत्सवाचे वेध लागले होते. तोपर्यंत या गोष्टीची मांडणी मी ३-४ वेळा बदलली होती. गणपतीचे दिवस सुरु झाले, की आपल्याकडे कसे सगळीकडे बाप्पाचे पोस्टर्स लागतात. अगदी तसेच, माझ्या ऑफिसला येण्या-जाण्याच्या रस्त्यात सुद्धा लागले होते. मी नेहमीप्रमाणेच देवाकडे गोष्ट लिहिण्यासाठी मदत मागत होतो. माझी नजर, एका अशाच रस्त्यात लावलेल्या गणपती बाप्पाच्या पोस्टरवर पडली. खाली लिहिले होते "मी येतो आहे". जणू काही गणपती बाप्पानेच मला सांगितले होते "तुझ्याने काही गोष्ट चांगली लिहिली जाणार नाही, तेव्हा मलाच, तुझ्यात येऊन ही गोष्ट सुंदर करावी लागेल".

या काळातच, बुध महाराज त्यांच्या उच्च राशीत, म्हणजे कन्या राशीत आले होते. आता बुध महाराज म्हणजे साक्षात बुद्धीदाता. बुध महाराज उच्च राशीत आले, की सगळी काम कशी अगदी सोप्पी होऊन जातात. कल्पनेचे वारू चोहीकडे उधळून, मनात नवीन नवीन कल्पना बीज रोवू लागतात. बुद्धी अगदी

कम्प्युटर प्रमाणे चालते. मी सुद्धा या बुध महाराजांच्या कन्या राशीतल्या भ्रमणाचा फायदा उचलायचे ठरवले. बुध महाराज साधारणपणे २७-२८ दिवस एका राशीत असतात. याचाच अर्थ असा, की पुढच्या २७-२८ दिवसात हे पुस्तक मी बऱ्यापैकी संपवायला हवे.

तसेही माझ्या कुंडलीमध्ये, दशम स्थानाचे स्वामी ९व्या स्थानी असल्यामुळे, आणि १२व्या स्थानाचे स्वामी एकादश स्थानी असल्यामुळे, माझ्या हातून देवाबद्दल एखादे मोठे लिखाण घडणार. हे बहुतेक सोहमला आधीच समजले असावे. आणि म्हणूनच त्याने माझ्यासमोर, ही गोष्ट लिहिण्याचा प्रस्ताव मांडला असावा.

बहुदा देवानेच ठरवले आहे "याचे स्वप्नं पूर्ण करायचेच". आता ही बहुतेक, साक्षात गणपती बाप्पा, जो बुद्धीचा दाता आहे तोच ही पुढची गोष्ट लिहितोय माझ्यात बसून.

२-४ दिवस असेच गेले. मग मी पुन्हा विचार केला, "आपला इंग्लिश टायपिंग चा वेग चांगला आहे. जर अस काही सोफ्ट्वेअर मिळाले, की ज्याने मी इंग्लिश टायपिंग करेल, पण टाइप मराठी मधून होइल." तो बात बन जायेगी. मग मी दोन-चार जणांना सांगितले "पहा असे काही सोफ्ट्वेअर मिळते का". आणि काय आश्चर्य? मला दुसऱ्याच दिवशी एकाने असे सोफ्ट्वेअर शोधूनसुद्धा दिले. (गुगल इनपुट टूल्स) सोफ्ट्वेअर इतके भारी आहे, की हवा तो आणि हवा तसा शब्द, विना-कटकट मिळून सुद्धा जातो. हा तिसरा संकेत होता देवाचा. सोफ्ट्वेअरमध्ये न सापडल्यामुळे, काही शब्दांचे उच्चार चुकीचे लिहिले गेले आहेत, फक्त भावना समजून घ्या.

मग मी अजून विचार केला, "गोष्ट एवढी मस्त असताना १५-१६ पानातच कशी काय पूर्ण झाली?" माझे काय चुकत असेल?" आणि माझ्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला. मी गोष्टीत संवादच लिहिले नव्हते. तसेच, पात्रांच्या मनात चालणारे विचार सुद्धा लिहिले नव्हते. इतरांचे काय विचार असतील, ते सुद्धा नव्हते लिहिले.

चला थोडीशी आयडीया आली होती.

"पण, दिवसभर मी ऑफिस मध्ये असतो, सहा वाजता घरी येतो. जेवण वगैरे करून एखादा सिनेमा पाहीपर्यंत पुन्हा झोपायची वेळ होते. मग लिहायचे कधी आणि कुठे? फक्त ऑफिसमधेच मी जास्त वेळ असतो. पण ऑफिस मध्ये लिखाण कसे करायचे? बरं, लिखाण करत बसलो तर काम कधी करायचे?"

देवाने हा सुद्धा प्रोब्लेम सोडवला. माझ्या भावाने स्वत:चा लॅपटॉप घेतला. घरी आलो, की आता मी कधीही लिखाण करू शकणार होतो. भावाकडून सहा महिन्यासाठी मागून घेतलाय कम्प्युटर. अजून एक

संकेत दिला देवाने.

म्हणतात ना, "समय से पहले किसी को कुछ नाही मिळता." बहुतेक माझी वेळ आलेली दिसते. सगळया अडचणी कशा चुटकी सारख्या सुटत होत्या.

काही जवळचे लोक मला म्हणतात "देवाने मला सहावे इंद्रिय दिले आहे" मी जे बोलतो ते खरे होते, माझे शब्द खरे ठरतात. पण मी फक्त अंधारात दगड मारत असतो, लागला तर लागला, नाही लागला तर कोणाच काय नुकसान होतय?" सोहमसुद्धा माझ्यासारखाच फेकू. आमच्या बऱ्याचश्या गोष्टी, सवयी, आवडी निवडी जुळत असल्यामुळेच आमचे नाते इतकी वर्षं टिकून असावे.

दरम्यान, ३ महिन्यांनी जेव्हा ही गोष्ट पूर्ण लिहून झाली होती. तेव्हा साधारणपणे १७० पान लिहून झाली होती. माझा दिनक्रमसुद्धा नॉर्मल लोकांप्रमाणे झाला होता. तेव्हा नेमके, माझा भाऊ ज्या कंपनीत काम करतो, त्या कंपनीत काम करणाऱ्या लोकांसाठी, कंपनीमध्ये एक विना मोबदला चालणारे ग्रंथालय उपलब्ध झाले. यामुळे तिथे काम करणाऱ्या लोकांची फार मोठी सोय झाली होती. मोठी मोठी, मोठ्या लेखकांची पुस्तके, विना काही मोबदला (सोप्या आणि आपल्याला आवडणाऱ्या शब्दात सांगायचे तर, अगदी फुकट) उपलब्ध होणार होती. झाले, माझे पुस्तक शोधायचे कष्ट वाचले होते. त्यातच महत्वाचे म्हणजे, जर एखाद्या पुस्तकातून काहीच ज्ञान मी मिळवू शकलो नाही, तर "पैसे फुकट गेले" असे वाटणार नव्हते. अर्थातच, यात पुस्तक लिहिणाऱ्या व्यक्तीचा दोष नव्हता. दोष माझ्या शिकण्यात असेल.

आता, मला अगदी सहज, मोठ्या मोठ्या लेखकांची पुस्तकं उपलब्ध होणार होती. मला ना कोणतेही पुस्तक शोधायचे होते, ना ते विकत घ्यायचे होते. भावाने, व.पु.काळेंने लिहिलेले "घर हारवलेली माणस" हे पुस्तक आणले. पुस्तकात छोट्या छोट्या गोष्टी असल्यामुळे, सहज वाचन करणे शक्य होते. देवाने सगळीच सोय करून अजून एक संकेत दिला होता. कदाचित, जरी मला पुस्तक पूर्ण झाल्यासारखे वाटत असले. तरी, देवाला वाटत नसेल. म्हणूनच, १७० पान पूर्ण झाल्यावरही, त्याने मला वाचण्यासाठी पुस्तक उपलब्ध करून दिली.

मी विचार केला "आता कोणतेही संकट येणार नाही. शनि महाराजांचा आशीर्वाद आहे मला सुद्धा. "

मी आणखीन विचार केला, "काहीतरी सकारात्मक विचार करू, कोणाला तरी आदर्श मानू. जो चांगला लेखक आहे. पहिलेच नाव समोर आले "चेतन भगत". नोकरी करता करता त्यांने सुद्धा पुस्तक लिहिले, ते प्रसिद्ध सुद्धा झाले. आज ते एक मोठा लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत." मग त्यांनाच समोर ठेवतो आणि, थांबा... थांबा...

गोष्ट सुरु करण्याअगोदर, अजून एक अनुभव सांगतो. गोष्टीची मांडणी पुढे लिहिल्या प्रमाणे का केली? याचे कारणसुद्धा सांगतो.

माझी आई मध्यंतरी "ओम शांती" या संस्थेच्या सत्संगांना जात असायची. तिथे सांगितल्याप्रमाणे आईने एक डायरी केली होती. त्या डायरीमध्ये रोज काही ना काही लिहायचे असते. देवाचे, संतांचे संदेश लिहायचे असतात. आईने असेच काही संदेश त्या डायरीमध्ये लिहिले होते. आईने ती डायरी सुपारीच्या डब्ब्याशेजारी ठेवली होती.

असेच एकदा, जेवण झाल्यावर आईने मला सुपारीचा डब्बा घ्यायला सांगितला. माझी नजर शेजारच्या डायरीवर पडली. पहिल्याच पानावर लिहिले होते "किसी और से कनेक्शन जोडने की बजाय अगर अपने बापसे (भगवानसे) कनेक्शन जोडोगे, तो प्राप्त होनेवाले वरदानोकी अनुभूती सदा मिलती रहेगी". म्हणजेच, जर तुम्ही इतर कोणाशीही आपले कनेक्शन/संबंध जोडण्याऐवजी, देवाशी कनेक्शन/संबंध जोडला, तर देवाने आपल्याला किती वरदान दिली आहेत, याचा अनुभव तुम्हाला नेहमीच होत राहील.

यामुळेच मी या गोष्टीचे कनेक्शन/संबंध, प्रत्येक वेळेस देवासोबत जोडण्याचा प्रयत्न करू लागलो.

फक्त मलाच नव्हे, तर तुम्हाला सर्वांना सुद्धा देव रोज मार्गदर्शन करतच असतो. फक्त गरज आहे ती त्याला शरण जाण्याची, त्याच्या आवाजाकडे लक्ष देण्याची.)

तर, देवाला आणि गुरूंना आठवून मुद्द्यावर येतो.

## ६. श्री विष्णूचे दशावतार.

तर, श्री विष्णूने घेतलेले दशावतार आपल्याला माहितीच आहेत.

१. प्रलय होणार होता तेव्हा, विष्णूने मत्स्य अवतारात ऋषी-मुनींना वाचवले. पुढे याच ऋषी-मुनीनें, पृथ्वीवर मानव वंश पुढे चालवला.

२. राक्षस आणि देवांमध्ये जेव्हा समुद्र मंथन झाले, तेव्हा पूर्ण पर्वताला कुर्म अवतारात विष्णू देवानेच तर पेलले.

३. हिरण्याक्ष राक्षसाने जेव्हा पृथ्वीला चोरून समुद्राच्या तळाशी ठेवले. तेव्हा विष्णू देवानेच वराह अवतारात, त्या राक्षसाचा वध करून पृथ्वीला बाहेर काढले.

४. पुढे भक्त प्रल्हादाचे वडील हिरण्यकश्यपू, ज्यांना वरदान होते की, त्यांना न दिवसा न रात्री, न सकाळी न संध्याकाळी, न माणूस न प्राणी, न घरात न घराबाहेर, न अस्त्राने न शस्त्राने कोणीही मारू शकेल. पुढे त्यांचे पाप खूप वाढले, ते स्वत:ला देव समजू लागले, तेव्हा विष्णू देवानेच, नरसिंह अवतार घेवून त्यांना घराच्या चौकटीत, त्यांना संधिप्रकाशाच्या वेळी मारले.

५. पुढे वामन अवतारात, बळी राजाकडून पृथ्वी हस्तगत करून राज्य देवांकडे सोपवले.

६. पुढे मातृ-पितृ भक्त परशुराम अवतार झाला.

७. राम अवतार म्हणजे मर्यादा पुरुषोत्तम, "राम अवतार म्हणजे, प्राण जाये पार वचन न जाये". वडिलांच्या शब्दासाठी वनवास स्वीकारला. सीतामाई म्हणजे साक्षात पतिव्रता. तिचे हरण करणाऱ्या रावणाचा, विष्णू देवाने राम अवतारात वध केला.

८. कृष्ण अवतारातले चमत्कार तर सर्वांना माहीतच आहेत. कृष्ण म्हणजे सर्वांचा प्रिय सखा. ज्या कृष्णाने लहानपणी आपल्या लीलांने सगळयांना आश्चर्यचकित करून सोडले. त्याच कृष्णाने पुढे, भगवदगीतारुपी मौल्यवान खजिना आपल्याला दिला.

९. बुद्ध अवतारात आपल्याला ज्ञान दिले, मोक्षाचा मार्ग दाखवला.

१०.पुढे कल्की अवतार होइल, त्याचे दुसरे नाव कलंकी. या अवतारात देव, आपल्यावर लागलेले सर्व कलंक मिटवणार, म्हणून कलंकी हे नाव पडले.

त्याचा बालाजी अवतार म्हणजे तर, यश चोप्रांच्या सिनेमातील लॉस्ट एंड फाउंड फॉर्म्युल्यासारखा. रामअवतार आणि कृष्णअवतार हे देवाचे पूर्ण अवतार मानले जातात. त्याचा बालाजी हा अवतार दशावतारांपैकी मानला जात नाही.

बालाजी अवतारात त्याने ४-५ पक्षी एकाच दगडात कसे मारले? म्हणजे एकाच जन्मात ४-५ कामे कशी पूर्ण केली, ४-५ वचन कशी निभावली. ते कसे हे जरा समजून घेऊ.

१. त्रेता युगात, रावणाने सीतेचे हरण करून तिला लंकेला नेले. पण ही सीता खरी नव्हती. झाले असे की, जेव्हा रावण सीतेचे हरण करणार होता. तेवढ्यात अग्नीदेव प्रकट झाले. अग्निदेवांने, सीतेसारखीच हुबेहूब दिसणारी वेदवती नावाची मुलगी उत्पन्न केली. रावण, सीता समजून वेदवतीलाच लंकेला घेऊन गेला. कदाचित, पृथ्वीतलावरची कोणीही (सौ महालक्ष्मीने) केलेली ही पहिली डबल रोल भूमिका असावी.

पुढे रामाने रावणाचा वध करून सीतामाईला (वेदवतीला) परत आणल्यावर, खरी सीतामाईसुद्धा प्रकट झाली. आता रामाला कळेनासे झाले "कोणती सीता आणि कोणती वेदवती". तेव्हा सीतामाई म्हणाल्या "देवा, ही वेदवती. तुमच्याशी लग्न व्हावे म्हणून हिने एवढे सगळे कष्ट सहन केले. आता तुम्ही हिच्याशी लग्न करावे."

पण, राम म्हणाला "या जन्मी मी एकपत्नीव्रत असल्यामुळे, या जन्मी तरी हे शक्य नाही. मी पुढे बालाजी म्हणून अवतारात वेदवतीशी लग्न करेल."

२. द्वापर युगात यशोदामाई कृष्णाला म्हणाली "कृष्णा, मी तुझे सगळे बालपणीचे खेळ पाहिले. पण, तुझा लग्नसोहळा काही पाहायला मिळाला नाही.

कृष्ण म्हणाला "आई, काळजी करू नकोस. मी पुढच्या बालाजी अवतारात तुझे हे ही स्वप्न पूर्ण करेन."

३. पूर्वी कालहस्ती नामक शहरात माधव नावाचा एक ब्राम्हण रहात होता. माधव अगदी वेदसंपन्न होता. घरी आई-वडील, बायको असा परिवार होता. एकदा भर दिवसा कामातुर होऊन माधवाने पत्नीला कामक्रीडेसाठी विचारले. पत्नी म्हणाली "तुम्ही एवढे विद्वान ब्राम्हण असूनही दिवसा कामक्रीडा कसे काय करू इच्छिता?"

पण, माधवाच्या प्रबळ इच्छेमुळे तिचे काहीच चालले नाही. शेवटी, "घरी सासू सासरे आहेत. त्यांच्यासमोर हे व्यवस्थित दिसणार नाही". म्हणून ती माधवाला म्हणाली "तुम्ही पुढे वनात निघा. मी पाणी आणण्याच्या बहाण्याने मागून येतेच."

पुढे वनात गेल्यावर, माधवाला तिथे एक स्त्री दिसली. तिच्या सौंदर्याने घायाळ होऊन माधवाने तिला कामक्रीडा करण्यासाठी उद्युक्त केले. पुढे ती म्हणाली "आता तुम्ही माझ्यासोबतच रहा".

पुढे १२-१५ वर्षं, आई-वडील, बायको-मुलांना विसरून माधव तिच्याबरोबरच राहिला. काही काळाने ती मरण पावल्यावर त्याला आपल्या कृत्यांचा पश्चाताप होऊ लागला. त्याने विचार केला "आता कोण मला तारेल? मी एवढे महापाप केले. घरी पत्नी असूनही मी परक्या स्त्रीसोबत आयुष्य घालवले. आई-वडिलांचीसुद्धा पर्वा केली नाही." आता या पापातून कसा बरे मी मोकळा होईल?"

शेवटी माधव तीर्थयात्रेला निघाला. रस्त्यात जाणाऱ्या वाटसरूंने त्याला तिरुमला पर्वतावर (ज्याला त्या काळी शेषाद्री, वेंकटाद्री, अंजनाद्री वगैरे नावाने ओळखले जात होते) जायला सांगितले. पर्वतावर चढतानाच त्याला उलट्या होऊन त्याची पापे जळून नष्ट होऊ लागली. तिथे अजूनही काही देव, देवाच्या दर्शनासाठी आले होते. ते माधवाला पाहून म्हणाले "तू आता इथेच प्राण सोड. पुढील जन्मी साक्षात श्री लक्ष्मी तुझ्या पोटी जन्म घेईल आणि साक्षात श्री विष्णू तुझे जावई होतील."

हे ऐकून माधवाने तिथेच प्राण सोडले.

४. कलियुगात सगळ्या ऋषी-मुनींना प्रश्न पडला होता. "आपण जे यज्ञ वगैरे करतो, ते सगळे कोणाला अर्पण करायचे?" त्यासाठी सर्व ऋषींने, भृगु ऋषींना सर्व देवांची परीक्षा घेण्यासाठी पाठवले. भृगु ऋषी आधी ब्रम्हदेवाकडे गेले. ब्रम्हदेव सभेत मग्न असल्याने त्यांचे भृगुऋषींकडे लक्ष गेलेच नाही. भृगु ऋषींने ब्रम्हदेवाला श्राप दिला "तुझी पूजा पृथ्वीवर केली जाणार नाही."

मागे एकदा ब्रह्मदेव श्री विष्णूला म्हणाले असावेत "देवा, भक्त आणि राक्षससुद्धा माझ्यासाठी तपश्चर्या करतात. मी प्रसन्न झालो की काहीही वरदान मागतात. वरदान मिळाले की ते अनाचार, दुराचार करू लागतात. आता, मी दिलेल्या वरदानामुळे, तुम्हाला या सृष्टीचे पालनपोषण करण्यात समस्या निर्माण होतात. तेव्हा काहीही करा आणि मला यातून सोडवा".

आता, ब्रम्हदेवाला हा श्राप दिला गेला नसता तर? पृथ्वीवरच्या सर्व लोकांनी ब्रम्हदेवाची तपश्चर्या करून त्याच्याकडून हवे ते वरदान मागून घेतले असते. असेही, ब्रम्हदेव म्हणजे सृष्टीचा निर्माण करणारा देव, एक शास्त्रज्ञ. ब्रम्हदेवाने सृष्टीमध्ये वेगळे वेगळे प्राणी निर्माण करायचे, की लोकांना वरदान देत बसायचे?

पुढे ऋषी महादेवाकडे गेले. महादेव पार्वतीमातेसोबत एकांतात बसले होते. आधीच, महादेव एकदा तपश्चर्या करायला लागले की ४-५००० वर्ष तपश्चर्याच करत बसतात. देवी पार्वतीला किती बोर होत असेल त्या काळात. नेमके महादेव तपश्चर्या संपवून उठलेच असतील. "जरा काही पत्नीसोबत दोन-चार प्रेमाच्या गोष्टी बोलायला जावे आणि कोणीतरी येऊन डिस्टर्ब करावे" असे त्यांना वाटले असणार.

(काल मी गाडीवरून ऑफिसला जाताना याच वाक्यावर विचार करत चाललो होतो. "किती भारी वाक्य लिहिले आहे मी. अगदी पार्वतीमातेच्या मनातले लिहिले आहे की नाही?". "महादेव एकदा तपश्चर्या करायला लागले, की ४-५००० वर्ष तपश्चर्याच करत बसतात". तेवढ्यात सिग्नलला थांबल्यावर, शेजारच्या गाडीवर बसलेला माणूस, त्याच्या मागे बसलेल्या माणसाला म्हणत होता "आपले असेच असते". जणू काही महादेवच बोलला होता. "आपले असेच असते, आपण एकदा तपश्चर्या करायला बसलो, की ४-५ हजार वर्ष

उठतच नाही").

पण ऋषींचे कामसुद्धा महत्वाचे होते. कलियुगात कोणत्या गुणाची पूजा करावी किंवा कोणत्या गुणाने आपण वागावे हा मोठ्ठा प्रश्न होता.

असू दे, खरे खोटे देवालाच माहिती.

तर, "अवेळी कोण आले?" म्हणून महादेवांना राग आला आणि ते ऋषींना मारायला धावले. ऋषींने महादेवालाही श्राप दिला. "पृथ्वीवर तुझ्या लींगाचीच पूजा केली जाईल."

खरेतर, याला श्राप म्हणावे की वरदान? कारण, यानंतरच आपल्या पृथ्वीवरील लोकांना लिंगपुराणाचे महत्व समजले. शिवलिंगाचे महत्व समजले.

पुढे ऋषी विष्णूदेवाकडे गेले. एव्हाना, आधीच्या दोन ठिकाणी मिळालेली वागणूक पाहून ऋषींना खूप राग आला होता. "विष्णू देवाचेही आपल्याकडे लक्ष नाही" हे पाहून त्यांने थेट देवाच्या छातीवरच लाथ मारली. एवढा अपमान सहन करूनही देवाने ऋषींचीच माफी मागून त्यांचे पाय वगैरे धुतले.

हे पाहून श्री महालक्ष्मीला राग आला. तिने ऋषींना निर्धन होण्याचा श्राप दिला. पण, श्री विष्णू मात्र त्यांच्या पाठीशी उभे राहिले. "आपल्या प्राणप्रिय पतीवर एका ऋषींने पायाने प्रहार केला" हे पाहून, रुसून श्री लक्ष्मी कोल्हापूरला निघून आली. कोल्हापूरमध्ये, महाराष्ट्रामध्ये, महालक्ष्मीला लोक कल्याणासाठी भरपूर कामे करायची होती. म्हणूनच, देवाने अशी योजना केली असावी.

(हे लिहित असताना, ३ दिवसांअगोदर गणपती बाप्पांचे आगमन झाले होते. आज गौरी आगमन होणार होते. आमच्या घरी गौरींचे मुखवटे, १२ही महिने घराच्या मुख्य देव्हाऱ्यातच असतात. रोज त्यांचे पूजन केले जाते. त्यांचे विसर्जन केले जात नाही. किंवा, गौरी-गणपतीनंतर त्यांना कपाटात ठेवून दिले जात नाही. तर, गणपती बाप्पांचे आगमन झाले होते आणि आज गौरींचे आगमन होणार होते. गौरींचे दोन्हीही मुखवटे, आमच्या घरात बालाजीच्या मुर्तीशेजारीच ठेवले असतात. मुखवटे देव्हाऱ्यातून उचलून, पुढे त्यांना गौरी आगमनासाठी मांडले जाते. हे दोन गौरींचे मुखवटे म्हणजे, "एक महालक्ष्मीमाता असावी आणि दुसरी पार्वतीमाता" असे मला नेहमी वाटते. मला नेहमी, श्री महालक्ष्मीला - महालक्ष्मीमाता म्हणून संबोधावे वाटते. श्री पार्वतीला - पार्वतीमाता म्हणून संबोधावे वाटते. पण, महादेवाला मी महादेवच म्हणतो. आणि विष्णूला - विष्णूच म्हणतो.

देवच म्हणून गेला आहे "तुम्ही मला ज्या रुपात इच्छिताल, त्याच रुपात मी तुम्हाला भेटेल." साईबाबा म्हणालेच आहेत "जया मनी जैसा भाव, तया तैसा अनुभव."

तर, मी देवाला माझ्या मित्राच्या रुपात मागितले. तो मला मित्र म्हणूनच मिळाला. त्याला वडीलरुपात मानले असते, तर त्याच्यासमोर चुकीचे वागता आले नसते. जसे आपण बहुतेकजण, तरुणपणी आपल्या वाईट सवयी वडिलांना सांगायला घाबरतो. तसे माझे आणि देवाचे नाते होऊन बसले असते. त्यापेक्षा

देव, मित्र म्हणून सगळ्यात सोयीस्कर. त्याला अरे तुरे करता येते, त्याच्याशी भांडताही येते. मित्र म्हणजे शक्यतो समवयस्क असल्यामुळे, त्याच्यात आणि आपल्यात कोणताही पडदा न ठेवता त्याला सगळे मनातले सांगता येते.

मी लहान असताना, तू ही लहान झाला होतास....
तरुण मी झालो तेव्हा, तू ही तरुण झाला होतास....
मन तुझे तसेच होते, रूप कसे बदलत होतास?
प्रत्येक वयात मला तू, माझ्यासारखाच दिसत होतास...

आणि देवीला आई मानायचे कारण म्हणजे, कितीही चुका केल्या तरी, जगात फक्त आईचेच हृदय आपल्या मुलाला माफ करू शकते. कदाचित देव कठोर होऊ शकतो. पण, देवी कधीच कठोर होऊ शकत नाही (फक्त भक्तांसाठी बरं का). देवाला आपल्याला एखादे वरदान द्यायचे नसले, तर देवीच आपल्या मुलासाठी (आपण) देवाचे डोके आउट करत असेल, आपल्याला हवे ते देण्यासाठी.

जसे मला देव मित्र म्हणून मिळाला. तसेच आईला, देवी मैत्रीण म्हणून मिळाली. दर वेळेस, प्रत्येक सुख-दु:ख ती देवीलाच सांगू लागली. देव तसा हट्टी असतो. देव सहजा सहजी बोलत नाही आणि, फुलाच्या रुपात संकेतसुद्धा देत नाही. पण, देवी नेहमीच माझ्या आईला, डोक्यावरचे फूल खाली टाकून फुलरुपात संकेत देत राहिली. प्रत्येक वेळेस, "तू केलेल्या सेवेमुळे मी आनंदित आहे" हे सांगत राहिली. आणि आईची जिवलग मैत्रीण झाली.

देवी, तू नसतीस तर, जिवंत मी राहिले नसते....
खेळ झालाच होता आयुष्याचा, सुखाचे दिवस पाहिले नसते....

तर, आज गौरी आगमनाच्या दिवशी, हे गौरींचे मुखवटे देव्हाऱ्यातून उचलून मुख्य हॉलमध्ये आणले गेले. देव्हाऱ्याची सगळी कळाच निघून गेल्यासारखी वाटली. जणू काही देव्हाऱ्यातले श्री विष्णू आणि श्री महादेव, त्यांच्या पत्नीसाठी संदीप आणि सलीलचे गाणे गात असावेत "नसतेस घरी तू जेव्हा, जीव तुटका तुटका होतो, जगण्याचे विरती धागे, संसार फाटका होतो".

एक विचार केला तर समजते, महादेव आणि पार्वतीमातेच्या प्रेमकहाणी सारखी, या जगात दुसरी कोणतीही उत्कट, रहस्यमय प्रेमकहाणी नसावी. आजकाल सिनेमांमध्ये दाखवले जाते तसेच, महादेव म्हणजे योगीराज, महादेव म्हणजे विरक्त. महादेव म्हणजे, सगळे स्वत:चे असूनही त्यात कोणतीही आसक्ती नसणारा देव. आणि सतीमाता म्हणजे श्रीमंतीचा कळस. ती राजा दक्षाची पुत्री. सिनेमामध्ये दाखवतात तसेच, राजा दक्षाला, महादेव असा विरक्त, जंगलात राहणारा म्हणून नापसंत. पण, मातेने अशक्यप्राय अशी व्रते, तपस्या, उपासना करून, शेवटी महादेवाला प्राप्त केलेच.

पुढे, वडिलांच्या हातून महादेवाचा अपमान झाल्यामुळे, तिने स्वत: अग्निप्रवेश करून आयुष्य संपवले. पण, पुढच्याही जन्मी तिने महादेवांनाच पती म्हणून पुन्हा मिळवलेच.

तसेच, आपण धर्मेंद्र आणि हेमा मालिनीचे सिनेमेसुद्धा पाहिलेच आहेत. धर्मेंद्रच्या सिनेमांमध्ये, त्याची पत्नी म्हणून बहुतेक वेळा हेमा मालिनीच असते. अगदी तसेच, श्री विष्णूच्या पृथ्वीवरच्या अवतारातल्या सिनेमात, म्हणजे पृथ्वीवरच्या सिनेमात, नेहमी महालक्ष्मीच त्याची पत्नी असते. नाही का?

सिनेमावरून आठवले, देवांच्या राज्यातही चित्रपटसृष्टी असेल का? पृथ्वीवर जसे करण जोहर, यश चोप्रा, आशुतोष गोवारीकर वगैरे वगैरे दिग्दर्शक आहेत. तसेच, देवांच्या राज्यातही कोणीतरी दिग्दर्शक असेलच की. देवांच्या राज्यात श्री विष्णू, श्री ब्रम्हदेव, श्री महादेव, सौ महालक्ष्मी, सौ दुर्गा, सौ सरस्वती वगैरे वगैरे मोठे मोठे दिग्दर्शक. त्याप्रमाणेच, पृथ्वीवर हिरो म्हणून सलमान खान, अमिताभ बच्चन, शाहरुख खान, अजय देवगण, आमीर खान वगैरे वगैरे कलाकार आहेत. तसेच देवांच्या राज्यात, श्री विष्णू, श्री महादेव, श्री गणपती, सौ महालक्ष्मी, सौ दुर्गा, सौ सरस्वती वगैरे वगैरे चित्रपटातले कलाकार. पृथ्वी म्हणजे देवांची रंगभूमी.. हॉलीवूड, बॉलीवूड, फिल्मीस्तान वगैरे वगैरे)

असो, आपण देवाच्या बालाजी अवताराची गोष्ट समजून घेत होतो. तर, श्री लक्ष्मीने वैकुंठ सोडल्यापासून विष्णूचेही मन रमेनासे झाले. आपल्या पत्नीच्या विरहात श्री विष्णू गाणे म्हणतच पृथ्वीवर अवतरले "नसतेस घरी तू जेव्हा, जीव तुटका तुटका होतो.....".

ते थेट तिरुमला पर्वतावरच अवतरले. हाच त्यांचा बालाजी अवतार. ते पृथ्वीवर अवतरले, ते कोणाच्याही पोटी जन्म न घेता. आणि, ते पृथ्वीवर अवतरले तेव्हा ते थेट लग्नाच्या वयाचे होते. कदाचित यामुळेच, त्यांच्या बालाजी या अवतारला दशावतारांपैकी एक मानले जात नसावे.

पुढे त्यांना पूर्व जन्मीची आई म्हणजेच यशोदा भेटली. तसेच, मागील जन्मीचा माधव, या जन्मी चोल राजा म्हणून जन्माला आला होता. त्याच्या पोटी, मागील जन्मीची वेदवती, साक्षात पद्मावती म्हणून अवतरली.

अशा प्रकारे, रामअवतारात श्री विष्णूचे जे लग्न श्री महालक्ष्मीने ठरवले होते. ते लग्न करून, त्याने सीतेला आणि वेद्वतीला दिलेले वचन निभावले. त्याच लग्नात देवाने माधव ब्राम्हणाचा उद्धार केला. आणि, कृष्ण जन्मीच्या यशोदामाईचे "स्वत:चा लग्न सोहळा" दाखवण्याचे स्वप्न पूर्ण करायचे वचन पूर्ण केले.

तसेच, श्री महालक्ष्मीला कोल्हापूरात अवतार घ्यावा लागेल अशी परिस्थिती निर्माण केली. आणि कोल्हापूरवर, महाराष्ट्रावर उपकार केले. एवढेच नाही, तर ब्राम्हणांच्या पाठीशी उभे राहून, त्यांना पैशाअभावी वाममार्गाकडे जाण्यापासून वाचवले.

याशिवाय, शिवलिंगाचे महत्व आपल्याला समजावले. ब्रम्हदेवाला, सारखे वरदान मागणाऱ्या लोकांच्या तावडीतून सोडवले.

अश्या प्रकारे देवाने एकाच दगडात ४-५ पक्षी मारले. म्हणजेच, एकाच जन्मात ४-५ वचने पूर्ण केली. (पूर्ण गोष्ट वाचण्यासाठी वेंकटेश महात्म्य वाचावे).

हे सर्व सांगण्याच्या मागचे कारण म्हणजे, देवाच्या या प्रत्येक अवतारामागे काही तरी कारणे होती. देवाने आपणा सर्वांना नेहमीच दाखवून दिले आहे, "की पुढे असेच होणार आहे तुमच्याही आयुष्यात". उदा. रामायण घडले ते स्वार्थासाठी. महाभारत घडले अधर्मापोटी इत्यादी.

प्रत्येक मनुष्यासोबत, देवाने सांगितलेल्या, देवाने दाखवलेल्या गोष्टी घडतच असतात. आपल्या सगळयांच्या आवडीचेच उदाहरण घेऊ. गरीब मुलगा आणि श्रीमंत मुलीची. किंवा श्रीमंत मुलगा आणि गरीब मुलीची प्रेमकहाणी आपल्याला काही नवीन नाही. घडते आहे की नाही अजूनही, महादेवाच्या आणि पार्वतीमातेच्या प्रेमकहाणी सारखेच?

याचाच अर्थ असा की, प्रत्येक माणूस त्याच्या आयुष्यात कधी ना कधी माधव बनत असावा, राम बनत असावा, कधी रावण बनत असावा, कधी कृष्ण बनत असावा. आणि प्रत्येक स्त्री तिच्या आयुष्यात, कधी सीता, कधी पार्वती, कधी रुक्मिणी, कधी राधा बनत असावी, नाही का?

पण, मला नेहमीच प्रश्न पडायचा की, जर देवाच्या इच्छेनेच सगळे घडते तर आपण स्वर्गात किंवा नरकात का जातो? आहे का उत्तर?

असो, तर आमचा सोहम म्हणजे, असाच एक व्यक्ती,

१. नुकताच देवाच्या वचनांवर विश्वास बसलेला.
२. विष्णूच्या दशवतारांने भलताच प्रभावित झालेला.
३. चांगले विचार मनात आल्यावर, थेट स्वत:ला देव समजणारा. वाईट विचार मनात आल्यावर, थेट स्वत:ला रावण समजू लागणारा. आपण माणूस आहोत, हा सुवर्णमध्य माहितीच नसणारा.
४. अर्ध्या हळकुंडाने पिवळा झालेला.
५. रात्री हळदीचे दूध पिऊन, सकाळीच रंगातला फरक तपासणारा.
६. आईचे पाहून प्राण्यांवर प्रेम करणारा.
७. सोहम, सध्या एक प्रयोग करण्यात दंग आहे. प्रयोग म्हणजे, गुरु आणि देव पाठीशी असल्यावर एखादा माणूस काय काय करू शकतो? हे त्याला दाखवून द्यायचे आहे.

तर आज गौरीविसर्जनाचा दिवस होता. गेले काही दिवस, मी ऑफिसमधून आलो की, हात-पाय धुवून चहा वगैरे घेऊन, थेट लॅपटॉप काढून गोष्ट पूर्ण करण्याच्या मागे पडलो होतो. माझा दिनक्रम म्हणजे असा की, साधारणपणे ६ वाजता घरी पोचतो. फ्रेश होऊन, १५-२० मिनिटात लॅपटॉप काढतो. ८ वाजेपर्यंत लिखाण करायचे. नंतर अंघोळ, आरती वगैरे करून पुन्हा लॅपटॉप घेऊन बसायचे. साधारणपणे १०.३०-११

वाजता जेवण करायचे. मनात आले तर पुन्हा लॅपटॉप नाहीतर टी.व्ही वर एखादा सिनेमा पाहायचा.

तर, आज गौरी विसर्जनाचा दिवस होता. कालच, म्हणजे गौरी भोजनाच्या दिवशी, आमच्या घरी सत्य-नारायणाची पूजासुद्धा झाली होती.

एका दीड फूट बाय दीड फुटाच्या टेबलवर गणपती स्थापना केली होती. त्यापुढे, गणपतीच्या दोन्ही बाजूंना दोन गौरी उभ्या होत्या. आणि त्या टेबलच्या खाली, दोन्ही गौरींच्या मध्ये, चौरंगावर सत्यनारायणाची पूजा मांडली होती.

गौरी विसर्जन करताना माझी नजर सत्यनारायणाच्या पुजेकडे जातच नव्हती. जणू काही, पैश्याचा ढीग दिसला, तर तो कोणाच्या कृपेमुळे आपल्याला दिसतो आहे. हे आपण विसरतो. आणि दिसतो तो फक्त पैसा. असेच काही माझे झाले असावे.

थोडक्यात काय तर, सत्यनारायणाच्या पुजेकडे माझे लक्षच जात नव्हते. अचानकच माझ्या लक्षात आले "अरे, ही तर सत्यनारायणाची पूजा आहे".

मी मनातल्या मनात विचार करू लागलो "म्हणजे, समोर महालक्ष्मी असताना विष्णूकडे आपले लक्ष गेले नाही". विचार करता करता मी महालक्ष्मी देवीची स्तुती करू लागलो." मी देवीला म्हणालो "माते, नेहमी मी विष्णूची पूजा करतो. तरीही, फूलाच्या रुपात संकेत देणारी तू असतेस. आज तू समोर असताना, विष्णूकडे माझे लक्षच गेले नाही की ग."

तेवढ्यात टीव्ही मधून पुरुषाचा आवाज ऐकू आला "ऐकतोय मी" आणि मी भानावर आलो.

जणू काही देवाने, खोचकपणे मला टोमणा मारून दाखवून दिले होते "बेट्या, मी इथेच आहे आणि तूझे विचार मी सुद्धा ऐकत आहे. माझ्याकडे लक्ष जात नाही होय? आता दाखवतो तुला".

देवालासुद्धा भांडायला, रुसायला कोणीतरी नको का?

आपण आपली सगळी गाऱ्हाणी घेऊन देवाकडे जातो. देवापासूनच पुढे सगळी सृष्टी निर्माण झाली. याचा अर्थ असा की, सृष्टी निर्माण करण्याअगोदर देव एकटाच होता. मग, देवाला एखादे संकट पडल्यावर तो कुठे जात असेल? तो कोणाला सांगत असेल? आता तुम्ही म्हणाल, देवाला कसले आले संकट? पण नाही, तसे नसते. जरा विचार करा, जर एकच मुलगी दोन किंवा तीन मुलांना आवडत असेल. आणि तीनही मूल एकाच देवाची भक्त असतील. आणि प्रत्येक जण देवाकडे त्याच मुलीचे प्रेम मागत असेल तर? देवाने कोणाचे मागणे मान्य करावे? आहे की नाही धर्मसंकट? हे फक्त उदाहरण होते.

असो, देवाला सुद्धा आशीर्वादाची गरज नसते का? देवाला कोण म्हणत असेल, "भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे.?"

तर हो, देवाला सुद्धा आशीर्वादाची गरज असतेच की. तर, सगळ्यात आधी देवाला आशीर्वाद देतो

"देवा, तुझी अशीच भरभराट होत राहो. तुझ्या गोष्टी, तुझ्या लीला सगळयांपर्यंत पोचोत. माझ्यासारखेच, तुलासुद्धा भरपूर लोकांचे आशीर्वाद मिळोत. तुला जे हवे असेल ते मिळो."

आणि आता सोहमच्या विषयावर येतो.

माझ्या गोष्टीचे मुख्य पात्र कोण? तर "सोssहम,."

या साल्याचे नाव पण भारीच आहे. सोहम.

सोहम का? तर तुम्ही ऐकलेच असेल, आपण जेव्हा आईच्या पोटात असतो. आपण अशा ठिकाणी अडकलेलो असतो, की जिथे आपल्याला हालचाल सुद्धा करता येत नाही. काही दिसत सुद्धा नसते. अगदी विष्ठेमध्ये पडलेलो असतो आपण.

आपण तेव्हा देवाला खूप विनवतो, "देवा मला यातून बाहेर काढ. मी तुला कधीही विसरणार नाही." देव म्हणतो "ठीक आहे. पण बघ हं?". मग आपला जन्म होतो. जन्म झाल्या झाल्या, देवाच्या मायेच्या प्रभावाने आपण विसरून जातो की "आपण देवाला काय वचन दिले होते". म्हणजे, आईच्या पोटात असताना ज्या आत्म्याला माहिती असते, की आपण देवाशी बोलत आहोत. तोच आत्मा जेव्हा शरीररूपाने जन्म घेतो, तेव्हा तो विसरलेला असतो की तो कोण आहे.

आपण स्वत:ला सुद्धा विसरलेलो असतो. आणि आपण रडायला सुरु करतो. आपण रडतो कसे? तर, कोssहम, कोssहम. म्हणजे मी कोण आहे?

खरच सांगतो देवा तुला, खरंच तुला विसरलो होतो...
हात तुझा सुटला तेव्हा, आयुष्यातून घसरलो होतो....
खूप वाईट झालो होतो, सगळयांच्या नजरेतून उतरलो होतो....
पंखसुद्धा तुटले होते.....अंगभर कातरलो होतो...

आणि सोssहम, सोssहम म्हणजे, मी स्वत: परमात्म्याचा अंश आहे. ही जाणीव होणे. म्हणजे आपण स्वत:ला जाणणे.

शेवटी तू आठवलास, संकट पडले असताना...
तू सुद्धा रडत होतास.....मला सावरून घेताना....
हात दिलास मला, मला सुचत नसताना.....

अश्रू होते डोळयामध्ये... तुझे मोठेपण समजताना.....

आता आपण सगळे तर त्याचे अंश आहोत पण लक्षात राहिलेले नाही.

जेव्हा स्वत: विष्णू राम रुपात जन्म घेऊन आला. नंतर जेव्हा रावणाचा वध करण्याची वेळ आली, तेव्हा स्वभावाप्रमाणे रामाला रावणाची दया येऊ लागली. इंद्र देवाला स्वत: त्याला आठवण करून द्यायला लागली की "तुम्ही स्वत: परमात्मा आहात, त्याचा अंश आहात. आणि तुम्हीच, म्हणजेच काळाने, रावणाचा हाच मृत्यू समय निश्चित केला आहे". नंतर रामाने रावणाचा वध केला.

असेच काही हनुमानाचे झाले. हनुमान तर साक्षात श्री शंकराचा अवतार. पण जेव्हा जाम्बुवंताने आठवण करून दिली, तेव्हाच त्याला स्वत:च्या शक्तीची जाणीव झाली. आणि हनुमान उड्डाण घेऊन लंकेला गेला.

तर, साक्षात देवाला सुद्धा जिथे, आपण परमात्म्याचा अंश आहोत याचा विसर पडू शकतो. तिथे आपण तर मनुष्य आहोत.

लिहिताना मला लक्षात आले, ज्या रामाने रावणाशी युद्ध करण्याच्या अगोदर शंकराचे ज्योतिर्लिंग स्थापन केले आणि शंकराची पूजा केली. तोच महादेव, हनुमान बनून रामाची सेवा करत होता. कशी भारी मैत्री आहे विष्णूची आणि महादेवाची.

मी पुन्हा विचार केला "पात्रामध्ये परिपूर्णता आणायची म्हणजे काय करावे लागेल?" तर त्या व्यक्तीचे विचार काय असतील? ती व्यक्ती कशी वागली? ती एखाद्या वेळी, एखाद्या घटनेत, तशी का वागली? याबद्दल विचार करायचा आणि लिहायचे. थोडक्यात काय? तर आमीर खान बनायचे, Mr PERFECT बनायचे.

आता थोडी सोहमची गोष्ट सुरु करतो.

तर या बाबाला जेव्हा सोहम या शब्दाचा अर्थ समजला. पुढचे चार दिवस याचा थाट, याची चाल, अगदी बघण्यासारखी होती.

## ७. सोहमच्या आजोबांचे पुण्यात येणे, आई-बाबांचे लग्न, मोठ्या बहिणीचे निधन (स्वर्गवास)

गोष्टीतल्या मुख्य पात्रापर्यंत, म्हणजे सोहम पर्यंत येण्यासाठी थोडी पार्श्वभूमी सांगावी लागेल, नाही का?. तर, सोहमचे आजोबा श्री. लक्ष्मणराव. आता हे आजोबा म्हणजे वडिलांचे वडील. गोरे पान, सरळ नाक, मध्यम उंची, सडपातळ अंग आणि अंगात चपळपणा. मूळ गाव मराठवाड्यातील, बीड जिल्ह्यातील, देशमुखवाडी. म्हणूनच यांचे आडनाव देशमुख पडले असावे. आता, मराठवाडा म्हणजे दुष्काळग्रस्त प्रदेश. बीड जिल्हा म्हणजे त्या दुष्काळग्रस्त प्रदेशाचा महाराजा. आज २१ व्या शतकात सुद्धा, तिकडे नळाने पाणी आले म्हणजे चमत्कार वाटतो. कधी एस.टी ने त्याभागात जाणे झाले तर कळेल तुम्हाला, अगदी दूर दूर पर्यंत पसरलेली ओसाड माळराने आहेत. प्रश्न पडतो की "आधीच कलियुग, त्यात इकडे एवढा दुष्काळ, माणसे माणूस राहिली नाहीत, मग जनावरे पाणी कुठून मिळवत असतील?"

पण, हे गाव म्हणजे त्यातल्या त्यात बरे, डोंगरांने वेढलेले. आता हे डोंगर म्हणजे, डोंगर नाहीत, टेकड्या आहेत. दुधाची तहान ताकावरच भागवू.  हे गाव म्हणजे, अगदी मराठवाड्यातले महाबळेश्वरच म्हणू की. गव्हाची, कापसाची, उसाची (थोडी फार) शेती. शेताच्या बाजूला असणारी आंब्याची, केळांची, नारळांची झाडे, आजूबाजूला असणारे तलाव. जवळच एका टेकडीवर डोंगरकिन्ही देवीचे मंदिर आहे. डोंगरकिन्ही देवी मुळेच या गावाचे नाव डोंगरकिन्ही पडले असावे. तर, सोहमचे कुटुंब देशमुखवाडीचे, पण त्यांचे ग्राम दैवत डोंगरकिन्ही देवी. जवळच, तुळजाईचे मंदिर. अशी भरपूर मंदिरे आहेत जवळपास.

संध्याकाळी गार वारा सुटला, की मनावरचा सगळा शीण निघून जातो देशमुखवाडीत. एखाद्या हिवाळयातल्या संध्याकाळी गावी गेले, की अगदी राजस्थान मधल्या माउंट अबू किवा उदयपुरला आल्या सारखे वाटते. तशीच नागमोडी वळणे, तसेच रस्ते, रस्त्याच्या दोन्ही बाजूला वेगवेगळी झाडे. दोन-पाच किलोमीटर वर असणारी एखादी चहाची टपरी, एखादे हॉटेल. हॉटेल मध्ये मिळणारी गावराण भाकरी-भाजी लई भारी वाटते. संध्याकाळी सुटणारा गार वारा अंगावर झेलताना मन अगदी प्रफुल्लीत होऊन जाते. पुण्यात कसे सगळीकडे कार्बनडाय-ऑक्साईडचेच जाळे. पण, गावाकडे नैसर्गिक हवा.

तर, सोहमचे आजोबा तिकडचेच. आजोबा कधी कधी सोहमला सांगायचे "आपण इकडचे वतनदार,

आपली खूप मोठ्ठी जमीन होती, एक किल्ला (वाडी) सुद्धा होती. आपल्याला ती पेशव्यांने दिली होती. आपले पूर्वज खूप दानशूर होते. जेव्हा एकदा दुष्काळ पडला होता, तेव्हा आपले पूर्वज, किल्ल्याच्या भिंतीवर उभे राहून गावातल्या लोकांना अन्न-धान्य वाटायचे." पण नंतर कुळ-कायदा लागला आणि आपली सगळी जमीन सरकारी दफ्तरात जमा झाली".

पूर्वी सांगितल्याप्रमाणे हा तसा दुष्काळग्रस्त प्रदेश. साधारणपणे १९४०-४५ ची गोष्ट असेल. फार दुष्काळ पडला होता. त्यात कसल्या कसल्या रोगांच्या साथी पसरल्या होत्या. माणसे मुंग्यांसारखी मरत होती. लोक गाव सोडून जाऊ लागले होते. रात्रीत गावं उजाड पडत होती. आजोबा सुद्धा "गाव सोडून जाऊ" म्हणत होते.

शेवटी आजोबांने ठरवले, "आता आपल्याला सुद्धा काहीतरी ठरवायलाच हवे. "इथे राहून उपाशी मरायचे? का शहरात जाऊन काहीतरी पोटापाण्याचे पहायचे?" बरं, पण जायचे कुठे?" शहरात कोणी ओळखीचे नाही. रहायचे कुठे?" बरोबर तीन भाऊ आहेत. बायको आहे. त्यांना कसे सांभाळायचे?" पण, इकडे राहून मरण्यात तरी काय फायदा आहे?". आजोबांने सर्व लवाजमा उचलला आणि पुणे गाठले.

त्यांचे नशिब बलवत्तर होते म्हणा. शिवाजीनगरलाच त्यांना शास्त्री भेटले. जेव्हा आजोबांनी परिस्थिती सांगितली, शास्त्री म्हणाले "काळजी करू नका, मी राहायला जागा देतो" पण, एका अटीवर, जेव्हा तुमचे स्वतः चे घर होइल, तेव्हा फक्त इमानदारीने माझे घर परत द्यायचे." त्या काळी शब्दाला फार किंमत होती. आजकाल शब्द मोडायला किंमत आली आहे.

चला, घराची तर सोय झाली. ती सुद्धा कसबा पेठे सारख्या पुण्याच्या मध्यवर्ती भागात. इथून कसे, मनपा, शिवाजी नगर, मंडई, तुळशीबाग, रविवार पेठ, पुण्याचे सगळे मार्केट जवळ आहे. पुण्यातला गणेशोत्सव तर जगप्रसिद्धच आहे.

तर, आजोबांना मस्तपैकी पुण्याच्या मध्ध्यात रहायला जागा मिळाली. तसेच, किराणा दुकानात मुनीम म्हणून नोकरीसुद्धा मिळाली. दोन्ही भाऊ सुद्धा शिक्षण संपवून सरकारी खात्यात कामाला लागले. दरम्यान, आजोबांचा संसार चांगलाच फुलू लागला होता. ४ मुले आणि २ मुली झाल्या.

ब्राम्हण असल्यामुळे, शेजारील वेद-शाळेतच सगळया मुलांचे शिक्षण झाले. कालांतराने स्वतःची जागा सुद्धा झाली पुण्यात. पण, "गरीब परिस्थिती आणि लोकसंख्या फार" अशी अवस्था झाली. जागा छोटी

वाटू लागली. चारशे स्क्वे-फुटात, सोहमचे आजी-आजोबा, त्यांची चार मुले आणि दोन मुली. आजोबांचे दोन भाऊ, त्यांच्या बायका, त्यांची दोघांची मिळून पाच मुले. असे सतरा जण होते तेव्हा.

व.पु.काळेंच्या "घर हारवलेली माणसं" या पुस्तकात लिहिलेल्या, "कुचंबणा" या गोष्टीप्रमाणेच, कदाचित घरातल्या सगळया लोकांची "कुचंबणा" होत असेल त्या काळी. काही खाजगी बोलायचे म्हणजे तर, "घरात इतर पंधरा लोकांसमोर कसे बोलायचे?" हा प्रश्नच पडत असेल सगळयांना. आणि मोठ्या आवाजापेक्षा हळू हळू आवाजात खुसुर-पुसुर ऐकू आली, की इतरांचे कान कसे टवकारले जातात? याची जाणीव आपल्या सगळयांनाच आहे.

असो, मुलींची लग्न होऊन त्या सासरी गेल्या आणि लोकसंख्या थोडी कमी झाली. पण आता मुलांची लग्न करायची होती. म्हणजे, लोकसंख्या परत वाढणार होती. आता या मुलांपैकी एक म्हणजे सोहमचे बाबा. बाबा तसे बुटके, अगदी मध्यम उंचीचे. उन्हात खेळून खेळून रंग सावळा पडलेला.

बाबा म्हणजे एक खुशालचेंडू व्यक्ती. काही असले तर त्याचा अभिमान नाही आणि काही नसले तर दुख: नाही. देवाची खूप कृपा आहे त्यांच्यावर. नेहमी लोकांनी त्यांचा अपमान केला. पण देवाने त्यांचा मान राखला. अगदी भोळा माणूस. वैदिक शिक्षण झालेलं, पण शाळेच्या शिक्षणात थोडे मागेच होते. नेहमी शिळे अन्नच खायला मिळाल्यामुळे, तशी बुद्धीला चालना कमीच मिळत होती. पण कधीच, शिळे अन्न सुद्धा टाकून दिले नाही बाबांनी. "अन्न हे पूर्ण ब्रम्ह" मानून, विटक्या-चीटक्या अन्नाचासुद्धा कधीच अपमान केला नाही त्यांने. इयत्ता तिसरी पास. पण, सरकारी नोकरी मिळाली.

तसा बाबांचा जन्म चतुर्थीचा. बाबांच्या कुंडलीत सूर्यदेव, दशम म्हणजे कर्मस्थानी. आणि मेषेचे (उच्च स्थानी) आहेत. चंद्रदेव सुद्धा वृषभ राशीत उच्चेचे आहेत. तसेच, चंद्रदेव अकराव्या स्थानी असल्यामुळे बाबांना सहज सरकारी नोकरी मिळाली. त्याकाळी फार काही पैसे नाही मिळायचे. पण, नोकरी सरकारी होती. म्हणजे, गेल्या दोन-तीन पिढ्यांपासूनच या कुटुंबावर देवाची कृपा असणार.

बाबा नेहमी सोहमला सांगायचे "मला लहानपणी मामाच्या घरी ठेवले होते, तिथे मी एकदा प्रात:विधी उरकण्यासाठी रानात गेलो आणि मला आवाज आला "येऊ का? येऊ का ? मी सुद्धा म्हणालो "ये". तेव्हा जमीन फाटण्याचा मोठ्ठा आवाज आला. आणि सोन्याने भरलेले सात हंडे बाहेर आले. मी खूप घाबरलो आणि घरी पळून आलो."

बाबांचे बोलणे ऐकून मला समजले "याचा अर्थ असा की, फक्त सोहमलाच आत्म्यांचा अनुभव नव्हता. ही तर खानदानी देणगी आहे वाटत".

तेव्हा सोहम बाबांना म्हणायचा, "बाबा, अहो कमीत कमी एक तरी हंडा घेऊन यायचात." किती श्रीमंत झालो असतो आपण?" पण जाउदे, बरे झाले, बाबांनी ते धन नाही घेतले. म्हणे, अशा धनामुळे तळतळाट लागतो." असा विचार करायचा सोहम.

असो, बाबांना कधीही प्रेम असे मिळालेच नाही. प्रेम मिळाले नाही - "माणसांचे". पण देवाने त्यांना भरभरून दिले. "नेहमीं, लोकांनी बाबांचा अपमानच केला. पण ही व्यक्ती नेहमी आनंदी. म्हणतात ना "अडाणी व्यक्तीला देव भेटतो पण ज्ञानी माणसाला भेटत नाही". सोहमचे बाबा तसे उदार मनाचे. नेहमी सर्वांना देतच होते. म्हणून देव त्यांना देत राहिला.

आता गोष्ट सोहमची आहे म्हणाल्यावर, सोहमची आई नको का?

लोकांना देव प्रसन्न होतो. पण, सोहमच्या पणजीला म्हणे भूत प्रसन्न होते. त्या काळात जात्यावर दळण दळणे, कपडे धुणे, स्वयंपाक करणे, अश्या कामात ते भूतच म्हणे तिला मदत करायचे. त्याला "जा" म्हणले तर म्हणायचे "म्हातारे, मी तुझ्यासोबतच जाईन, असा नाही जाणार".

अर्ध्या तासातच दिवसभराची काम संपवून, सोहमची पणजी दिवसभर देवाचे भजन करण्यात मग्न असायची. महत्वाचे म्हणजे, तिच्यासोबत असणारे भूत सुद्धा तिला साथ द्यायचे. आता याला भूत म्हणावे की देव? म्हणजेच, आत्म्यांनी सोहमशी संपर्क साधणे हे काही विशेष नव्हते.

सोहमच्या आईचे वडील श्री. देविदासराव. त्यांचा ही संसार चांगलाच फुलला होता. चार मुली आणि एक मुलगा.

आता त्या काळात एवढी मुले असण्याचे कारण म्हणजे, तेव्हा वैद्यक-शास्त्र (मेडिकल सायन्स) एवढे पुढे गेले नव्हते. दहा मुले झाली, की त्यातली २ वाचायची. सोहमच्या दोन्ही आजोबांची जास्त वाचली. "देवाची करणी आणि नारळात पाणी".

तर, सोहमची आई म्हणजे दोन नंबरची मुलगी. आई लहानपणी आज्जीला पैश्याची मदत करायची. शाळेबाहेर चिंचा, आवळे  विकायची. सोहमची आई म्हणजे मातृ-भक्त. मराठीमध्ये जे सिनेमे निघाले आहेत ना "चानी" मोहित्यांची मंजुळा" इत्यादी. तर, आई म्हणजे त्यातील मुख्य पात्र. आईचा सुद्धा शिक्षणात फारसा काही रस नव्हता. पण देवाची भक्ती मात्र मन लावून करायची. आई तशी लहानपणापासूनच हिंमतवान, मोठ्या मोठ्या संकटातून वाचलेली. वाचलेली म्हणण्यापेक्षा देवानेच वाचवलेली. आईच्या कुंडलीत, शनी महाराजांच्या आणि गुरु महाराजांच्या प्रभावामुळे, आई फार धार्मिक. तसेच, आईचे लग्न कन्या आणि रास

मिथुन. म्हणूनच, बुध महाराजांच्या प्रभावामुळे आई फार भोळी. भरपूर लोकांनी पुढे आयुष्यात आईची फसगत केली. पण, गुरु महाराज, शनी महाराज आणि बुध महाराज पाठीशी होते. म्हणूनच आई आत्तापर्यंत जगू शकली.

१९९८ साली आईची शनी महादशा चालू झाली. गेल्या १५-१६ वर्षांत, आधीच विनम्र असणारी आई इतकी विनम्र झाली, की जवळ जवळ सगळयांची नोकर असल्यासारखीच वागू लागली. अर्थातच, येणारे जाणारे काही पाहुणे, जे कर्तुत्वाने तिच्यासमोर शून्य होते. ते सुद्धा तिला तुच्छतेची वागणूक देऊ लागले.

सोहम कालच म्हणत होता "शनी महाराज, कृपया आईच्या अंगात थोडा माज भरा हो. तिचे लाचारपण पहावले जात नाही".

(ताजा कलम: दिनांक ०१.१०.२०१४. सोहम सांगत होता - कालच मी शनी महाराजांना म्हणालो "महाराज आईच्या अंगात थोडा माज भरा हो".......... आज सकाळीच जाग आली ती आईच्या बोलण्याने. आई माझ्यावर भयंकर भडकली होती. "तुमच्या ढुंगणावर लाथ मारून हाकलून द्यायला हवे".... वगैरे वगैरे म्हणत होती. पहिला फटका मलाच मिळाला वाटत. असो, "धन्यवाद शनी महाराज").

निसर्गाचा नियमच आहे, "आपण लोकांसाठी जेवढे करतो, तेवढेच त्यांने सुद्धा आपल्यासाठी करावे, ही आपली अपेक्षा असते." आईचेही तसेच होते, लोक आपल्याला जीवाला जीव देतील म्हणून, आई आधीच त्यांना जीव लावत बसायची. लोक तितक्याच प्रेमाने वागले नाही, की देवाला आणि नशिबाला दूषणं देत बसायची. आजकाल स्वार्थीपणे राहावे लागते, हे कधी समजलेच नाही तिला.

आता, या आई-बाबांचे शेवटी एकदाचे लग्न ठरले. बाबांची रास वृषभ आणि आईची मिथुन. ३६ गुण जमले. आई पुण्यासारख्या शहरात जाणार म्हणून, मामा, आजोबा, आज्जी सगळे खुष होते. पण, आई म्हणायची "मी काही पुण्याला जाणार नाही तुम्हाला सोडून". पण आली शेवटी.

आता सासरी आल्यावर सासुबाईंची एन्ट्री झाली. सासूबाई अगदी गोऱ्यापान, सतत नऊ-वारी साडीत असायच्या. सासूबाई फार कडक, शिस्तप्रिय होत्या. स्वयंपाकाच्या डब्ब्यांच्या ऑर्डर घ्यायच्या. घरी खानावळ चालवायच्या. सगळया सुनांना सुद्धा त्यांने कामे वाटून दिली होती. सुरुवातीचे काही दिवस चांगले गेले. पण, नंतर प्रत्येक घरी होते तेच झाले. तीच भांडणे, त्याच कटकटी सुरु झाल्या.

बाबांची सारखी बदली व्हायची. कधी परभणी, कधी औरंगाबाद, कधी परत पुणे. आई सुद्धा असायची बरोबर. त्यातच आई-बाबांना मुलगी झाली. पण, जास्त दिवस नाही जगू शकली. दीड दोन महिन्यांची असेल जेव्हा देवाघरी गेली.

परवाच आई सांगत होती "त्याकाळी सोहमची मोठी बहिण इतकी आजारी पडली, की कोंबडीसारखी मानच टाकली होती". इकडे गावाकडे, आईचे वडीलसुद्धा आजारी पडले. आजोबांच्या कुशीपाशी, रात्री भलामोठा नाग निघाला होता. घरात भांडी कुंडी सुद्धा नव्हती, जी विकून बहिणीचे उपचार करता आले असते. खोकल्याची इतकी उबळ यायची, जी त्या सव्वा महिन्याच्या मुलीला सहन व्हायचीच नाही. प्राण सुद्धा निघत नव्हता शरीरातून. शेवटी काही दिवसांने ती गेली. मागोमाग आईचे वडीलसुद्धा स्वर्गवासी झाले.

बहुतेक, सारख्या जागा बदलल्यामुळे तिला त्रास झाला असेल. दीड-दोन महिन्यांची होऊन मुलगी गेली म्हणल्यावर आई-बाबा अगदी कोलमडून गेले होते. पण त्यांना काय माहिती, देवाने काय लिहिले आहे पुढे.

## ८. सोहमचा जन्म आणि बालपण

काही दिवसांने आई पुन्हा गरोदर राहिली. मामाकडे आली बाळंतपणासाठी. मामाला कसला तरी राग आला होता आईचा. मामा आईशी बोलतच नव्हता. आता आईची काळजी आज्जीला लागली होती. "मामा बोलत नाही, सासरच्या लोकांना काळजी नाही. म्हणजे जर कोणालाच गरज नसेल, तर मूल वाढवून फायदा तरी काय?"

आज्जी आईला म्हणाली "जिल्ह्याच्या दवाखान्यात जाऊ आणि मूल पाडून येवू". पण, मूल काही सहजासहजी पडणाऱ्यातले नव्हते.

पुढे आईचा आणि आज्जीचा प्रण बारगाळला. आईची आई, म्हणजे सोहमची आजी एकदम देवभक्त. तिचा सगळा भार देवावरच होता. देवाला रोज म्हणायची "बाबा रे, बाळ दिवसाच होऊ दे" "म्हणजे, कोणाची मदत नाही घ्यायला लागणार". भरपूर भक्ती केल्यामुळे देव नेहमी तिला संकेत द्यायचा. आजीला सारखी स्वप्ने पडू लागली. स्वप्नात यायची साक्षात दुर्गा देवी. देवी म्हणायची "मुलगा होइल, दिवसाच होइल" "त्याचे नाव अंबादास ठेव". पण, आज्जी म्हणायची "माझ्या भावाचे नाव अंबादास आहे, मग मी मुलाचे नाव दुर्गादास ठेवेन." देवी पुन्हा म्हणायची "ठीक आहे".

तर असे दिवस चालले होते. आणि शेवटी एकदा तो दिवस आला. हस्त नक्षत्र चालू होते. हस्त नक्षत्राचा पाउस म्हणजे" हत्ती पाउस" म्हणून ओळखला जातो. अगदी हत्तीच्या सोंडेसारखा, खूप धो-धो पाउस पडतो या नक्षत्रात. म्हणूनच या नक्षत्राचे नाव "हस्त नक्षत्र" पडले असावे बहुतेक.

त्या दिवशी सुद्धा तसेच झाले. पावसाचा जोर भरपूर होता. ओढे, नाले भरून वहात होते. घरांच्या भिंती पडत होत्या. पत्रे उडून जात होते. आईला कळा सुरु झाल्या होत्या. म्हणजे, जन्माला यायच्या अगोदरच बाळाने उपद्रव करायला सुरुवात केली होती.

शेवटी देवीच्या आशीर्वादाने बाळ जन्माला आले. मुलगाच होता. देवीने सांगितल्याप्रमाणे, सकाळी ११ वाजले असतील तेव्हा. ते बाळ सोहमच होता. शेवटी एकदा झाला सोहमचा जन्म. त्याला पाळण्यात पाच-सहा नावे दिली गेली. आळंदीच्या एकादशीचा जन्म होता म्हणून ज्ञानेश्वर. या एकादशीला, गेले चार

महिने निद्रिस्थ असलेला श्री विष्णू, निद्रेतून उठल्यावर आळंदीला येतो, म्हणून पांडुरंग. देवीचा प्रसाद म्हणून दुर्गादास, राशीवरून वेगळेच नाव, शाळेत टाकायचे नाव सोहम इत्यादी.

पुढे कसा उपद्रव करणार होता? ज्ञानेश्वर नाव असले तरी, काय ज्ञान वाटणार होता? सगळ्यांच्या नाकी नऊ आणणार होता. काय काय चमत्कार, पराक्रम गाजवणार होता? देवालाच माहिती. बाबांचा आनंद गगनात मावत नव्हता. महिन्याने, आईला घ्यायला आईच्या सासरचे लोक आले. सोहमची आणि त्याच्या आईची, बाबांसोबत पुण्याला रवानगी झाली.

सासरी आल्यावर काही दिवस ठीक गेले. पण, पुन्हा तीच भांडणे, त्याच कटकटी सुरु. आई नेहमी मार खायची सासरी. आज-काल डेली सोपस मध्ये कसे दाखवतात? तशीच कारस्थाने त्या काळी सुद्धा झाली आई बरोबर. शेवटी कंटाळून आई-बाबा बाहेर पडले. आता आई-बाबा वनवास भोगण्यासाठी बाहेर पडले होते. त्यांच्या वनवासात भर टाकायला अजून सोहम सुद्धा मोठा होणार होता. तर, आई-बाबा आणि सोहम, कधी नांदेड, कधी औरंगाबाद, कधी पंढरपूर, असे फिरून शेवटी परत पुण्यात आले.

पुण्यात, भोसरीमध्ये भाड्याने जागा मिळाली. खोली म्हणजे फक्त झोपण्यापुरतीच होती. घरात एकही भांडे नसल्यामुळे "या चार भिंतीत राहणाऱ्या आई-बाबांचा हा संसार होता" असे म्हणणे अतीच ठरेल. बहुदा, भोसरीचे वातावरण सोहमलासुद्धा मानवले नाही आणि सोहम सारखा आजारीच असायचा. संध्याकाळ झाली, की त्याचे डोळे पांढरे करणे सुरु व्हायचे. आधीच, पहिली मुलगी गेल्यामुळे आई-बाबा दुःखी होते. त्यातच सोहमची सुद्धा बिकट अवस्था. सोहम कधी विकेट टाकेल? याचा काही नेम नव्हता. रात्र-रात्र जागून काढायचे आई-बाबा. सगळे मोठे मोठे दवाखाने पालथे घातले त्यांनी सोहमसाठी. सगळ्या संतांकडे, देवांकडे नवस करून झाले. इतके नवस केले गेले, की नंतर पंचाईत होऊ लागली. "कोणत्या देवाला काय नवस केला होता?" तेच आठवेनासे झाले. तरीही काही फरक पडतच नव्हता. सासरी गेले तर आईला टोमणे मारले जायचे. घरात प्रवेश बंद केला होता. चांगले ओळखीचे दवाखाने त्या काळी पुण्यातच होते. पण, पुण्यातून भोसरीमध्ये येण्यासाठी दोन-दोन तास बस नव्हत्या. आणि त्या काळी रिक्षाला पैसे नसायचे जवळ.

तर, एकदा असाच सोहम आजारी पडला. आई त्याला घेऊन पुण्यात गेली असताना तिचे पाकिटच हारवले. तिने विचार केला "जवळच आपले सासर आहे. दोनच रुपये लागतात घरी जायला. कोणीही देईल सहज." असा विचार करून सासरी आली. सोहमची मावस काकू घरीच होती.

(मावस काकू म्हणजे काय? हे मला आत्ताही सांगता येणार नाही. कोणत्या नातेवाईकाचे

माझ्यासोबत काय नाते आहे? हे ठरवताना नेहमीच माझी गल्लत होते. आणि वयाच्या तिसाव्या वर्षी सुद्धा पोपट होतच असतो. असेच मागे मी एकदा, माझ्या मावस बहिणीच्या मिस्टरांना काका म्हणलो. तिने माझ्याकडे असे काही पाहिले होते की बास..... जणू काही माझ्या हातून ब्रम्हहत्येचे पापच घडले होते. त्याचे झाले असे की, त्याकाळी मी काही मिशी वगैरे ठेवत नव्हतो. त्यामुळे समोर कोणी मिशीवाला माणूस दिसला, की मी त्याला काका म्हणायचो).

(दरम्यान, गंमत म्हणून सांगतो, कालच केसं कापायला न्हाव्याकडे गेलो. त्याला म्हणालो "जमतील तेवढे बारीक कर". बाबाने इतके बारीक केले, की जवळ जवळ वस्तऱ्याने माझे टक्कलच करून टाकले होते. आता, तो माझ्या डोक्यावरची केसं उडवत होता, तेव्हा मी सुद्धा मजा घेऊन स्वत:कडेच पहात होतो. आधीच मी टक्कल पडण्याच्या उंबरठ्यावर आलो होतो. त्यातच, केसं अजून बारीक झाली की मी कसा हॅन्ड्सम दिसेल? याची स्वप्न रंगवत होतो.

माझ्या मागच्या बाजूला एक जण दाढी करायला बसला होता. त्याला त्याच्या समोरच्या आरश्यातून मी दिसत होतो. माझे बारीक होत चाललेले केसं पाहून त्याला रहावले गेले नाही. माझे केस कापणाऱ्या माणसाला शेवटी त्यानेच थांबवले. आणि म्हणाला "अरे भाई, अंकलके सर पे कुछ तो बाल रहने दो."

शेवटी मी सुद्धा अंकल ठरलोच होतो, वयाच्या तिसाव्या वर्षीच. आणि तेही जवळ जवळ २७-२८ वर्षाच्या मुलाचा.)

असो, आई सोहमला घेऊन सासरी पोचली. सोहमची मावस काकू घरीच होती. आईने तिच्याकडे २ रुपये मागितले. तर काकूने दोन रुपये सुद्धा दिले नाहीत. मग आई शेजारच्या चुलत चुलत सासुंकडे गेली (आहे की नाही नात्यांमध्ये गफलत? आता हे चुलत चुलत सासू म्हणजे काय? कोणीतरी सांगा बरं.)

तर, त्यांने सुद्धा आईला दोन रुपये दिले नाहीत. दोघीही म्हणाल्या तेव्हा "अग सुट्टे पैसेच नाहीत घरात". आत्तापर्यंत, गोड बोलून कशी वेळ मारून न्यायची? हे त्यांना चांगलेच समजले होते.

आई तशीच बस-थांब्यावर आली. एका रिक्षावाल्याला म्हणाली "मला आज भोसरीपर्यंत सोडा, माझे पाकीट हारवले आहे". मी उद्या तुम्हाला शोधून तुमचे पैसे देईन". त्या व्यक्तीने काहीही विचार न करता आईला भोसरीला सोडले. तर असे आई घरी आली. दुसऱ्या दिवशी शिवाजीनगरला त्या रिक्षावाल्या काकांना शोधून आईने पैसे दिले.

बहुतेक वेळा, संकटात कुटुंबातली लोकच मदत करत नाहीत पण बाहेरचे करतात.

(थोडक्यात सांगतो. संकटावरून आठवले, आज दिनांक १९.१०.२०१४ - घरचे सगळे गोंदवलेला

गेले होते. घरी कोणीच नाही म्हणून मी आज सुट्टीच काढली होती. नेमका बँकेतून फोन आला. आमच्या घराच्या कर्जाचा हफ्ता या वेळेस बँकेच्या काही त्रुटींमुळे रखडला गेला. यात आमची काहीही चूक नव्हती. पण, रिकामे मन सैतानाचे घर म्हणतात ना? तसेच झाले माझे. आता ५ वाजेपर्यंत हफ्त्याची रक्कम भरणे आवश्यक होते. आता मी सुद्धा नोकरदार माणूस. घरीही कोणी नव्हते. एवढी मोठी रक्कम २-४ तासात गोळा करायची चिंता पडली होती मला.

फार मोठे संकट पडले होते. चिंता करता करता माझे मन, हे पुस्तक लिहिण्यातसुद्धा लागत नव्हते. आता कोणाला मदत मागायची? हा विचारच करत होतो की एक जुना मित्र भेटला. त्याला फक्त म्हणण्याचा अवकाश होता की त्याने पैसे काढून दिले. जणू काही तो पैसे देण्यासाठीच आला होता. पैसे देऊन निघून सुद्धा गेला पटकन.

दरवाजा बंद करताना, माझी नजर आजच्या पेपरवर पडली. पेपरवर लिहिले होते "रीलॅक्स होऊन काम करा (आता, रीलॅक्स होऊन पुस्तक लिहा). देवाने वाचवले वाटत.

संध्याकाळी घरचे सगळे परत आले. त्यांने गोंदवलेवरून एक "श्री राम जय राम जय जय राम" म्हणणारे मशीन विकत आणले. ते मशीन ठेवतात ते खोके माझ्या हातात पडले. त्यावर सुद्धा गोंदवलेकर महाराजांचे संदेश लिहिले होते "हवा असणारा माणूस अचानक समोर येणे, न मागता पैश्याची व्यवस्था होणे, ही सगळी माझ्या असण्याची लक्षणे समजा (गोंदवलेकर महाराजांचे वाक्य). चला गोंदवलेकर महाराजांने पैश्याची व्यवस्था केली वाटते.

असो, पुन्हा फ्लॅशबॅक मध्ये जाऊ.)

सोहमच्या बाबांचा मामा भोसरीमधेच रहात होता. आई-बाबा कधी कधी आधारासाठी त्याच्याकडे जायचे. पण एक दोन वेळा पाहून मामाची बायको म्हणाली "आता तुम्ही तुमचे पहा."

आता, या मामाच्या स्वत:च्या मुलाला सांभाळण्यासाठी त्याने एक बाई लावली होती. ती बाई काही व्यवस्थित लक्ष द्यायची नाही. आणि शेवटी मामाचा मुलगा स्वर्गवासी झाला.

तर, सोहम नेहमी आजारीच असायचा. कधी तरी एकदा शेगावच्या गजानन महाराजांना जाणे झाले. आई-बाबांनी नवस केला "देवा, मुलगा पाच वर्षाचा होऊ दे, पाच वेळा दर्शनाला पाठवेन किंवा घेऊन येईन." आईची आई पण म्हणाली, "हा बहुदा नावकरी असेल".

मग सगळे पूर्वी स्वर्गवासी झालेले लोक शोधले गेले. "असे कोणी आहे का, ज्याची काही इच्छा पूर्ण न झाल्याने ते पुन्हा जन्म घेतील?" कोणी म्हणाले, "हे आपले विश्वंभर आजोबा असतील" कोणी म्हणायचे "हे आपले दशरथ काका असतील". हे सगळे शोधून, प्रत्येकाच्या नावाने अंगारा लावून झाला. सगळे

सोपस्कारसुद्धा पूर्ण झाले. आता हळू हळू सोहमच्या तब्येतीत फरक पडू लागला आणि सोहम नावकरी असल्याचे फिक्स झाले.

नावकरी असण्याचा फायदा म्हणजे, "आपलेच पूर्वज आपल्या पोटी आले आहेत" असे समजून काही दिवस तरी आपलेच आई-वडील आपल्याला मारायला कचरतात.

दरम्यान, त्यांनी भोसरी सोडले आणि सांगवीला राहायला आले. सांगवीला चांगले शेजारी मिळाले. नेहमी मदत करायचे. एकदा शेजारच्या मारणे काकांने एक जागा आणली होती, फक्त पाचशे रुपये गुंठा. काका बाबांना म्हणाले "घेऊन  टाका जागा." पण तेव्हा पगारच चारशे रुपये, त्यात जागा कशी घेणार?" मारणे काका म्हणाले "पैश्याची काळजी करू नका, मी देतो" पण बाबांची काही हिंमत नाही झाली.

बाबांच्या कुटुंबात प्रथा होती की, सगळे देव, देवाचे उत्सव (गणेशोत्सव, नवरात्र, गौरी पूजन वगैरे). हे सगळे घरच्या मोठ्या मुलाच्या, म्हणजे सोहमच्या काकाच्या घरी होणार. पण आई-बाबांना तर प्रवेश बंद होता. आईला काही देवाशिवाय करमत नसायचे. शेवटी आईने  स्वत:च, गणपती, गौरी, नवरात्र, सांगवीच्या घरी बसवणे सुरु केले.  कालच सोहमची आई सांगत होती "त्यावेळेस देवाचा फोटो विकत घ्यायला सुद्धा पैसे नसायचे. तेव्हा आज्जीने, एका लग्न पत्रीकेमधले गणपतीचे चित्र काढून घेतले. आणि त्या वर्षी गणपती बसवला."

एव्हाना, सोहमचे संकटात पडणे सुरु झाले होते. एकदा सायकलच्या चैन मध्ये पाय अडकवला, थोडक्यात वाचला. एकदा गोटी नाकात घातली, एकदा तिखटाच्या डब्याचे झाकण खेळायला घेतले आणि दवाखान्यात पोचला. सोहम आउट होण्याचा भरपूर प्रयत्न करत होता. पण, समोरचेच खेळाडू जणू काही सोहमला आउट करण्याच्या मन:स्थितीत नव्हते.

याला एक सवय सुद्धा लागली होती. रांगत रांगत जायचा. कोणी आजूबाजूला बसलेले दिसले, की मागून जाऊन ढुंगणाला चावायाचा. लहान-मोठे कोणीच सुटायचे नाही याच्या चावण्यापासून.

असेच एकदा, शेजारच्या कंजूष आज्जी सोहमला देण्यासाठी दोन रुपये घेऊन आल्या होत्या. नेमका हा रांगत रांगत जाऊन त्यांनाही चावलाच. आज्जी आधीच कंजूष होत्या. त्यांना काहीतरी कारणच हवे होते सोहमला पैसे न देण्यासाठी. त्या म्हणाल्या "बाळा, मी तुला देण्यासाठी दोन रुपये आणले होते. पण, तू मला चावलास. आता मी काही तुला हे पैसे देणार नाही".

## ९. इयत्ता तिसरी, चौथी आणि पाचवीतले पराक्रम

तर, असे होता होता सोहमचे शाळेचे वय झाले होते. बाबांनी कोणाच्या तरी ओळखीने, त्याला मस्त पैकी मिलिटरीच्या इंग्लिश माध्यमाच्या शाळेत प्रवेश मिळवून दिला. पण, बाबा शाळेत सोडायला आले की हा भोकांड पसरायचा "माझे बाबा, माझे बाबा". आता त्याच्या मागे सुद्धा एक कारण होते. ते म्हणजे, हा नेहमी ऐकायचा "मिलिटरीच्या शाळेत फार शिस्त असते. तिथे खूप व्यायाम करायला लागतो." म्हणून हा घाबरला होता आणि शाळेत गेला की रडायला लागायचा. लहानपणापासूनच, भयंकर नाटकं करायची याला सवयच होती वाटत.

तसेही, अचानकच आपली मातृभाषा सोडून इतर कोणतीही भाषा कानी पडली, की लहानपणी फार विचित्र भावना मनात उत्पन्न होतात. मुले वेंधळून जातात. मराठी माध्यमातुन शिकलेली कित्येक मुले आज परदेशात गेलेली मी स्वत: पाहिली आहेत. त्यांचे काहीही अडत नाही इंग्रजी माध्यमातून शिक्षण न घेतल्यामुळे. उलट, "इंग्रजी माध्यमात शिकलेल्या मुलांना संस्कृत एवढे चांगले जमत असेल का?" हा विचार नेहमीच मनात डोकावतो. संस्कृत म्हणजे देवांची भाषा असे समजले जाते. लहान मुलांच्या पालकांनो, मुलांना भलेही इंग्रजी माध्यमात शिकवा. पण, त्यांना संस्कृत भाषा समजलीच पाहिजे.

मग काय, पुत्र-प्रेमापोटी सोहमला त्या शाळेतून काढले गेले. शिवाजीनगरच्या मराठी माध्यमाच्या शाळेमध्ये प्रवेश मिळाला. आता इथे मात्र सोहम मस्त रमला. पहिल्याच दिवशी एक मुलगा "आई आई" करून रडत होता. याने त्याला अजून धुतले आणि अजूनच रडवले.

बाबांना रोज फार लांब धावपळ करावी लागायची. सकाळी उठून सोहमला शाळेत सोडून यायचे. सोहमला शाळेत सोडून घरी आल्यावर स्वत:च्या ऑफिसला जायचे. त्यांचे ऑफिस शिवाजी नगरलाच होते. पुन्हा दुपारी सोहमला शाळेतून घरी सोडायचे. नंतर, पुन्हा ऑफिसला जाऊन संध्याकाळी परत घरी यायचे. असा बाबांचा दिनक्रम झाला होता.

दरम्यान आई पुन्हा गरोदर. सोहमला भाऊ मिळाला होता. आई-बाबांचे कष्ट वाढले होते. लहान्याला सांभाळायचे? का मोठ्याच्या पराक्रमांकडे लक्ष द्यायचे?

पण देवाने ही सुद्धा अडचण दूर केली. आता त्यांना राहायला, औंध-रोड च्या सरकारी क्वार्टर्स मध्ये जागा मिळाली. आता बाबांना, सोहमला ने-आण करण्यासाठी थोडे कमी कष्ट पडणार होते. पण, आईची जबाबदारी वाढणार होती.

घर खडकी रेल्वे स्टेशनच्या अगदी जवळ होते. आणि शाळा सुद्धा शिवाजी नगर रेल्वे स्टेशनच्या

जवळ. इथूनच सोहमचा रेल्वे प्रवास सुरु झाला. पुढे हीच रेल्वे त्याची जिवलग मैत्रीण बनणार होती. तीच रेल्वे स्टेशन्स त्याची जिवलग मित्र बनणार होती.

आता सोहम, बालवाडी, पहिली आणि दुसरी पर्यंत व्यवस्थित होता. पण, जेव्हा हा तिसरीत पोचला, तेव्हा त्याचे पराक्रम सुरु झाले. सोहम तिसरीत पोचला तेव्हा भावाचेसुद्धा शाळेचे वय झाले होते. त्याला सुद्धा सोहमच्याच शाळेत प्रवेश मिळाला. आता आईचा ताप फारच वाढला होता. सकाळी उठायचे, स्वयंपाक करून, पूजा करून, सोहमचा डब्बा भरून त्याला शाळेत सोडायचे. घरी परत येऊन, बाबांना डब्बा देऊन ऑफिसला पाठवायचे. दुपारी भावाला शाळेत सोडायचे आणि सोहमला परत घरी आणायचे. संध्याकाळी भावाला शाळेतून घेऊन यायचे. अशा तीन-तीन चकरा मारायला लागायच्या आईला.

आईच्या मनात दुख: असायचेच "जर आम्हाला घरातून बाहेर काढले नसते, तर घराजवळच सोहमला शाळा मिळाली असती. घरी कोणाचे तरी लक्ष राहिले असते मुलांवर. एवढे कष्ट नसते पडले." तसेच, पुणे गणेश उत्सवासाठी प्रसिद्ध असूनही, कधी लक्ष्मी-रोड वर जाऊन गणपतीची मिरवणूक पाहायला मिळाली नव्हती. जर, आपण पुण्यात रहात असतो, तर दवाखाने, गणेशोत्सव, सारसबाग, मंडई, किती जवळ पडले असते?"

असो, तर बहुतेक, घरचा अभ्यास न करण्याची सवय सोहमला तिसरीमधेच लागली असावी. बाई साधारणपणे संध्याकाळी ५ वाजता घरचा अभ्यास तपासायच्या. या वेळेसच हा नेहमी शू ला जायचा. ५.२५ वाजता शाळा सुटायची. आणि हा, ५.२० वाजता वर्गात परत यायचा. तोपर्यंत घरचा अभ्यास तपासणे पूर्ण झालेले असायचे. "५- ६ वर्षाचा मुलगा एवढा चालू असू शकतो" हे बाईंना कल्पनेतसुद्धा वाटले नसेल. अभ्यास न केल्यामुळे मार खाण्यापासून कसे वाचायचे? हे त्याला तिसरी मधेच समजले होते.

शाळेत, एका बाकावर एक मुलगी आणि एक मुलगा असे बसवले जायचे. दुसरी पर्यंत सोहमच्या शेजारी दीप्ती बसायची. पण, तिसरीमध्ये पूनम आली. याला ते बहुदा आवडले नसावे. आता, दीप्ती म्हणजे त्याची चांगली मैत्रीण होती. दीप्तीच्या कुटुंबाचे आणि सोहमच्या कुटुंबाचे घरगुती संबंध होते. सोहम विचार करायचा "किती छान गप्पा मारायचो आपण दीप्ती बरोबर", दीप्ती किती मदत करायची आपल्याला". पण ही पूनम म्हणजे, हिच्याशी बोलायचे म्हणले तर, हिला कळेल का आपले बोलणे?"

दीप्तीच्या घरी सोहमचे नेहमी येणे जाणे असायचे. पूनम थोडी श्रीमंत घरातली वाटायची. आता,

सोहमचे आणि श्रीमंतांचे तसे काही वाकडे नव्हते. पण लहानपणापासूनच, गरीब असल्यामुळे होणारी हेळसांड, मारले जाणारे टोमणे, दिली जाणारी दुय्यम दर्जाची वागणूक, यामुळे बहुदा न्यूनगंड असेल मनात.

तर, सोहमचे आणि पूनमचे कधीच पटले नाही. "श्रीमंत लोक गरिबांवर फार अन्याय करतात" हे बहुदा त्याने सिनेमातच पाहिले होते. म्हणूनच त्याने ठरवले असावे "हिला चान्सच द्यायचा नाही". त्याचे झाले असे की, सोहमचे बाबा शम्मी कपूरचे मोठे भक्त. साधारणपणे १९८७-८८ च्या काळात, बाबा सोहमला शम्मी कपूरचे सिनेमे दाखवायला घेऊन जायचे. काही सिनेमांमध्ये शम्मी कपूर परिस्थितीने गरीब असतो आणि त्याची होणारी बायको श्रीमंत. श्रीमंत मुलीचे वडील गरीब जावयावर कसे अत्याचार करतात? हे त्याने सिनेमामधेच पाहिले असावे. त्यातच त्याने महमूदचा कुंवारा बाप हा सिनेमासुद्धा पाहिला. आणि, त्याला गरिबांची कीव वाटून श्रीमंतांबद्दल राग येऊ लागला.

तशी पूनम स्वभावाने गरीब होती. सोहमच आता तिच्यावर फार दादागिरी करायला लागला. त्याने बाकाचे दोन भाग पाडले. एक होता ७०%, दुसरा होता ३०%. अर्थातच, ७०% वाला भाग सोहमचा होता. सोहमच्या भागात तिचा हात, तिची वही जरा जरी आली, की तो तिला धक्का द्यायचा. तिला लिहूच नाही द्यायचा. रोज मारामारी व्हायची. आता ती सुद्धा रागावली होती. तिने घरी सांगितले.

तिची आई शाळेत आली. नेमका सोहम, घरचा अभ्यास न केल्यामुळे त्या दिवशी सुद्धा शू ला गेला होता. सोहम परत वर्गात आला. पाहिले तर काय? वर्गात, वर्गशिक्षिका, पूनम आणि तिची आई एकत्रच उभ्या होत्या त्याची वाट पाहत.

बाईंनी विचारले "का रे हिला त्रास देतोस?"

सोहम मान खाली घालून उभा राहिला. बाई म्हणाल्या "अरे असे करू नये". किती रडली माहितीये का ती?" कुठेतरी सोहमला सुद्धा वाईट वाटले. नाक दुमडून, डोळ्यात पाणी आणून, सोहमला किती वाईट वाटले होते हे तो व्यक्त करत होता.

बाई भरपूर बोलल्या. त्यांचे ऐकून पूनमच्या आई सुद्धा बोलू लागल्या. हे ऐकून पूनम सुद्धा शामिल झाली. वाढवून वाढवून सांगायला लागली. सोहमने विचार केला "अरे ही तर किती गरीब होती".

शेवटी सोहम सुद्धा चिडला. मनात होते ते दिले सांगून "मला ही पूनम नाही आवडत, मला दीप्ती शेजारी बसायचंय". सगळा वर्ग हसायला लागला. बाईंनीसुद्धा कसे बसे हसू आवरले.

बाई म्हणाल्या "ते सगळे सोड, तू बाकाचे दोन हिस्से केले आहेत म्हणे?" कुठाय तो बाक?"

नेमके तो ७०% आणि ३०% वाला बाक कोणीतरी बदलला होता. देवाने त्याला वाचवले. तसे, सकाळी वेगळाच बाक पाहून सोहम थोडा नाराजच झाला होता. आख्खा वर्ग शोधला, तरी तो बाक सापडला नाही. "पुन्हा नवीन बाकाचे दोन भाग पाडायला लागणार" म्हणून तो थोडा हिरमुसला होता. पण, बाक बदलला जाण्यामागे देवाची काय योजना होती? हे त्या सहा वर्षाच्या मुलाला काय समजणार?

तिसरीतच एकदा, पट्ट्याने लढाई लढाई खेळताना मुख्याध्यापकांने पकडले. पट्टा जप्त झाला. पुन्हा २० रुपयाचा पट्टा घेणे तेव्हा शक्यच नव्हते. बाबांना शाळेत यावे लागले. शाळेत, सोहमच्या त्रासामुळे पालकांने शाळेत येण्याची ही सुरुवात होती. पण, सोहम मात्र, पट्टा परत मिळाल्यामुळे खूष होता.

सोहमकडे कधीही वेळापत्रक नसायचे. त्यामुळे, "उद्या कोणता तास आहे?" हेच माहिती नसायचे. मग काय? जी मिळेल ती वही दप्तरात टाकून शाळेत जायचा.

काही दिवसांने, नेहमीप्रमाणे सोहमकडे वेळापत्रक नव्हते. सोहम नेहमीप्रमाणे शाळेत गेला. बाबा त्याला गेटपाशी सोडून परत गेले. पठ्ठ्या आत गेला, वर्गापाशी गेला, तर वर्ग रिकामा. कोणीच नव्हते वर्गात. शिपाई काकांना विचारले, ते म्हणाले "आज तर सुट्टी आहे" तू कसा काय आलास शाळेत"? तसे शाळेत जाताना आई म्हणालीच होती, "अरे आज होळी आहे, आज सुट्टी नाही का तुला?" पण हा पूर्ण आत्मविश्वासाने म्हणाला "नाही, आज तर सुट्टी नाही आई". कधी नव्हे ते त्याला शाळेत जावे वाटले होते.

सोहम विसरूनच गेला होता की "आज सुट्टी आहे". मग त्याने विचार केला "बाबा तर निघून गेले आहेत. आता घरी कसे जायचे? बरं, गेलो तर सांगायचे कसे "माझ्या लक्षातच नव्हते की आज सुट्टी आहे?". म्हणजे, खूप बोलणी आणि मार खायला लागणार".

पुन्हा विचार केला "आधी घरी जायला तर निघू, जाताना ठरवू काय सांगायचे ते".

सोहम निघाला, चतु:शृंगी रस्त्याने चालत चालत रेंज-हिल्स कॉर्नर पर्यंत पोचला. तिकडून खडकी स्टेशनचा रस्ता पकडला. चालत चालत अशोक नगर, सिंचन नगर गेले असेल. त्याच्या मनात कल्पना आली "आपण लहान आहोत, मिलिटरीच्या रस्त्यावर कोणीच दिसत नाही, आपल्याला कोणी पकडून नेले तर?" त्यापेक्षा, आपण H टाइप च्या रस्त्याने चालत जाऊ. आजूबाजूला घरे आहेत. म्हणजे आपल्याला कोणी

पकडणार नाही". (आता अर्धा रस्ता संपल्यावर त्याला कळाले की तो लहान आहे. तसा भोळाच होता तो.)

सोहम त्या रस्त्याने पुढे निघाला. वाटेत रेंज-हिल्स मध्ये, कॉलनी मध्ये राहणाऱ्या मित्रांची शाळा दिसली. सोहम मनातच म्हणाला "तर ही शाळा आहे होय राम, चेतन, शैलेशची?" चालत चालत सोहम घरी पोचला. त्याच्या शाळेपासून घरापर्यंत अंतर होते ८ कि.मी. जे त्याने चालत चालत पार केले होते. वयाच्या ५व्या-६व्या वर्षीच, सोहम ८ किलोमीटरचा प्रवास करून चालत चालत घरी पोचला होता.

घरी पोचल्यावर आईने विचारलेच "एकटा कसा काय आलास रे घरी? आणि का आलास?"

त्याने आयुष्यातली पहिली थाप मारली. त्याने शाळेत नसणाऱ्या सरांना स्वर्गवासी केले. "कोणाचे मरण चिंतू नये" असे आईच नेहमी म्हणायची. म्हणून त्याने विचार केला "जर आपण अनोळखी सरांना स्वर्गवासी केले, तर पाप नाही लागणार. कारण असे कोणी नव्हतेच की". म्हणून त्याने नसणाऱ्या सरांना स्वर्गवासी केले. सोहम त्यावेळेस, महाभारताच्या युद्धातला "नरो वा कुंजरो" म्हणणारा युधिष्ठीर झाला होता.

आई म्हणाली - कोणते सर गेले म्हणालास?

सोहम - आई, जोशी सर.

आई - पण, असे कोणतेच नाव मी ऐकले नाही.

सोहम - (सोहमची थाप जवळ जवळ पकडली गेली होती, पण सावरून) अग आई, ते सर नव्यानेच शाळेत आले होते. फक्त १५च दिवस झाले होते त्यांना शाळेत येऊन.

"एवढी मोठी थाप काही हा मारू शकणार नाही" असे वाटून आईने त्याच्यावर विश्वास टाकला. त्याच्या आईला वाटले "हा खरे सांगत असेल".

आई खुष झाली, तिला वाटले "आता मुलगा शाळेत एकटा जाऊ शकेल आणि माझे कष्ट थोडे कमी होतील."

एकटा तर तो जाऊ शकणार होता. पण, आईला काय माहिती तिचे कष्ट अजून वाढणार होते.

शाळेमध्ये, लिहिताना हात दुखायचा. शिक्षक तर, शिकवताना रांगेमधल्या जागेत फिरायचे. "सोहमला वाटायचे "जर आपण लिहिले नाही, तर आपण पकडले जाऊत." म्हणून हा पठ्ठ्या लिहायचे नाटक करू लागला. म्हणजे वह्या कोऱ्याच. मला या वयातही हाताने लिहिण्याचा कंटाळा येतो, सोहम तर फक्त सहाच वर्षाचा होता. त्याला का नाही कंटाळा येणार?

तसेच, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, याच्याकडे कधीही शाळेच्या तासांचे वेळापत्रक नसायचे. यामुळे "उद्या कोणता तास आहे?" हे त्याला माहितीच नसायचे. मग काय? दिसतील तेवढ्या दोन-चार वह्या दप्तरात कोंबून हा शाळेत निघायचा. गणिताचा तास असला, तर याच्याकडे नेमकी गणिताचीच वही नसायची. इतिहासाचेही तसेच, शास्त्राचेही तसेच.

आता, "शिक्षक तर शिकवताना मधल्या रांगेत फिरतात. आपण काहीच लिहिले नाही तर आपण पकडले जाऊत" असे वाटून हा पठ्ठ्या मिळेल त्या वहीत लिहायचा. त्यामुळे व्हायचे असे की, गणिताच्या वहीत मराठी, इंग्रजीच्या वहीत गणित, इतिहासात शास्त्र, आणि भूगोलात विज्ञान, असे त्याचे लिखाण असायचे. आता यामध्ये सुद्धा त्याला आत्मविश्वास असायचा "माझ्या लक्षात राहील, मी कुठे काय लिहिलंय ते". पण ते शक्य नसायचे.

आता, परीक्षा आली की नेहमी सोहमची पंचाईत व्हायची. कोणतीच वही पूर्ण नसायची. आणि जर प्रत्येक वहीत शोधायचे झाले तर अशक्यच. त्यामुळे सोहम अभ्यासच नाही करू शकायचा. आधी जे मराठीच्या वहीमध्ये भूगोल, इतिहासात विज्ञान असे त्याने लिहिले असायचे. ते मध्ये मध्ये यायचे. म्हणजे, जेव्हा सोहम मराठीचा अभ्यास करायचा, तेव्हा मधेच इतिहासाचे लिहिलेले पान आले, की हा बाबा इतिहासाचा अभ्यास सुरु करायचा. त्याला बहुदा वाटत असेल, "बाईंनी हेच शिकवले आहे". आता हे सगळे तो, लिहिले आहे तसेच पाठ करू लागला. तसेच लिहू पण लागला. याचा परिणाम गुणांवर दिसू लागला.

एकदा न राहवून बाईंनी सोहमला विचारलेच "का रे सोहम, माणसाच्या शरीराचे वर्णन करा" या विज्ञानातील प्रश्नाचे उत्तर देताना तू, शिवाजी महाराज आग्र्यावरून कसे काय निसटले? या इतिहासातील प्रश्नाच्या उत्तरापर्यंत कसा काय पोचलास?" पहिल्यांदाच भर वर्गात अपमान झाल्यामुळे, सोहम गांगरून गेला होता.

प्रश्न होता: माणसाच्या शरीराचे वर्णन करा.

सोहमचे उत्तर होते: माणसाला दोन डोळे असतात, दोन कान असतात, एक नाक असते, दोन हात, दोन पाय, प्रत्येक पायाला पाच बोटं, प्रत्येक हाताला पाच बोटं असतात. म्हणूनच, शिवाजी महाराजांने आग्र्यावरून निसटण्यासाठी अतिशय गुप्तपणे योजना बनवली. काही मोजक्या आणि विश्वासू लोकांना त्यांने आपली योजना सांगितली.......उत्तर चालूच होते.....

पण, बहुतेक आई सोहमला हुषार समजत असणार. स्वत:च पोरगं प्रत्येक आईला हुषारच वाटत. म्हणूनच, दरम्यान आईला वाटू लागले होते "याला ज्ञान प्रबोधिनी शाळेत घालावे. तिकडे हॉस्टेल आहे. हॉस्टेलवर राहून हा अजून हुषार होईल". पण एक अडचण होती. ती म्हणजे, ज्ञान प्रबोधिनी शाळेत प्रवेश

परीक्षा असायची. ठरले तर मग, सोहमने प्रवेश परीक्षा द्यायची. पास झाला तर हॉस्टेल जिंदाबाद.

परीक्षेचा दिवस ठरला होता. आई सोहमला म्हणाली "तुला लवकर घरी सोडावे म्हणून मी शाळेत चिठ्ठी देते." तू शाळेतून निघालास, की एल.आय. सी च्या बाजूच्या शाळेच्या गेट पाशी थांब. मी आले की आपण जाऊ."

सोहम म्हणाला "ठीक आहे".

दुसऱ्या दिवशी शाळेत चिठ्ठी दिली. एक वाजताच निघाला शाळेतून. त्याने विचार केला "आई आली तर चुकामुक नको व्हायला" चुकामुक झाली तर उगाचच परीक्षा बुडेल". म्हणून दोन तास आधीच निघाला. दोन तासात तो गप्प थोडीच बसणार होता?

सोहम गेटजवळ येऊन थांबला. अर्धा तास झाला. शेजारीच एक बंगला होता. त्या बंगल्याच्या आवारात होते 'चिक्कूचे झाड'. सोहम खूप वेळ पहात राहिला. आता त्याला काही चिक्कू पाहून करमेना. जणू काही चिक्कुचे झाड, दोन्ही हातात चिक्कू नाचवून, सोहमला येऊन चिक्कू तोडण्याचे आमंत्रणच देत असावे. सोहम मनातच म्हणाला "पटकन जाऊन दोन-चार चिक्कू घेऊन येऊ.". सोहम निघाला, झाडावर चढला. तेवढ्यात समोरून पोटे सर आले. नेमके, सोहमने एक चिक्कू तोडलाच होता आणि पोटे सर दिसले. भरीस भर म्हणून, सरांसमोरच सोहम झाडावरून खाली पडला.

त्यांनेसुद्धा सोहमला पाहिले. हाता तोंडाशी आलेला घास हिसकावून घेतल्यासारखे वाटले सोहमला. तसे, पोटे सर त्याला शिकवायला नव्हते. त्यांने सोहमला असे ओळखले नसते. पण, शाळेच्या गणवेशाने घोळ केला आणि सोहम पकडला गेला.

सर म्हणाले "उद्या पालकांना आणायचे".

सोहम परत गेटपाशी आला. आता गुपचूप आईची वाट पाहू लागला. शेवटी, आई ३ वाजता आली. सोहमने ज्ञान प्रबोधिनीची प्रवेश परीक्षा दिली. नापास झाला, तीच शाळा सुरु राहिली त्याची.

दुसऱ्या दिवशी, शाळेमध्ये सोहमचे पराक्रम ऐकून भरपूर गोंधळ उडाला होता. पण बहुतेक, वेळकाढू धोरण तो याच काळात शिकला असेल. "आईला उद्या नक्की घेऊन येतो" असे म्हणून म्हणून त्याने कसे बसे प्रकरण सांभाळले. वेळकाढू धोरण म्हणण्यापेक्षा, सोहमला कोणताही निर्णय घेताना नेहमीच फार त्रास व्हायचा. यामुळे तो चटकन निर्णय घेऊ शकायचा नाही. आणि, याचा निर्णय होईपर्यंत संकट टळले असायचे.

कदाचित सोहमला असा स्वभाव, देवाने देणगी म्हणूनच दिला असावा.

काही दिवसांने परीक्षा झाली, निकाल लागला. सोहम आता चौथी मध्ये गेला होता. पण त्याची तुकडी "तिसरी अ" मधून "चौथी ब" अशी झाली होती. दीप्ती पुन्हा त्याच्या बाकावर सोबत आली होती. बहुतेक बाईंनासुद्धा समजले असावे, 'एका लहान मुलाचे मन'.

सोहमचा भाऊसुद्धा बालवाडी मधून पहिलीत आला होता. सगळ्यांप्रमाणेच, सोहमचे आणि भावाचेसुद्धा लहानपणी कधीच पटायचे नाही. नेहमी मारामारी करायचे. अर्थातच, सोहम मोठा असल्यामुळे, नेहमी त्याचा भाऊच मार खायचा. सोहमची मारामारी करायची स्वत:ची एक स्टाईल होती. सिनेमामध्ये पाहूनच त्याने हे शिकले असावे. आधी समोरच्याला चार वार करू द्यायचे आणि आपण एकाच फटक्यात त्याला गार करायचे. नंतर हिरोसारखे म्हणायचे "मैने तो तुझे पहले ही समझाया था, आग से मत खेल". इतर कोणी मारामारी करण्यासाठी मिळाले नाही, की तो हे कौशल्य, तुलनेने लहान आणि नाजूक असणाऱ्या स्वत:च्याच भावाविरुद्ध वापरायचा. पण, आई-बाबांचा मार खायची, सोहमची सुरुवात तिथूनच झाली असावी.

चौथीत कला कौशल्य हा विषय नवीनच आला होता. बाई रोज कोणाला तरी समोर बोलवायच्या. त्यात अनुजा गाणे म्हणायची. अर्चना सुद्धा एकदा गाणे म्हणाली "पाउले चालती पंढरीची वाट". खूप हुषार होत्या दोघीजणी. महाडिकनी माकडाची मस्त भूमिका केली. मस्त वाटला महाडिक तेव्हा. महाडिक म्हणजे गोरा, गब्बू, अस्वलासारखा दिसायचा. सोहमला महाडिक खूप आवडू लागला. पुढे दोघे चांगले मित्र झाले. सोहम कधीच आपली कला सादर करण्यासाठी पुढे गेला नाही. काही कलाच नव्हती अंगात, तर पुढे जाऊन काय करणार? कपाळ?

सोहम आणि त्याच्या भावात जमीन-आसमानाचा फरक होता. भाऊ एकदम गोरापान, तर सोहम काळा. नेहमी, "भाऊ किती गोरा, किती हुषार" असे त्याचे कौतुक केले जायचे. तेव्हा पासूनच सोहमला वाटायला लागले, **"बहुतेक गोरी मुले हुषार असतात".** आपण गोरे नसल्यामुळे, आपण हुषार नाही".

भाऊ नेहमी अभ्यास करायचा, सोहम नेहमी खेळायचा. भावाचे कपडे इस्त्रीचे असायचे, सोहम तुटलेली स्लीपर घालून शाळेत जायचा. शाळेसाठी आवश्यक सगळया गोष्टी भावाकडे तयार, तर काय गोष्टी लागतात? हे सुद्धा सोहमला माहिती नसायचे.

चौथीतच सोहमला, क्रिकेट खेळणे, गोट्या खेळणे, इकडून तिकडून तांब्याच्या तारा मिळवून

भंगारात विकणे. सायकल भाड्याने घेऊन, युनिव्हर्सिटी आणि आजूबाजूच्या परिसरात जाणे, चोरून फळे तोडणे अशा सवयी लागल्या. दोन-चार वयाने मोठे असणारे, पण कित्त्येक वर्षे एकाच इयत्तेत शिकणारे, असे मित्र मिळाले. हेच मित्र त्यांच्या टीमचे कप्तान होते. ते कधीही, सोहमला काहीही करायला सांगायचे. अश्या गोष्टी करायला सांगायचे ज्या सोहमला आवडत नसत. ते म्हणतील तसे नाही वागले तर सोहमला टीममधून काढून टाकायचे. त्यामुळे सोहमला नेहमी एकटेच रहायची सवय लागली.

सोहम तसा भोळा होता. सोहम स्वभावाने गरीब होता. कॉलनीमधील मोठी मुले नेहमी त्याला चेंडू, गोट्या द्यायची. तर छोट्या मुलांच्या टीमचे कप्तान, सोहमला फसवून त्याच्या गोट्या, चेंडू स्वत: घ्यायचे. नंतर त्याला टीम मधून काढून टाकायचे. ही काही वर्ष सोहमने, टीम मधून काढले गेल्याच्या दु:खातच काढली होती. नेहमी चिंता असायची मनात "मला टीम मधून काढून तर टाकणार नाहीत ना?"

सोहमचे काही मित्रसुद्धा मग सोहमसाठी टीममधून राजीनामा द्यायचे. टीमचे कप्तान एकटेच शिल्लक राहायचे. आणि मग पुन्हा, आधी सोहमला टीममध्ये घेतले जायचे. मगच सोहमचे इतर मित्रसुद्धा टीममध्ये शामिल व्हायचे.

याला भूतांचा अनुभव इयत्ता चौथीमध्ये शिकतानाच आला. झाले असे की, याची शाळा दुपारी १२ वाजता सुटायची. मध्यान्हाची वेळ म्हणजे भुताची वेळ. असेच एक दिवस शाळा सुटली, हा रेल्वेने घरी निघाला. चालत चालत, खडकी रेल्वे स्टेशनवरून कॉलनीत पोचला. हा ज्या बिल्डींगमध्ये राहायचा, तिथे हा बाबा गेलाच नाही. हा समोरच्या बिल्डींगमध्ये पोचला. थेट तिसऱ्या मजल्यावर राहणाऱ्या "ठुसे" काकांच्या घरी पोचला. कडी वाजवली, काकू घरीच होत्या. याने थेट काकूंना विचारले, "तुम्ही काय करताय आमच्या घरात? माझी आई कुठे आहे?"

पुढचे काहीच आठवत नाही. जाग आली तेव्हा, हा थेट स्वत:च्या घरातल्या कॉटवर दिसला.

याला चकवा झाला होता.

असेच एकदा, एका बागेत खूप मस्त पेरू आले होते. सोहम आणि २-३ मित्र गुपचूप पेरू तोडत होते. तेवढ्यात तिथल्या काकू बाहेर आल्या. हे पळून जाण्याच्या तयारीतच होते की त्या म्हणाल्या "मुलांनो एक काम करा, बागेत फार चिखल होतो पावसाळयात. तर इकडे फरश्या आणून बसवा आणि पेरू घेऊन जा".

झाले, मुले एकदम खुष होऊन, फरश्या शोधायला निघाली. फरश्या डोक्यावर ठेऊन सोहम परत येत होता. तेवढ्यात, फरशी सटकून डोक्यावरच पडली. कड कड असा आवाज आला. सोहमला वाटले "डोकेच

फुटले माझे." पण झाले उलटेच होते. फरशी तुटली होती आणि सोहम सलामत होता.

"खुदा मेहेरबान, तो गधा पहलवान".

चौथीचे वर्ष वाऱ्यासारखे संपत होते. पुन्हा परीक्षा झाली, निकाल लागला. अशा तऱ्हेने चौथी सुद्धा संपली. सोहम आता पाचवीत गेला होता. मुख्य, मोठे मोठे पराक्रम करण्यासाठी, तो आता सज्ज होऊ लागला होता.

पाचवीत गेल्यावर 'इंग्लिश' हा विषय नवीन आला होता. सोहमला इंग्लिश बऱ्यापैकी जमायचे. सातपुते सर इंग्लिश शिकवायचे. सातपुते सरांचा, सोहम हा आवडता विद्यार्थी झाला होता.

वर्गशिक्षक होते "वाघ सर". आता वाघ सर म्हणजे, गोरे पान, पिळदार मिश्या, शिस्तप्रिय म्हणून फार प्रसिद्ध होते ते शाळेत. सोहमचे आणि शिस्तीचे आधीपासूनच वाकडे होते. सोहमला सुद्धा फार भीती वाटायची वाघ सरांची. मराठी शिकवायचे ते. सोहमने घातलेली उलटी टोपी, येता जाता नेहमी सरळ करायचे. सरांने आपण उलटी घातलेली टोपी सरळ करावी, म्हणून सोहम मुद्दामच त्यांच्यासमोर उलटी टोपी घालून जात होता. त्याला खूप आवडायचे सरांने त्याची टोपी सरळ केलेलं.

आता सोहम शाळेत एकटा जायला लागला होता, कोणतेही बंधन नव्हते, सारखे सूचना द्यायला आई नव्हती की "रस्ता व्यवस्थित ओलांड, घाई करू नकोस, हाय-वे वर जाऊ नकोस, रेल्वेमध्ये आतमध्ये उभा रहा, दरवाज्याजवळ थांबू नकोस" इत्यादी. सोहम हेच सगळे करायला लागला.

दरम्यान, चांगले गुण मिळावे म्हणून आईने त्याला इंग्लिशचा क्लास लावला. क्लास जवळच होता. घरापासून १०-१५ मिनिट लागायचे पोचायला. मध्ये चिखलवाडी लागायची. तिथल्या शाळेबाहेर एक माणूस सोरट घेऊन बसायचा. त्याच्याकडचे सोरट विकत घेऊन बक्शिस मिळवायचे. चिंचा, आवळे, पेरू, पेपरमिंट, लिमलेटच्या गोळ्या इत्यादी घेऊन खात-खात क्लासला पोचायचे. असा त्याचा कार्यक्रम असायचा. दरम्यान, सोहमला राज कपूरचे सिनेमे आवडू लागले. राज कपूरच्या स्टाईल ने बोलणे, तसेच चालणे, अगदी भोळेपणाने प्रश्नाचे उत्तर देणे, याचे तो अनुकरण करू लागला. हे अनुकरण करता करता, खरंच तो स्वत:ला भोळा समजू लागला आणि नकळतपणे बनवू लागला होता.

इंग्लिशचा क्लास होता कुडचीकर मिस कडे. कुडचीकर मिस एकदम स्टायलिश होत्या, इंग्रजी परफ्युम वापरायच्या, महागडे कपडे घालायच्या. आता एकदा काय झाले, मिस इंग्लिश शिकवत होत्या आणि

त्यांने काही तरी चूक केली. ती सोहमच्या लक्षात आली गप्प बसावे की नाही? पण, त्याने त्यांना सांगितले. बहुतेक त्यांना आवडले नसावे. शेजारी बसलेल्या अमोलला त्या म्हणाल्या "बहुतेक सोहम तुझ्यापेक्षा जास्त मार्क मिळवणार या वेळी." असे म्हणून त्यांने, अमोलकडे बघून डोळे मिचकावले. सोहमने ते पाहिले होते. पण काही बोलला नाही. असेही तो काय बोलणार होता? त्याला दिसायचे सगळे, पण बोलता नाही यायचे.

आता, अमोल म्हणजे अगदी हुषार मुलगा. सोहमच्या आईच्या नजरेत तो "आदर्श विद्यार्थी". सोहमच्या नजरेत "हुषार **गोरा** विद्यार्थी." अमोल दिसला, की सोहमची आई म्हणायची "सोहम, अरे त्याच्यासारखा अभ्यास करत जा." शिक जरा काहीतरी त्याच्याकडून." "पुढे जाऊन तो मोठ्ठा होईल आणि तू बस हमाली काम करत."

असो, दुसऱ्या दिवशीच इंग्लिशचा रिझल्ट आला. सोहमला ४० पैकी ३७ मिळाले तर, अमोलला ३६. देवाने सोहमची लाज राखली.

शाळा सुरु होऊन महिना-दोन महिने झाले असतील. पावसाळा सुरु होता. थोडा विचार केला तर समजेल की, पावसाळ्यात आपला पोटावर कंट्रोल रहात नाही. सारखे बाथरूमला (लघुशंकेला) जावेसे वाटते. सोहमचेही तसेच झाले. त्याला खूप जोराची शू लागली. पण, शिक्षक काही सोडेनात. बाबाने, एक एक थेंब करत करत, सगळे पोट भर वर्गातच रिकामे करून टाकले.

बाकाखाली सगळीकडे शू चे ओघळ दिसू लागले. अर्थातच, सोहमची चड्डी ओली दिसल्यामुळे सगळ्या वर्गातली मुले सोहमची चेष्टा करू लागली. सोहम दिसला की सगळी मुले "ए मुतऱ्या, ए मुतऱ्या" म्हणून चिडवू लागली.

इथेच सुरुवात झाली होती. सोहमला आता शाळेत जावेसे वाटतच नव्हते.

असेच एकदा, सोहमने सवयीप्रमाणे घरचा अभ्यास केला नव्हता. वाघ सरांची भीती होतीच मनात. त्याने ठरवले "आज शाळेत जायचेच नाही". आईला सांगितले "आई पोट खूप दुखतंय शाळेत नाही जात", आईची परवानगी मिळाली.

म्हणजे आज अधिकृत सुट्टी होती. १-२ तास झाले असतील घरी राहून. खाली मुले खेळायला आली. आवाज देवू लागली. त्याने पुन्हा विचार केला "आजारी असल्यामुळे सुट्टी घेतली. आता खेळायला गेलो तर बिंग फुटेल." पण क्रिकेट खुणावत होते. सोहम आईला म्हणाला" आई जरा खेळायला जातो, कदाचित बरे वाटेल खेळण्यामुळे".

काय आश्चर्य, थाप पचली आणि खेळायला मिळाले.

अजून २-३ वेळा असेच घडले. बहुतेक, आईला सुद्धा त्याची चालाखी समजून आली होती. चौथ्या वेळी आई म्हणाली "काही नाही होत, शाळेत जायलाच लागेल." ते ऐकून त्याच्या डोळयासमोर काजवेच चमकले. "आता काय करायचे? वाघ सर तर खूप मारतील." तसे वाघ सर मारायचे नाहीत, पण याला काहीतरी कारणच हवे असायचे दांडी मारायला, आणि स्वत:च्या मनाची समजूत घालायला.

त्याने त्या दिवशी पहिल्यांदा ठरवले, "आपण शाळेचा गणवेश घालून, डब्बा, दप्तर घेऊन घरून निघायचे. पण शाळेत जायचे नाही. "मग करायचे तरी काय?" तर, आपण लहान आहोत. आपण अनोळखी ठिकाणी गेलो, तर कोणीही आपल्याला पकडू शकते. मग, पकडून आपल्याला भीक मागायला बसवले तर?" आपले हात-पाय तोडले तर?" तसे लहानपणी प्रत्येक मुलाने, त्याच्या आई-बाबांकडून अश्याच काही गोष्टी ऐकलेल्याच असतात.

सोहमने विचार केला "त्यापेक्षा आपण एक काम करू, आपण आपल्या मित्रांची शाळा पाहिलीच आहे. ती जवळच आहे. रस्त्यात खूप लोक पण असतात. म्हणजे आपल्याला कोणी पकडून नेणार नाही. आपण मित्रांच्या शाळेत जाऊ. त्यांना सोबत घेऊ आणि मजाच मजा करू. शाळा सुटायची नेहमीची वेळ झाली, की घरी परत येऊ".

पण एक अडचण होती, "**सोहमचा भाऊ**", त्याची शाळा दुपारी सुटायची आणि सोहमची शाळा दुपारी सुरु व्हायची. सोहम विचार करू लागला "मयुरेशची आणि आपली शाळा एकच आहे. रोज आपण शाळेत किंवा रेल्वे स्टेशनवर भेटतोच. आता, आपण त्याला शाळेत किंवा रेल्वे स्टेशनवर दिसलो नाही, तर भाऊ घरी सांगेल." मग एक करता येईल, आपण शाळेत जायचे, भावाला भेटायचे. भाऊ घरी निघाला की आपण मोकळे - हवे तेवढे आणि हवे तिथे फिरायला. म्हणजे, त्याच्या नंतर आपण सुद्धा शाळेतून निघायचे आणि मित्रांकडे जायचे. "असे केल्याने भावाला काहीच समजणार नव्हते.

सोहमने तसेच केले. सोहम, घरून शाळेचे कपडे घालून, दप्तर वगैरे घेऊन शाळेत निघाला. शाळेपर्यंत गेला. तेवढ्यात भावाची शाळा सुटली. सगळे काही नॉर्मल आहे हे दाखवण्यासाठी, सोहम स्वत: जाऊन भावाला भेटला. भाऊ घरी जायला निघाला. सोहमसुद्धा, वर्गात न जाता भावामागून शाळेतून निघाला. तडक शिवाजीनगर रेल्वे स्टेशन गाठले.

भाऊ आधीच्या रेल्वेने घरी गेला. सोहम पुढच्या रेल्वेने जाणार होता. रेल्वे यायला वेळ होता. पण,

सोहमला फार घाई झाली होती मित्रांकडे जायची. शेवटी हा चालतच निघाला. रेल्वे रुळावरून चालत चालत निघाला. वाटेत, दहा पैशाचे नाणे रेल्वे रुळावर ठेवले. थम्प्स अपचा बिल्ला सुद्धा रेल्वे रुळावर ठेवला. रेल्वे त्यावरून गेली. थम्स अपचा बिल्ला आणि नाणे चपटे झाले. ते उडवत उडवत सोहम खडकीला आला आणि मित्रांच्या शाळेत गेला. नेमके सोहम जेव्हा त्यांच्या शाळेत पोचला, तेव्हा त्यांची मधली सुट्टी होती. मित्र तसे सभ्य होते. सोहमला पाहून सगळे आश्चर्यचकित झाले. मित्र घाबरले, मित्र म्हणाले "तू घरी जा, आमची शाळा आहे. इथे कसा काय आलास तू?"

सोहम म्हणाला "काय राव, हीच का मैत्री? इतक्या लांबून शाळा बुडवून, घरी काहीही न सांगता मी तुम्हाला भेटायला आलो. आणि तुम्ही, "मला परत घरी जा" असे म्हणता होय?"

मित्र पाघळले आणि म्हणाले "एक काम कर, तू इथेच थांब. आमची शाळा सुटल्यावर आपण भेटू". मग २ वाजल्यापासून ५.३० वाजेपर्यंत, मित्रांची शाळा सुटेपर्यंत हा बाबा तिथेच त्यांची वाट पहात बसला. या बाबाने मित्रांच्या शिक्षकांना काय सांगून पटवले हे त्याला आठवत नाही, पण याने त्यांना सुद्धा पटवलेच आणि चक्क मित्रांच्या वर्गाबाहेर बसून राहिला होता. संध्याकाळी मित्रांची शाळा सुटल्यावर सगळे सोबतच घरी आले.

घरी आल्यावर सोहमने आधी अंदाज घेतला. भावाला काहीच कळाले नव्हते. तो आपली खेळण्यातली गाडी घेऊन खेळत बसला होता. घरी काही कल्पनाच नव्हती. सोहम स्वत:ची शाळा बुडवून असा मित्रांच्या शाळेत जाऊन बसला होता, हे घरी कोणालाच माहिती नव्हते. सोहम त्याच्या बुद्धीवर फार खुश झाला. मनातच म्हणाला "कशी मात केली अडचणींवर?". कोणाला कळाले सुद्धा नाही". मग त्याने मित्रांना सांगितले "कोणाला सांगू नका.".

पण, तोपर्यंत एकाने सांगितले सुद्धा होते त्याच्या घरी. त्याच्या घरी, त्याला लहान समजून बहुदा कोणी लक्ष दिले नसावे. देवाने पुन्हा सोहमला वाचवले.

दुसऱ्या दिवशी त्याने विचार केला, "आता वाघ सरांना काय सांगायचे" काल शाळेत का नाही आलो ते?"

"मार पडेल, त्यापेक्षा शाळेत जायलाच नको." खरे तर सोहम माराला नाही घाबरायचा. पण, शाळेतील मुले चिडवतील याला घाबरायचा. पुन्हा त्याने ठरवले "आजसुद्धा शाळेत जायचे नाही, मित्रांकडे जायचे." त्याने तसेच केले.

म्हणजे, बाबा पहिल्या दिवशी शाळेत गेला नाही, कारण घरचा अभ्यास केला नव्हता. आणि दुसऱ्या दिवशी गेला नाही, कारण आदल्या दिवशी शाळेत न आल्याचे कारण सांगायला लागले असते.

दुसऱ्या दिवशीही तोच प्रकार. आज, मित्रांना सुद्धा त्याच्याबद्दल आत्मविश्वास आला होता. "सोहम आपल्याला भेटण्यासाठी स्वत:ची शाळा बुडवून येतो". याचा त्यांना अभिमान वाटू लागला होता. दुसऱ्या दिवशीही, त्यांची शाळा सुटली की सगळे घरी निघाले. त्यांच्या शाळेतून निघताना रस्त्यात एक तळे लागायचे. ते तळे घराजवळच होते. तळे बघून त्यांने विचार केला, "चला जरा पाण्यात खेळू". आता हे तळे म्हणजे काही तळे नव्हते. फक्त, कॉलनीच्या भिंतीमागे साठलेले पावसाचे पाणी होते.

दोन-तीन मित्र म्हणाले "हे काय तळे आहे का? घाण पाणी साठलंय नुसते" आम्ही जातो घरी". सगळे जण निघून गेले. पण, सोहमबरोबर एक जण होताच की. दोघे मनसोक्त खेळले पाण्यात. अर्धा तास झाला, एक तास झाला, मित्राच्या घरचे सगळे चिंतेत पडले. "हा कसा नाही आला अजून, बाकीचे तर सगळे आले".

झाले, त्याची शोधमोहीम सुरु झाली. त्याच्या वडिलांचे ऑफिस सुटले होते, नेमके ते सुद्धा याच रस्त्याने परत येत होते. त्याचे वडीलसुद्धा, फार शिस्तप्रिय म्हणून सगळ्या कॉलनीमध्ये प्रसिद्ध होते. ते असे काही स्वत:च्या मुलांना मारायचे, की बाकी मुले त्याच्याशी खेळायला सुद्धा घाबरायची.

आता, त्यांना हे दोघे पाण्यात खेळताना दिसले. झाऽले तर, त्याच्या वडिलांनी त्यांना पकडले. सोहमच्या मित्राला मारत-मारतच घरी घेऊन गेले ते. सोहमला काहीच बोलले नाहीत. बहुतेक, "दुसऱ्याच्या मुलाला आपण कसे मारणार?" असे त्यांना वाटले असावे.

सोहम सुद्धा घरी गेला. फार भीती वाटली. मनातच म्हणाला "देवा, वाचव". त्याचे वडील घरी आले तर सगळे उघडे पडेल." खरेच सोहम पुन्हा एकदा वाचला, त्याचे वडील काही घरी आले नाहीत. सोहम संध्याकाळी मित्राला भेटला. तो घाबरला होता. त्याने अंगावरचे वळ दाखवले आणि म्हणाला "यार, खूप मारले वडिलांने".

आता तरी सोहम सुधारला असेल, असे तुम्हाला वाटत असेल तर, थोडे थांबा, पुढे वाचा.

तिसऱ्या दिवशीही तेच घडले. सोहम पुन्हा मित्राच्या शाळेत गेला.

मित्र म्हणाला, "मी नाही येणार तुझ्याबरोबर".

पण, सोहम बसूनच राहिला. मित्राला म्हणाला "आपण तळयापाशी जायलाच नको" म्हणजे तुझे वडील पकडणार नाहीत."

मग ते त्या तळयात खेळायला गेले नाहीत. पण, रस्त्यात एक बाग होती. त्या बागेत झोका खेळत बसले. आता त्या बागेपाशी काही त्याचे वडील येणार नव्हतेच. भरपूर खेळले दोघे.

घरी आल्यावर, पावसात गारा गोळा करणे, कागदाच्या होड्या बनवून वाहत्या पाण्यात सोडणे, फुलपाखरे पकडणे, पतंग उडवणे अशी कामे होती त्यांची. कोणी तरी म्हणालेच आहे "ये दौलत भी ले लो, ये शोहरत भी ले लो, भले छीन लो मुझसे मेरी जवानी. मगर मुझ को लौटा दो बचपन का सावन, वो कागज की कश्ती, वो बारीश का पानी".

तर असेच, चौथ्या दिवशीही तोच प्रकार. पाचव्या दिवशीही तेच. गेले पाच दिवस सोहम, स्वतःच्या शाळेत न जाता मित्रांच्या शाळेत जात होता. पण, पाचव्या दिवशी एक घोळ झाला. शैलेशची बहिण, शैलेश म्हणजे, सोहमचा गेल्या पाच दिवसांचा पार्टनर. तर, शैलेशची बहीण सुद्धा त्याच्याच शाळेत शिकत होती. नेमकी ती त्याच बागेशेजारून चालली होती. तिने त्यांना पाहिले.

दोघांने तिला खूप विनवले, "प्लीज घरी सांगू नकोस." पण, तिने ऐकले नाही. ती तिच्या आई-बाबांना घेऊन सोहमच्या घरी पोचलीच. ती म्हणाली "तुमच्या सोहममुळे आमचा शैलेश बिघडत चालला आहे".

झाले, सोहमचे भांडे फुटले. खूप मार पडला. त्याला सुद्धा आणि शैलेशलासुद्धा. पण, मैत्री थोडीच तुटणार होती? आई सोहमला मारायची तेव्हा, तिच्या नखांचे वळ सोहमच्या गालावर आणि चेहऱ्यावर उमटायचे. पुढे हेच वळ पाहून "आपण फार घाणेरडे दिसतो" असे समजून सोहम दर वेळेस आईशी भांडायचा.

हे कमी होते म्हणून की काय, तेवढ्यात सोहमचा भाऊ घरी आला आणि म्हणाला "आई, वाघ सर म्हणत होते, दादा शाळेतच येत नाही गेले पाच दिवस."

सोहमचे दुसरे भांडेही फुटले. देव तरी किती दिवस वाचवणार? अजून मार खाल्ला. संध्याकाळी बाबा आले. आईने सगळा प्रकार बाबांना सांगितला. बाबा सोहमला म्हणाले "अरे बाळ असे करू नये". याने

पुन्हा विचार केला "बाबांनी मारले नाही. म्हणजे, बाबा आपल्या बाजूला आहेत वाटत".

आता, पुढच्या दिवशी शाळेत जायलाच लागले. पण, वाघ सर काही वर्गात घ्यायला तयारच नव्हते. सर म्हणाले "पाच दिवस कुठे होतास?" बहुतेक त्यांना सगळे माहिती असावे. पण मुद्दामच विचारत होते.

क्षणार्धात, सोहमची नवीन थाप तयार झाली. सोहम म्हणाला "जो मुलगा मला शाळेत सोडतो, तो आलाच नाही". तसे काही वेळा, कॉलनीमधला एक मोठा मुलगा अधे-मध्ये सोहमला शाळेत सोडत होता. सोहमने त्यालाच आधार बनवला.

सर पुन्हा म्हणाले, "त्याला घेऊन ये भेटायला". सोहमने त्याला सुद्धा पटवले आणि घेऊन आला शाळेत.

सोहम - दादा, तू मला वाचवशील ना?

दादा - हो रे, तू काळजी करू नकोस.

सोहम - अरे, सरांना कळले तर खूप मार पडेल रे. मी सांगणार आहे की तू मला शाळेत घेऊनच आला नाहीस. तुला सर काहीच म्हणणार नाहीत. आणि मी सुद्धा वाचेल.

दादा - तू काळजी करू नकोस. तू फक्त पहा मी कसे तुला सांभाळून घेतो ते.

आता सर आणि कॉलनी मधला मुलगा समोरासमोर होते.

सरांने त्याला विचारले "का रे याला शाळेत सोडले नाहीस पाच दिवस?" तुझ्यामुळे याच्या शिक्षणाचे किती नुकसान झाले, माहिती आहे का?" सर त्याला बोलायला लागले, रागवायला लागले.

तो सोहमपेक्षा खूप मोठा आणि चालाख होता. तसेच, सरांचे बोलणे ऐकून त्याला राग येऊ लागला होता. सोहमला दिलेले वचन तो क्षणार्धात विसरला. तो म्हणाला "मी तर सोडले होते. पण, हाच म्हणत होता "शेजारच्या थियेटरमधले घाणेरडे सिनेमे पाहू. बहुतेक हा ते सिनेमेच पाहत असेल शाळा बुडवून". सोहमने असे काही केलेच नव्हते.

झाऽले, सोहमची गेम त्याच्यावरच पालटली होती त्याने. सर काहीच बोलले नाहीत. पण, वर्गात घेतले सोहमला. बहुतेक, "वयाच्या दहाव्या वर्षातच आजकालची मुले वयात येत असतील" असे सरांना वाटले

असावे.

दरम्यान, सोहमच्या मित्रांसाठी तो हिरो झाला होता. त्यांच्या शाळेत, त्यांच्या मित्रांमध्ये, सोहमचे बहादुरीचे किस्से फार प्रसिद्ध झाले होते. सोहमसारख्या मुलांसाठी आता सोहम गुरु झाला होता. सगळे ओळखू लागले होते सोहमला. सोहम मित्रांच्या शाळेत गेला रे गेला, की त्याच्याभोवती सगळ्या मुलांचा गराडा पडू लागला होता. कदाचित, गोष्टी वाढवून-चढवून सांगण्याची सवय त्याला इथेच पडली असावी.

सोहमचा भाऊ आता दुसरीत होता. एकदा त्याची सहल राम-दऱ्याला जाणार होती. आईने त्याला सकाळीच उठवले. त्याची कुरकुर सुरु झाली. मोझे धुतले नव्हते म्हणून आणखीनच चिडला. आईला म्हणाला "मी काही जाणार नाही सहलीला". आईने बडगा दाखवल्यावर तेव्हा गुपचूप तयार झाला.

बाबा त्याला सकाळी शाळेत सोडून आले. होता होता संध्याकाळ झाली. सोहम शाळेतून घरी आला. घरी कोणीच नव्हते. त्याने आजूबाजूला विचारले, "आई कुठे आहे?" बाजूच्या बोरकर आज्जींने सांगितले, "शाळेच्या सहलीच्या बसला अपघात झाला आहे. सगळे ससून हॉस्पिटल मध्ये गेले आहेत." तुझ्या भावाच्या मित्राची, म्हणजेच रामची आई आली होती तुमच्याकडे." ती म्हणत होती "राम  सुद्धा गेला होता सहलीला". दोघेही (तुझा भाऊ आणि राम) एकाच सीट वर बसले होते". "राम-दऱ्या पाशी फुरसुंगीला, रेल्वे लाईन ओलांडताना, नेमकी रेल्वेच्या रुळावरच बस मधेच बंद पडली. तेवढ्यात, कोणती तरी रेल्वे येत होती. रेल्वेने बसला उडवले. बसमध्ये ४७ लोक होते. ४३ मुले, २ शिक्षक, एक शिपाई आणि ड्रायव्हर. "

बहुतेक, बसमध्ये असणारे सगळेच स्वर्गवासी झाले. तुमचा मयुरेश सुद्धा गेला अपघातात".

हे ऐकून सोहमवर आभाळच कोसळले. सोहम इकडे काळजी करत बसला. त्या वेळी सोहमची मावशी त्यांच्याकडेच राहायला होती. आय. टी. आय मध्ये शिकत होती. ती सुद्धा तेवढ्यात घरी आली. तिला सुद्धा कळाले. ती सुद्धा रडवेली झाली. थेट देवापाशीच गेली प्रार्थना करायला. सोहम सुद्धा मित्रांकडे गेला. सगळे म्हणाले "काळजी करू नकोस, वाचला असेल तुझा भाऊ".

एक एक मिनिट म्हणजे दिवस वाटत होता. थकून सोहम झोपी गेला. रात्री कधी तरी आई-बाबा घरी आले. आई बाबा घरी आले तसे सोहम खडबडून जागा झाला.

आता झाले असे की, जेव्हा बस रुळावर बंद पडली आणि रेल्वे येऊ लागली. तेव्हा सगळी मुले खुष

होती "अरे बघा रेल्वे येतेय" म्हणत होती. कोणी रेल्वेला "ये, ये" म्हणत होती, कोणी टाळया वाजवत होती, कोणी आश्चर्याने पहात होती, कोणी घाबरली होती. पण, त्या ६ वर्षाच्या मुलांना काय माहिती? तीच रेल्वे त्यांना उडवणार आहे.

रेल्वेने गाडीला उडवले. बहुतेक मुले रेल्वे रूळावरच पडली. शिक्षक सुद्धा उडून रेल्वेरुळावरच पडले. त्यात, ढवळे बाईंच्या शेजारी दोन-तीन मुले पडली. बाईंनी, दोन तीन सेकंदात त्या मुलांना बाहेरच्या बाजूला ढकलले आणि वाचवले. पण रेल्वे, ढवळे बाई आणि इतर मुलांच्या अंगावरूनच गेली. बाई स्वत: स्वर्गवासी झाल्या. पण, जाता जाता दोन-तीन मुलांना वाचवून गेल्या.

सोहमचा भाऊ उडून थेट शेतात पडला होता.

लोक गोळा झाले. पुढे दोन - तीन किलोमीटर जाऊन रेल्वे थांबली. इथे रेल्वे रुळावर, सगळीकडे रक्तच रक्त सांडले होते. सगळया मुलांच्या अंगावरून रेल्वे गेल्यामुळे त्यांची शरीर कापली गेली होती. सगळीकडे मृतदेहांचे अवयव पसरले होते. जो तो पाहून गलबलला होता. अनोळखी लोकांच्या डोळयातसुद्धा पाणी येत होते. इतक्या लहान मुलांसोबत असे का झाले? असे वाटून सगळे देवाला जाब विचारत होते. लोकांनी सगळया मुलांचे अवयव गोळा केले. आणि मिळेल त्या गाडीत मुलांना ठेवू लागले. त्यांना शेतात पडलेला सोहमचा भाऊ सुद्धा दिसला. शेतात पडल्यामुळे अवयव तर शाबूत होते. पण, मान टाकली होती. एकेका गाडीत ४-५ मुलांना ठेवले होते. असे १०-१५ गाड्या ससून हॉस्पिटलकडे रवाना झाल्या. रस्त्यात, ससूनकडे जाताना, कोणी जिवंत आहे की नाही? हे तपासले जाऊ लागले. बहुतेक मुलांचे श्वासोश्वास थांबले होते. पण, कोण जिवंत आहे आणि कोण नाही? हे समजत नव्हते.

कदाचित, "कोणीतरी जिवंत असेल आणि तातडीने जर आपण ससूनमध्ये पोचलो, तर एखादा प्राण वाचेल". गाड्यांचा वेग वाढला होता. तसे ससून हॉस्पिटल, रामदऱ्यापासून फक्त २०-२५ किलोमीटर आहे. मुलांना तपासताना सोहमच्या भावाचे पाय गरम वाटले. "हा जिवंत असावा" असे वाटून त्याला वेगळे ठेवले गेले. प्रत्येक क्षण महत्वाचा होता. शेवटी सगळे ससूनमध्ये पोचले. सगळया देव माणसांनी, प्रत्येक मुलाला वाचवायचा जीवापाड प्रयत्न केला.

सगळे ससून मध्ये पोचले. तिथे, आधीच सगळया मुलांचे पालक पोचले होते. जश्या गाड्या, ॲम्ब्युलन्स पोचू लागल्या तशी एकच धावपळ, रडारड सुरु झाली. आपल्या मुलाला शोधण्यासाठी प्रत्येक पालक आसुसलेला होता. त्यात सोहमचेही आई-बाबा होते.

मयुरेश जिवंत होता. डॉक्टरांने अशक्यप्राय असे प्रयत्न करून, काही मुलांना वाचवण्यात यश मिळवले.

आई म्हणाली "मयुरेश वाचला. मयुरेश उडून शेतात पडल्यामुळे, त्याच्या अंगाला इतर मुलांच्या तुलनेत थोड्या कमी जखमा झाल्या होत्या. इतर लोकांपैकी ड्रायवर, शिपाई, आणि चार मुले वाचली. त्यापैकी तिघांना ढवळे बाईंनी वाचवले". भावाचा जिवलग मित्र "राम" गेला होता.

दोन-तीन दिवसांने भाऊ शुद्धीवर आला. जसा होता तसा परत मिळाला. फक्त हात फ्रॅक्चर झाला होता. नंतर कोणातरी संतांकडून समजले, रेल्वेने सहलीच्या बसला उडवले तेव्हा सोहमचा भाऊ हवेत उडाला होता. साक्षात गजानन महाराजांने, हात देऊन सोहमच्या भावाला अलगद शेतात नेऊन ठेवले.

आपल्या आदल्या जन्मीच्या काही इच्छा, काही कर्म बाकी राहिली, की देव आपल्याला पुन्हा जन्म देतो. ज्यांच्या इच्छा, कर्म पूर्ण होतात, त्यांना मुक्ती मिळते. आता जी मुले स्वर्गवासी झाली, त्यांच्या इच्छा, कर्म बहुतेक पूर्ण झाली असावीत.

कदाचित, भावाला पुढे मोठी कर्म करायची होती. म्हणूनच, तो वाचला असावा. कदाचित, सोहम हा असा विचित्र, वाया गेलेला होता. म्हणूनच, देवाला आई-बाबांची काळजी होती. "यांना म्हातारपणी कोणीतरी आधार असावा" म्हणूनच देवाने भावाला वाचवले असावे.

वाचलेल्या मुलांना पुढच्या इयत्तेत प्रवेश मिळाला. सरकारकडून उपचारांसाठी २५ हजार रुपये मिळाले. काही पालक, ज्यांची मुले स्वर्गावासी झाली होती, त्यांने आपले पैसे गरीबांमध्ये वाटून टाकले.

## १०. वेडा संशोधक, इयत्ता सहावी, सातवीतले पराक्रम

आता सोहमसुद्धा सहावीत पोचला होता. त्याचे पराक्रम अजूनच वाढणार होते.

जसा सोहम शाळेत जाऊ लागला, तशी त्याला उन्हाळयाची सुट्टी आठवू लागली. ते दिवसभर क्रिकेट खेळणे आठवू लागले. शाळेला दांडी मारून मित्रांकडे जाणे आठवू लागले. शाळेत जाणे म्हणजे एकदम असह्य वाटू लागले.

पावसाळा चालू होता, रोज भिजत भिजत शाळेत जायचे म्हणजे नको वाटायचे. स्लीपरमुळे, रस्त्यावर साठलेला चिखल पायावर उडायचा. पाय सगळे चिखलाने बरंबटून जायचे. सकाळी थंड पाण्याने पाय धुवायचे म्हणले तर नको वाटायचे. अर्थातच, यामुळे कोणी शाळेत जाणे बंद करत नाही. आणि केलेच, तर शाळा बुडवून इतरच ठिकाणी भटकत बसत नाही. पण, सोहम म्हणजे सोहम होता.

आता आई तर भावाची काळजी घेण्यात मग्न होती. सोहमला रान मोकळेच मिळाले होते. अजूनपर्यंत दांडी मारली नसली, तरी भरपूर खेळणे चालूच होते.

दरम्यान याचा भाऊ पुन्हा एकदा संकटात पडला. त्याने खेळायला रॉकेलचा रिकामा कॅन घेतला. खेळता खेळता त्याचा वास घेऊ लागला. वास काही त्याला सहन झाला नाही आणि त्याने डोळेच पांढरे केले. गडाबडा लोळायला लागला. आई-बाबा घाबरले. सगळया लोकांना मदतीसाठी हाका मारल्या. पण कोणीही आले नाही. मग बाबा म्हणाले "याला दवाखान्यात न्यावे लागेल" मी रिक्षा घेऊन येतो". पण रिक्षा सुद्धा मिळाली नाही.

तेवढ्यात कॉलनीमध्ये एक रिक्षा आली. शेजारच्या नलगे काकुंने मागवली होती. आई काकूंकडे गेली आणि म्हणाली "प्लीज तुमची रिक्षा आम्हाला देता का? माझा मुलगा फार कसेतरी करतोय, त्याला दवाखान्यात घेऊन जायचंय. तर काकू म्हणाल्या "नाही, आम्हाला लग्नाला जायचंय, आम्ही रिक्षा नाही देऊ शकत." एकतर इकडे रिक्षा मिळत नाहीत".

आजकाल जीवनाची किंमत कमी झाली आहे आणि लग्नाची जास्त. तसेही आजकाल, पैश्याला जास्त महत्व आहे म्हणा.

शेवटी आई-बाबा आणि सोहम, भावाला घेऊन चालतच बाहेर पडले. जवळच्याच एका दवाखान्यात गेले. तिथल्या डॉक्टरांने ॲम्ब्युलन्स बोलावली. भावाचा श्वास थांबत चालला होता. कसेतरी सगळे मोठ्या हॉस्पीटलपर्यत पोचले. तिथे सोहमचा भाऊ परत एकदा वाचला.

काही दिवसांने, असाच एकदा सोहम विचार करत होता, "कधी आणि कशी शाळेला दांडी मारायची." त्यातच एकदा त्याने घरचा अभ्यास केला नाही. झाले, त्याला पहिले कारण मिळाले होते शाळेला दांडी मारायला. सवयीप्रमाणे त्याने ठरवले. त्याने पहिली दांडी मारली. थेट मित्रांच्या शाळेत गेला. त्याने ठरवले होते "या वेळेस मित्रांकडे जायचे. पण, त्यांच्या शाळेच्या आजूबाजूला खेळायचे नाही". म्हणजे त्यांचे बहीण-भाऊ, आई-बाबा पकडू शकणार नाहीत." प्रत्येक नवीन अडचणीवर नवीन उपाय शोधण्यात आता हा पटाईत होऊ लागला होता.

पुन्हा एकदा, सोहम स्वत:ची शाळा बुडवून मित्रांच्या शाळेत गेला. तो तिकडे प्रसिद्ध झालाच होता. सोहमचे मित्रसुद्धा, आता सोहमसारखीच शाळेला दांडी मारून फिरण्यासाठी उत्सुक झाले होते. त्यातच, दांडी मारणारे अजून दोन-तीन मित्र मिळाले. सगळे, सायकल भाड्याने घेऊन थेट खडकी बाजार गाठायचे. तिकडेच फिरत बसायचे. खेळत बसायचे. आता कोणत्याही मित्राचे वडील-आई, भाऊ-बहिण जवळपास दिसणार नव्हते. आणि काहीही अडथळयाशिवाय खेळायला मिळणार होते.

असे दोन-चार दिवस गेले असतील. सगळे मित्र घाबरले, सोहमला म्हणाले "बास आता, आम्ही काही या पुढे येणार नाहीत".

आता सोहमचा नाईलाज होता. आता तो एकटाच उरला होता. पण त्याने ठरवले "काहीही होऊ दे, शाळेत जायचेच नाही". कुठे अभ्यास करा? कुठे मार खा? त्यापेक्षा, हे जीवन म्हणजे कसे मजेदार आहे?"

त्याने ठरवले "शाळेत जायचे नाही आणि या वेळेस पकडले जायचे नाही".

पण, मित्र बरोबर नसल्यामुळे "आता काय करायचं, कोणाबरोबर खेळायचं?" आपण घरातून सकाळी ७ वाजता निघतो. दुपारी एक वाजेपर्यंत घरी पोचतो. सात वाजल्यापासून एक वाजेपर्यंत सहा तास असतात, ते कसे घालवायचे?"

आता एक नवीनच अध्याय सुरु होणार होता.

याला ते पाण्यात खेळणे आठवू लागले. पण, ते पूर्वीचे तळे अगदी घराशेजारीच होते. तिकडे खेळणे थोडे धोकादायक होते. कोणी पाहिले असते तर पकडला गेला असता ना सोहम.

या पठ्ठ्याने नवीनच जागा शोधून काढली. युनिवर्सिटी रस्त्यावर पूर्वी खूप दगडाच्या खाणी होत्या. त्या खाणींमध्ये खोदकाम झाल्यामुळे, तिकडे मोठे खड्डे निर्माण झाले होते. आता पावसाळ्यात, या खड्ड्यांमध्ये पाणी साठायचे आणि तळे तयार व्हायचे. या तळयात आजूबाजूचे लोक म्हशींना धुण्यासाठी घेऊन यायचे. हा त्या पाण्यात पोहायला जायचा. तिकडेच हा पोहायला शिकला.

काही दिवसांने, कंटाळा आल्यावर याने दिनक्रम बदलला.

सोहम दप्तर वगैरे घेऊन, शाळेचा गणवेश घालून घरातून निघायचा, शिवाजी नगर पर्यंत जायचा. पण शाळेत नाही जायचा. त्याचे दोन-तीन मित्र काड्यापेटीचे छाप गोळा करायचे. यालाही वाटले "आपणसुद्धा काड्यापेटीचे छाप गोळा करू." आता त्याला नवीनच वेड लागले होते, काड्यापेटीचे छाप जमवायचे. मग काय, आधी त्याने शिवाजी नगर रेल्वे स्टेशन पूर्ण पालथे घातले आणि मिळतील तेवढे काड्या-पेटीचे छाप गोळा केले. २-३ दिवस हाच दिनक्रम सुरु होता.

पण आता, शिवाजी नगरला नवीन छाप मिळणे बंद झाले होते. "आता काय करायचे?" तर आपण दापोडीला जायचे, तिथेही शोधायचे". खडकीला नाही जायचे, तिकडे कोणी पाहिले तर?" अश्या प्रकारे सोहम, दापोडी, पुणे स्टेशन, कासारवाडी, पिंपरी, चिंचवड पर्यंत पोचला. हजार-दोन हजार छाप गोळा केले त्याने.

आता तो ज्या रेल्वे स्टेशनला जायचा. तिकडे कोणीही, काहीही, खेळताना दिसले, की हा सुद्धा शामिल होऊ लागला. त्याची प्रसिद्धी, पुणे स्टेशन पासून चिंचवड पर्यंत पोचली होती. म्हणजे लहानपणापासूनच, सोहमला कोणत्या ना कोणत्या कारणाने प्रसिद्ध व्हायची सवयच होती.

गोट्या, क्रिकेट, विटी-दांडू असे खेळ आता तो चांगल्या प्रकारे खेळू लागला होता.

१५-२० दिवस झाले असतील. सोहम घरून निघायचा, खूप फिरायचा, पोहायचा, छाप गोळा करायचा, खेळायचा, बागडायचा. शाळा सुटायची वेळ झाली की घरी पोचायचा. कोणाला काहीही संशय आला नव्हता. पण त्याला रोजच भीती वाटायची, "घरी कळाले तर?"

कॉलनीत एका मुलाकडे दुर्बीण होती. तो काही ती दुर्बीण सोहमला द्यायचाच नाही. आता सोहम दुपारी घरी पोचला, की त्याला नवीनच वेड लागले होते. सोहमला दुर्बीण बनवायची होती "त्याची स्वत:ची". एका ओळखीच्या काकांने दोन भिंग दिली होती त्याला. एक होते अंतरवक्र आणि दुसरे होते बही:वक्र. त्याने दोन पोकळ डब्बे घेतले. दोन्हीही, आकाराने म्हणजे व्यासाने वेगळे होते. त्यांच्या दोन्ही टोकांना ही दोन भिंग बसवली. आता हे दोन डब्बे असे जोडले, की त्यांच्यातले अंतर कमी जास्त करता येत होते.

मग दुर्बीण तपासण्यासाठी तो घराच्या गच्चीवर गेला. काय आश्चर्य, खडकी बाजारातील, सात किलोमीटर दूरवरची शेवाळे बिल्डिंग स्पष्ट दिसत होती, अगदी नाव सुद्धा स्पष्टपणे दिसत होते. बाकीच्यांच्या दुर्बिणीमधून समोरची बिल्डींगसुद्धा नीट दिसायची नाही. चला, सोहमचा पहिला प्रयोग यशस्वी झाला होता. त्याची दुर्बीण फार प्रसिद्ध झाली होती. जो मुलगा त्याला दुर्बीण देत नव्हता, तोच आता सोहमची दुर्बीण मागू लागला होता. सोहमला वेड्यात काढून, ती दुर्बीण पुढे कोणीतरी चोरली. सोहम फार रडला तेव्हा.

काही दिवसांने सोहमला लक्षात आले "आपल्याकडे केबल कनेक्शन नाही". "आपल्याकडे एकच वाहिनी दिसते, ती म्हणजे दूरदर्शन". मग त्याला वाटले "एक डिश-ॲन्टीना तयार करावा". म्हणजे काही वाहिन्या दिसतील. आता डिश-ॲन्टीना कसा दिसतो? तर, चाळणी सारखा. मग त्याने घरातूनच एक जुनी चाळणी मिळवली. तिला तांब्याच्या काही तारा गुंडाळल्या. आणि, वायर दिली घराच्या ॲन्टीन्याला जोडून.

पुन्हा आश्चर्य, अजून एक वाहिनी सुरु झाली होती. त्या वाहिनीवर फक्त चित्रपटच लागायचे. दोन-तीन दिवस व्यवस्थित चालले. पण, तिसऱ्या दिवशी ती वाहिनी दिसेनाशी झाली. गच्चीवर जाऊन पाहिले तर, वाऱ्यामुळे त्याचा ॲन्टीना तुटून लोंबकळत होता. पुन्हा जोडला. पण, आता ती वाहिनी दिसत नव्हती.

शेवटी त्यांनी केबलच घेतले.

आता सोहम सिनेमे घरीच पाहू शकत होता. सिनेमा पहाता पहाता त्याला एक कल्पना सुचली, "आपण प्रोजेक्टर बनवला तर?" प्रोजेक्टर म्हणजे, अलीकडे काच, पलीकडे फिल्म आणि मागून दिव्याने फोकस अशी रचना असते.

सोहमला प्रोजेक्टर बनवण्याचे नवीन खूळ मिळाले होते. जुन्या काळी असा एक फिल्म पाहण्याचा डब्बा मिळायचा. त्याने तो मिळवला. सोहमला जे जे हवे होते, ते देव देत होता. आता फिल्म्स शोधायच्या

होत्या. पण, फिल्म्स शोधायच्या कधी? तर आता हा फिल्म्स शोधायला बाहेर पडू लागला. अर्थातच, शाळेला दांडी मारून. भरपूर फिल्म्स गोळा केल्या त्याने.

आता डब्बा मिळाला, फिल्म्स सुद्धा मिळाल्या. आता अंधारी खोली आणि प्रकाशासाठी लाईट हवी होती. अंधारी खोली म्हणजे, आईची साडी बांधून तयार केलेली जागा. आणि लाईट म्हणजे, दिवाळीच्या माळेतील छोटा दिवा.

अश्या प्रकारे त्याचा स्वत:चा प्रोजेक्टर तयार झाला. पण, चित्र उलटे दिसायचे. ते त्याला कधीच सरळ नाही करता आले.

असो, जर सोहमने लहानपणापासून अभ्यासाकडे व्यवस्थित लक्ष दिले असते, पाया भक्कम केला असता, तर तो नक्कीच एखादा शास्त्रज्ञ होऊ शकला असता. असो, पण पुढे जाऊन, त्याचे तोच भलेमोठे शोध लावणारच होता म्हणा.

मध्यंतरी, सोहमच्या आयुष्यात राजू मामा आले. राजू मामा रिक्षा चालवायचे. त्यांच्या बहादुरीचे, मारामारीचे किस्से ऐकून सोहमला वाटायचे "आपण सुद्धा रिक्षा चालवावी. म्हणजे, आपण पण डेंजर होऊत. आपल्याला कोणी मारणार नाही. कोणी आपले चेंडू, गोट्या हिसकावून घेणार नाही."

त्याकाळी, सुनील शेट्टी, अजय देवगण यांचे सिनेमे फार चालायचे. राजू मामाचे व्यक्तिमत्व म्हणजे, असेच सुनील शेट्टी किंवा अजय देवगणचे वाटायचे. राजू मामा प्रत्येक गोष्टीत पटाईत. गोड बोलण्यात तर राजू मामा एक नंबर. पण, जेवढे गोड तेवढेच बहादूर. प्रत्येक कलेत निपुण होते राजू मामा. गायचे, वेगळ्या वेगळ्या कलाकारांचे हुबेहूब आवाज काढायचे. त्यांचे पाहून पाहून सोहमसुद्धा हळू हळू गायला आणि कलाकारांचे आवाज काढायला शिकला.

आईच्या दु:खात राजू मामाच एकमेव आधार होते. राजू मामांसोबत वेळ कसा निघून जायचा? ते कळायचे सुद्धा नाही.

राजू मामा म्हणजे पुस्तकांचे दुकानच होते. प्रत्येक घटनेवर त्यांच्याकडे काहीना काही गोष्ट उपलब्ध असायचीच. गोष्टीसुद्धा अगदी रंगवून रंगवून सांगायचे. काल परवाच, अगदी १५ ऑगस्टच्या दिवशी, अचानक राजू मामा गेल्याची बातमी कानावर पडली. ऐन ४५व्या वर्षीच, हृदयविकाराने राजू मामांचे निधन झाले होते. त्या दिवशी खरं सांगतो, मन अगदी बेचैन झाले होते. कदाचित, स्वातंत्र्यदिनीच देवाने त्यांना स्वतंत्र केले असावे.

पुन्हा भूतकाळात जाऊ.

आईने सोहमचे पराक्रम राजू मामाला सांगितले होतेच.

आता सोहम, गेला एक महिना शाळेला दांडी मारत होता. शेवटी त्याच्या बाईंनी भावाकडे निरोप पाठवला. घरी कळाले. आईने मामाला सांगितले. आयुष्यात पहिल्यांदाच सोहमने पट्ट्याने मार खाल्ला. अंगावर वळ उठेपर्यंत मार खाल्ला. नंतर मामाला दया आली. मामा म्हणाला "अरे सोहम, तुला आईने किती वेळा सांगितले? अरे, एवढा त्रास नसतो रे द्यायचा घरच्यांना." म्हण, पुन्हा असा त्रास देणार नाही".

सोहम सुद्धा म्हणाला. "पुन्हा असा त्रास देणार नाही". पण, आपण असे वागल्यामुळे घरच्यांना कसा काय त्रास होत असेल?" हे सोहमला अजूनपर्यंत कळतच नव्हते.

त्याच दिवशी, सोहमने जमवलेले हजार-दोन हजार काड्या-पेटीचे छाप आईने जाळून टाकले. सोहमला मार खाण्याचे दु:ख नाही झाले. पण, गेल्या एका महिन्यात साठवलेले, सगळे काड्या-पेटीचे छाप जाळून टाकल्याचे दु:ख झाले.

दुसऱ्या दिवशी आई पुन्हा शाळेत आली. बाईंसमोर खूप रडली. पुन्हा सोहमची शाळा सुरु झाली. तसे आत्तापर्यंत, सोहम कसातरी पास होऊन पुढच्या वर्गात जात राहिला होता.

मामाने सुद्धा एक आयडिया लडवली. त्याने त्याच्या एका मित्राला, रोज सोहमला शाळेतून आणायचे काम सांगितले. आता हा मित्र म्हणजे "सोन्या". तर हा सोन्या मामा, सोहमच्याच शाळेतील मुलांना रिक्षाने ने-आण करत होता. आता होणार असे होते की, जाताना शाळेतली मुले सोहमच्या बरोबर असणार होती आणि येताना मामाचा मित्र. म्हणजे दोन्ही वेळेस सोहमवर कोणाचेतरी लक्ष राहणार होते. त्याला दांडी मारता येणार नव्हती.

आता, मामाकडे सोहमचा अभ्यास घेण्याची जबाबदारी आली होती. उत्तरे चुकली, की पट्ट्याने मार ठरलेलाच होता. मामा, सोहमला अंगठे पकडायला सांगून पाठीवर पट्टी ठेवायचा. पट्टी पडली तर पट्ट्याने मार मिळायचा. "रोज दोन पान शुद्धलेखन करायचे" हा नियमच राजू मामाने सोहमसाठी घालून दिला होता. शुद्धलेखन केल्यामुळे, आता हळू हळू सोहमचे अक्षर सुधरू लागले होते.

अधे मध्ये राजू मामा, आई, सोहम आणि भावाला घेऊन सहलीला न्यायचा. कधी सिंहगड, कधी मुळशी, कधी लोणावळा, अश्या रिक्षातूनच सहली काढल्या जायच्या. असेच एकदा, मामाने सहल ठरवली. ठिकाण होते खेड-शिवापूर, बनेश्वर. तर सगळ्यांनी खेड-शिवापूरच्या दर्ग्याचे दर्शन करून, बनेश्वरच्या

महादेवाचे दर्शन घेतले आणि मागेच असणाऱ्या बागेपाशी गेले.

बागेपाशी एक डबके होते. आता हे डबके म्हणजे, दोन खडकांत साठलेले पाणी. पाणी बघून सोहमचा संयम सुटला. त्याच्याबरोबर भाऊ होता. भाऊ म्हणाला "मी काही येत नाही पाण्यात". तूच जा". सोहम पाण्यात उतरला, भाऊ बाहेरच बसून राहिला. पाण्यात सोहमचा पायच सटकला. सोहम बुडू लागला. भावाने त्याला बुडताना पाहिले आणि ओरडू लागला "आई दादा बुडतोय". ते सोहमला सुद्धा ऐकू आले. तो बुडत होता, पण भीती वाटली पट्ट्याच्या माराची. त्याने डोके लडवले आणि पाण्याच्या तळाशी गेला. तळाशी गेल्यावर, जोरात पायाने जमिनीवर दाब देऊन वरच्या दिशेने आला. नशीब पूर्ण खडक होता तो, काहीही गाळ नव्हता. नाहीतर सोहमचे काही खरे नव्हते. वर पोचल्यावर, आधी एका दगडाला पकडले आणि बाहेर आला. तोपर्यंत मामा, बाबा सगळे आले. सगळयांना वाटले "भावाचा काहीतरी गैरसमज झाला असावा. "

चला, पट्ट्याचा मार वाचला होता. (सोहमला तेव्हा नीट पोहता येत नव्हते. पण वाचण्याची कला शिकला तो या घटनेतून. तर लहान मित्रांनो, बुडत असताल तर असे वाचता येते बुडण्यापासून. लहान मुलांच्या पालकांनो, मुलांना पोहायला जरूर शिकवा).

याच वर्षी सोहम, आई आणि भाऊ मावशीच्या घरी गेले. त्यांच्या घरी सुद्धा, मारामारी करून सगळयांना हैराण करून सोडले. आई कशी काय संभाळणार होती त्यांना, देवच जाणे? आई म्हणाली, "आता दंगा केलात तर मामालाच सांगेन घरी गेल्यावर". तेव्हा कुठे सोहम गप्प झाला. पण, घरी आल्यावर आई त्याचे पराक्रम मामाला सांगणार. हे त्याला माहितीच होते.

तिथून सगळे आज्जीच्या गावाला गेले. तिथेही हा नारळ तोडण्यासाठी घराच्या पत्र्यावर चढला. मामीसुद्धा सोबत होती. नेमका नारळ पत्र्यावर पडला. नारळाच्या दणक्याने पत्रा वाकला आणि दोन पत्र्यांमध्ये जागा निर्माण झाली. सोहम नेमका उतारावर उभा होता. त्याचा तोल गेला आणि सोहम त्या पत्र्यांच्या मधल्या जागेत जाऊ लागला. मामीने पकडले म्हणून वाचला. नाहीतर, शरीर आणि डोके वेगळे झाले असते.

आपल्या आदल्या जन्मीच्या काही इच्छा, काही कर्मे बाकी राहिली की देव आपल्याला पुन्हा जन्म देतो. ज्यांच्या इच्छा, कर्मे पूर्ण होतात त्यांना मुक्ती मिळते. बहुतेक सोहमला पुढे काही मोठे पराक्रम करायचे

होते म्हणूनच तो वाचला असेल.

आईला कळाले होते "आता जास्त दिवस याला मामा-मावशीकडे ठेऊन काही फायदा नाही. त्यापेक्षा घरीच निघावे. ठरले तर, सगळे दुसऱ्या दिवशीच पुण्याला परत आले.

आता आई राजू मामाला सांगणार होती. पट्ट्याने मार मिळणारच होता. पण, सोहम खुष होता. कारण मार, सोहमला आणि त्याच्या भावाला अशा दोघांना मिळणार होता. म्हणजे, या वेळी सोहम एकटा नव्हता. म्हणूनच तो खुष होता. तसेही व्हायचे असे की, संध्याकाळी मामा दोघांचीही पप्पी घ्यायचे. भाऊ जेव्हा मामाला पप्पी द्यायला जायचा, तेव्हा हळूच मामाच्या कानात सोहमच्या चहाड्या सांगायचा. याच्या चहाड्यांमुळे, सोहमला नेहमी मार खायला लागायचा.

या वेळी सोहम खुष होता. मनातच भावाला म्हणाला "रोज माझ्या चहाड्या सांगतोस काय? मला तर मार खायची सवयच आहे. पण तुझे कसे होणार आता? इतकी नाजूक तुझी त्वचा. आता तुला कळेल, मार कसा लागतो ते."

दरम्यान, सोहमचे वडील ज्ञानेश्वर महाराजांच्या पालखीबरोबर आषाढात पंढरपूरच्या वारीला जाऊ लागले. आता, या पंधरा दिवसात सोहमला मार खाण्यापासून वाचवणारे कोणीच नव्हते. सोहम एकटाच दु:खी व्हायचा. नेहमी बाबांना म्हणायचा "बाबा नका जाऊ वारीला." बाबांना त्याच्या बोलण्याचा मूळ अर्थ कधीच कळला नाही. तसेही, बाबांचे पांडुरंग प्रेम मोठे असायचे आणि बाबा निघायचे वारीला.

असे दिवस चालले होते. सहावीचे वर्ष संपले, परीक्षा झाल्या. निकाल लागला आणि सोहम अनपेक्षितरीत्या पास झाला आणि सातवीत पोचला. पराक्रमाची पातळी अजूनच वाढणार होती.

सातवीत आईने, सोहमला इंग्रजी आणि गणिताचा क्लास लावला. क्लास होता रेंज-हिल्स मध्ये बहिरट सरांकडे. बहिरट सर मस्त शिकवायचे गणित. क्लास असायचा संध्याकाळी. आता, सकाळी शाळेत जाणे आणि संध्याकाळी क्लासला. सोहमचा दिनक्रम पक्काच करून टाकला होता आईने. आईला वाटले असेल "याला नवीन नवीन योजना बनवायला वेळच मिळणार नाही." पण, सोहमला काही शाळेत जावेच वाटत नव्हते. क्लासला मात्र नियमाने जावे वाटायचे.

सोहम विचार करायचा "आता तर "सोन्या मामा सुद्धा आहे लक्ष ठेवायला" मग दांडी कशी

मारणार शाळेला?" त्याला एकदम हतबल झाल्यासारखे वाटू लागले.

महिनाभर झाला असेल, सोहम शाळेला नियमित जात होता. एक चाचणी परीक्षा सुद्धा चांगल्या मार्कांने पास झाला. घरच्यांना वाटले "हा आता सुधारला असेल".

पण नाही, अचानक एके दिवशी "राजू मामा" आणि "सोन्या मामाचे" काहीतरी बिनसले. आणि, सोहमचे रिक्षाने जाणे बंद झाले. आता त्याच्यासमोर फक्त एकच अडथळा होता. तो म्हणजे, सकाळी त्याच्याबरोबर शाळेत जाणारी, त्याच्यावर लक्ष ठेवणारी मुले.

अशातच, आईचा अपघात झाला. कंबरेचे हाड फ्रॅक्चर झाले. आई दोन महिने दवाखान्यातच राहणार होती. बाबा गावावरून मावशीला घेऊन आले. मावशी तेव्हा गरोदर होती. पण, आईवरच्या आणि मुलांवरच्या प्रेमापोटी ती पुण्याला आली.

आईचा अपघात होण्याचे कारण म्हणजे, गेली काही वर्षं, जशी मुले मोठी होत होती. तसे घरात येणारा बाबांचा पगार कमी पडू लागला होता. आई कधी कपडे, चादरी, बटाट्याचे पापड, तांदळाच्या चकल्या, पापड्या, असे काही काही बनवून विकून घराला हातभार लावत होती. तसे, अधे मध्ये आईने ४-५ वेगळ्या वेगळ्या नोकऱ्यासुद्धा केल्या होत्या. कधी शेतकी कॉलेजमध्ये लेखनिक म्हणून, कधी लॉटरीच्या दुकानात मदतनीस म्हणून, कधी केबलवाल्याकडे पैसे गोळा करण्याचे काम. असे, भरपूर प्रयत्न केले होते आईने आत्तापर्यंत.

अशातच राजुमामाची ओळख झाली होती. राजू मामांच्या प्रोत्साहनामुळे, आईने रिक्षा शिकून, नवीन रिक्षा विकत घेऊन, स्वत: रिक्षा चालवायचे ठरवले. तर असेच एकदा, राजू मामा आईला रिक्षा शिकवत होते. एका वळणावर रिक्षा पालटली आणि आईचे कंबरेचे हाड मोडले.

प्रॉब्लेम असा होता की, थेट कंबरेचेच हाड फ्रॅक्चर झाले होते. तिथे प्लास्टर करता येत नव्हते. फक्त इंजेक्शन घेऊनच बरे व्हायचे होते. दोन महिने रोज दहा इंजेक्शन घ्यायचे होते. म्हणजे, दोन महिन्यात आई ६०० इंजेक्शन घेणार होती, ते सुद्धा कंबरेत.

रोज मामा आणि बाबा दवाखान्यात जायचे. घरी फक्त मावशीच असायची. आता मावशीला तर सोहम सहज वेड्यात काढू शकणार होता.

सोहमने पुन्हा एकदा घरचा अभ्यास केला नाही. पुन्हा घाबरून शाळेला दांडी मारावेसे वाटू लागले. त्याने पुन्हा विचार केला "बरोबर ही मुले असताना दांडी कशी काय मारायची?". त्याला नाविन

आयडिया सुचली " त्या मुलांसमोर आपण वर्गापर्यंत जायचे. आणि शाळा भरायच्या अगोदरच शाळेतून परत बाहेर पडायचे."

पुन्हा नवीन आणि फूल-प्रूफ प्लॅन ठरला होता. त्याने दुसऱ्या दिवशी तसेच केले. तिसऱ्या दिवशी, गेल्यावेळीसारखाच विचार पुन्हा मनात आला "आता बाईंना काय सांगायचे? काल का नाही आलो म्हणून?" त्या पेक्षा शाळेत जायलाच नको. "पुन्हा पहिले पाढे पंचावन्न."

पुन्हा रेल्वे स्टेशन वर भटकणे सुरु.

असेच, शाळेला दांडी मारून ७ - ८ दिवस झाले असतील. कॉलनी मध्ये एक मुलगी होती. तिला "दिव्या भारती" फार आवडायची. झाले, सोहमला सुद्धा "दिव्या भारती" आवडू लागली. मग त्याला नवीन खूळ मिळाले, "दिव्या भारती" चे फोटो गोळा करण्याचे. आता सोहम "दिव्या भारतीचे" फोटो मिळवण्यासाठी शाळेला दांडी मारून फिरू लागला.

असा एक महिना झाला बाबा शाळेतच गेला नाही. महिन्याने आई, बरी होऊन घरी आली.

त्या काळी w.w.f फार प्रसिद्ध झाले होते. सोहम आणि त्याचा भाऊ दिवसभर तो कार्यक्रम बघायचे. w.w.f बघून घरीच मारामारी करायचे. w.w.f. चे फोटो गोळा करायचे. आई बरी होऊन घरी येईपर्यंत, सोहमची आवड बदलली होती. आता त्याला दिव्या भारती आवडेनाशी झाली. आणि नवीन वेड लागले, w.w.f. चे फोटो गोळा करण्याचे. आता हा w.w.f. चे फोटो गोळा करण्यासाठी फिरू लागला होता. हे फोटो तो भावाला लाच म्हणून द्यायचा, "मामाला त्याच्या चहाड्या न सांगण्यासाठी.

असा दीड महिना झाला होता त्याला शाळेत जाऊन. बाईंनी एका "अमित" नावाच्या मुलाला, सोहमच्या घरी जाऊन यायला सांगितले. त्या काळी मोबाईल वगैरे असे काही नव्हते बरं का. अमित कॉलनीत पोचला तेव्हा नेमका सोहम घरीच होता. त्याने अमितला घरी येताना पाहिले. सोहमने घराला कुलूप लावले आणि गच्चीवर जाऊन लपला. अमितने, घराला कुलूप पाहून एक चिठ्ठी लिहिली. चिठ्ठी घरात टाकून दिली आणि निघून गेला. त्याला गेलेला पाहून सोहम घरी गेला आणि चिठ्ठी उचलली. त्यावर लिहिले होते "सोहम शाळेत येत नाही, बाईंना येऊन भेटणे".

आता तरी सुधारावे की नाही? पण, त्याने पुन्हा ठरवले "या वेळेस घरी काहीच कळू द्यायचे नाही".

चिठ्ठी फाडून टाकली.

शाळेतून घरी पाठवलेली तक्रारींची पत्र, हा बाबा पोस्ट-मन ला शोधून स्वत:च मिळवून फाडून टाकू लागला.

दांडी मारणे सुरूच होते. कॉलनीत खेळताना याच्याकडे बॅट आणि बॉल नव्हती. खेळणारी मुले याला बॅटिंग द्यायची नाहीत. त्याने ठरवले "आपल्याकडेही आपला बॉल असावा." त्याचे वेड पुन्हा बदलले.

त्याला आता, टेनिसचे चेंडू मिळवण्याचे वेड लागले होते. शिवाजी नगरच्या परिसरात फिरताना कोणी टेनिसच्या चेंडूने खेळताना दिसले, की स्वत:ची वही त्याला देऊन हा टेनिसचा चेंडू मिळवू लागला. घरी आईने विचारले तर सांगायचा "अग आई, एक गरीब मुलगा भेटला, त्याच्याकडे वही सुद्धा नव्हती, त्याला शिकायची फार इच्छा होती. म्हणून मी माझी वही त्याला देऊन टाकली." "आपला मुलगा दिलदार झाला" असे समजून आईसुद्धा खुष व्हायची. गेल्या १५ दिवसात याने १०-१२ टेनिसचे चेंडू गोळा केले होते. एकही वही शिल्लक राहिली नव्हती.

सातवीतच त्याच्या लक्षात आले, आई आणि भावाने एक गल्ला जमवला आहे. गल्ला म्हणजे पिगी बँक. तो गल्ला प्लास्टिकचा होता. खाली एक झाकण होते. हे झाकण उघडून, सोहम रोज गल्ल्यातून ५ रुपये चोरू लागला.

बाहेर नवीनच "सिद्धी-विनायक" ची वडा-पावची गाडी लागली होती. या पाच रुपयातून हा वडा-पाव खाऊ लागला.

काही काळाने "सोहम गल्ल्यातून पैसे चोरतो म्हणून" घरी लक्षात आले. थोडा मार पडला, गल्ला सुद्धा बदलला गेला. यावेळी कलिंगडा सारखा मातीचा गल्ला आला होता. तो फोडला तर पकडला गेला असता सोहम.

भाऊ लहान असूनही पैसे साठवायचा आणि सोहम मोठा असूनही पैसे चोरायचा. भावाला सोहममुळे नवीनच ड्युटी लागली होती. रोज संध्याकाळी, घरी आले की गल्ला तपासायची. भाऊ रोज गल्ल्याच्या वजनावरुन "सोहमने आज पैसे चोरले की नाही?" याचा अंदाज लावू लागला होता. त्याचा भाऊ म्हणजे "क्रांतिवीर" चित्रपटातला "परेश रावलच" होता.

पुढे कधी तरी संजय दत्त आणि जॅकी श्रॉफचा "खलनायक" हा सिनेमा आला. तेव्हा, त्यातले संजय दत्तचे "बल्लू" हे गुंड असणारे पात्र सोहम स्वत:ला समजू लागला होता. आणि अर्थातच, सोहमचा भाऊ म्हणजे

जॅकी श्रॉफ उर्फ "इन्स्पेक्टर राम".

कोणी चांगले वागण्यासाठी प्रेरीत करू लागले, की याला असह्य वाटू लागायचे. कोणी चांगले वाग असे म्हणाले की "आपण वाईट आहोत" ही भावना अजूनच प्रबळ व्हायची. याच्यातला "बल्लू" जागा व्हायचा. आणि सोहम गाणे म्हणू लागायचा "नायक नाही, खलनायक हू मै. जुलमी बडा, दुखदायक हू मै.....मै भी शराफत से जीता मगर, मुझको शरीफो से लगता था डर. जो चीज मांगी थी वो ना मिली, करता मै और क्या? बस छीन ली..... बस छीन ली.... बस छीन ली......"

कदाचित, गाण्यातल्या या शब्दांचा, आणि गायकाच्या आवाजातल्या करूणपणाचा, सोहमवर लहानपणीच पगडा पडला असावा. कदाचित, "मी मागूनही तुम्ही पैसे देणार नाहीत हे मला माहिती आहे. म्हणूनच मी पैसे चोरतो" असे त्याचे म्हणणे असावे. "त्यातले, "बस छीन ली" हे अतिशय दु:खदपणे म्हणलेले वाक्य म्हणजे, सोहमचे नेहमीचे आवडणारे वाक्य झाले होते. पण, आपण चुकीचे वागतो ही जाणीव त्याला होतीच की.

सोहम सुद्धा कमी नव्हता. नाणी तर मातीच्या गल्ल्यातून बाहेर काढणे अवघड होते. म्हणून हा आईची हेअर पिन घेऊन, हळूच नोटा बाहेर काढू लागला. पाच रुपयांवरून, आता याची चोरी १० रुपयांवर आली होती.

अचानक एके दिवशी भाऊ तावातावाने घरी आला आणि म्हणाला "आई, दोन महिने दादा शाळेत नाही गेला." तुला बाईंनी शाळेत बोलावलंय." पाचवीत ५ दिवस, सहावीत १ महिना, सातवीत २ महिने. असे मोठे होता होता, त्याचे शाळेला दांडी मारण्याचे दिवस सुद्धा वाढू लागले होते.

"भावाने आईला आपले पराक्रम सांगितले आहेत" हे ऐकून सोहमच्या पायाखालची वाळूच सरकली. म्हणजे, या वेळेसही पकडला गेला होता सोहम.

अगदी अंगावर वळ उठेपर्यंत मार पडला.

दुसऱ्या दिवशी आई शाळेत आली. बाईंच्या समोर खूप रडली. म्हणाली "अहो बघा ना, हा बिल्कूलच ऐकत नाही". आम्हालाही माहिती नव्हते की हा शाळेत येत नाही. हा घरातून तर शाळेचे कपडे घालून निघतो. पण, शाळेत कसा काय पोचत नाही, देवच जाणे? याला काय होते शाळेत जायला? माहिती नाही".

आता आईने, बाईंशी बोलून नवीनच आयडिया काढली. आईने सोहमला एक डायरी दिली आणि म्हणाली "आता रोज या डायरीवर बाईंची सही घेऊन यायची." या वरून समजणार होते की, सोहम शाळेत

गेला होता की नाही.

सोहमची शाळा पुन्हा सुरु झाली. रोज डायरीवर सही आणायला लागत होती.

त्या काळात, टी.व्ही वर कुटुंब नियोजनाची जाहिरात सारखी दाखवली जायची. त्या जहिरातीमध्ये एक माणूस, एका बाटलीत एक टमाटर टाकतो आणि झाकण बंद करतो. तो टमाटर त्या बाटलीत व्यवस्थित बसतो. मग तो माणूस, त्याच बाटलीत अजून एक टमाटर टाकतो, आणि पुन्हा झाकण बंद करतो. या वेळी, दोन्ही टमाटर त्या बाटलीत दाटीवाटीने बसतात. तो माणूस, पुन्हा अजून एक टमाटर त्या बाटलीत टाकतो, आणि झाकण बंद करण्याचा प्रयत्न करतो. या वेळेस तीनही टमाटर फुटून जातात. आणि पुढे वाक्य दाखवले जाते "एक या दो बस".

ही जाहिरात पाहून सोहमला नवीन आयडिया मिळाली. त्याने पुन्हा ठरवले "एका महिन्यात आता जास्त दिवस दांडी मारायची नाही" दोन किंवा तीन दिवस फक्त".

कुटुंब नियोजनाच्या वाक्याचा उपयोग त्याने स्वत:साठी करून घेतला होता. "दो या तीन बस". आणि अर्थातच, "दो या तीन बस" हे वाक्य त्याचे आवडते वाक्य झाले होते.

आता सोहम १० दिवस शाळेत जायचा आणि दोन दिवस दांडी मारायचा.

आता या दोन दिवसात बाईंची सही तर मिळणार नव्हती. मग हा घरी सांगू लागला "आज बाईच शाळेत आल्या नव्हत्या." दुसऱ्या दिवशी बाबांच्या नावाने चिठ्ठी तयार करू लागला की "काल आजारी असल्यामुळे सोहम शाळेत येऊ शकला नाही".

त्याचे काम भागू लागले.

अधे मध्ये हा, बाईंच्या नावाने चिठ्ठी लिहून घरी दाखवू लागला की "तुमचा मुलगा फार हुषार आहे, व्यवस्थित अभ्यास करतो. चांगले गुणसुद्धा मिळवतो."

घरचेही खुष राहू लागले. पण, हा काहीतरी जादू करतो, आणि मुलांना कसेही पटवून आपल्या बरोबर फिरायला नेतो असे वाटून, मुले त्याच्याबरोबर बोलेनाशी झाली. हा पुन्हा एकटा पडला.

सोहमची सातवी संपली. पुन्हा तो अनपेक्षितरीत्या आठवीत पोचला. सातवी ब मधून आता सोहम आठवी क मध्ये गेला होता. दर दोन वर्षाला एक तुकडी खाली खाली तो सरकत होता.

## ११. इयत्ता आठवी, नववी, सोहमचे घरून पळून जाणे, बालाजीची आयुष्यातली एन्ट्री, शनी महाराजांचे प्रथमच आयुष्यात आगमन, पहिला प्रेमभंग

आता त्याने ठरवले "आपण दांडी नाही मारायची. थोडे व्यवस्थित वागू. अभ्यास करू, चांगले मार्क्स मिळवू. घरच्यांना खुष करू. आई-बाबांनी खूप कष्ट केले आहेत". तर असे अधून मधून त्याला मातृ-पितृ प्रेमाचे झटके येवू लागले होते.

आठवीत नवीन विषय आला होता "संस्कृत".

इंग्रजी सारखाच, सोहमला संस्कृत हा सुद्धा विषय सोपा जाऊ लागला. नेहमी वर्गात पहिला नंबर असायचा त्याचा संस्कृत मध्ये.

आठवीत दुपारी शाळा असायची. आता राजू मामा सोहमला व्यायाम करायला शिकवू लागले होते. सकाळी उठून धावायला जायचे, जोर बैठका मारायच्या, दोरीवरच्या उड्या मारायच्या, असे व्यायाम तो करू लागला होता. दोरीवरच्या उड्या मारायला त्याला खूप आवडायचे. त्याचे रेकॉर्ड झाले होते, एका मिनिटात तो १५८ दोरीवरच्या उड्या मारू शकत होता.

व्यायाम मात्र हा मन लावून करायचा. त्यामागे एक कारण होते. एकदा त्याची एक दूरची बहीण त्यांच्या घरी आली होती. ती त्याला म्हणाली "तू हसलास की सगळे पळूनच जात असतील".

सोहम म्हणजे, दिसायला अगदी साधारण होता. आधीच बटाट्यासारखे डोळे. त्यात नेहमी मार खाऊन, रडून रडून डोळे नेहमी सुजलेलेच असायचे. तसेच याचे दात सुद्धा पुढे होते. उन्हात खेळून रंग सुद्धा काळा झाला होता. "तारे जमीन पर" या सिनेमातला "दर्शील सफारी" जर खूप काळा असता, त्याचे डोळे मोठे आणि सुजलेले असते, तर अगदी सोहमसारखा दिसला असता.

याला लहानपणापासून न्यूनगंडच झाला होता. भाऊ गोरा पान होता, सोहम काळाकुट्ट पडला होता. भावाचे नाक, कान डोळे, कसे आखीव रेखीव होते. तर, सोहमचे नाक, कान डोळे जरा विचित्रच होते. त्याकाळी सोहम, अगदी परग्रहावरून आलेल्या प्राण्यासारखा दिसायचा. हा विचार करायचा, "आपण फार वाईट दिसतो, व्यायाम केला तर शरीर सुधारेल आणि जरा बरे दिसूत आपण. म्हणून हा व्यायाम करू लागला.

या सवयीमुळे, हळू हळू अंग मजबूत होऊ लागले. उंची सुद्धा वाढू लागली.

पण, आता ही दातांमाधली फट कशी बुझवायाची? तर दातांमधली फट बुझवण्यासाठी, हा त्या दातांमधल्या फटीमध्ये फेविकॉल, फेवी-क्विक वगैरे गोष्टी टाकू लागला. पण दात काही चिटकतच नव्हते. मग याने एक मजबूत पण पात्तळ दोरा घेतला आणि त्या दोऱ्याने दात आवळू लागला. काही दिवस असेच चालू होते. हळू हळू दात हलू लागले आणि शेवटी टेकले एकमेकांना. याने नायलॉनच्या दोऱ्याने दात बांधून ठेवले. आणि शेवटी दातांमधली फट बुझवण्यात यश मिळवलेच. अश्याप्रकारे सोहम, बिना खर्चाचा दातांचा डॉक्टर झाला होता.

हा जेव्हा सकाळी पळायला जायचा, तेव्हा याला रस्त्यात अनेक बागा दिसायच्या. बागेतल्या झाडांना खूप फुले असायची. त्याने विचार केला "आई रोज पूजा करते, आईला फुले रोजच लागतात. मग आपण ही फुले तोडून आईला दिली तर?" आई खूप खुष होइल."

एके दिवशी याने थोडी फुले तोडली आणि आईला दिली. आई खरेच खुष झाली.

आता याचा सकाळचा कार्यक्रम बदलला होता. रोज शेजारच्या बागेतली फुले तोडायची आणि आईला द्यायची. झेंडू, गुलाब, चाफा, मोगरा अशी फुले हा शेजारच्या बागांमधून चोरू लागला. कोणी कधीही सोहमला हटकले नाही. त्याची हिंमत वाढत गेली. हळू हळू चोरलेल्या फुलांची संख्या सुद्धा वाढू लागली.

तर, असे करत करत एकदा याची नजर शेजारच्या चर्चवर पडली. तिकडे खूप गुलाब असायचे. हा रोजच चर्चपाशी जाऊन गुलाब तोडू लागला. एकदा त्याला तिकडच्या माणसाने पकडले आणि कोंडून ठेवले, घरचा पत्ता विचारला. याने खोटाच पत्ता दिला. तो माणूस पत्ता शोधून शोधून थकला आणि परत आला. सोहमला खूप दरडावले, तेव्हा कुठे याने खरा पत्ता दिला. घरी समजले तेव्हा आईला वाटले "अरे देवा, आत्तापर्यंत हा घरात चोरी करत होता. पण, आता याची मजल चक्क देवाच्याच चर्चवर पडली वाटत. याने देवाला सुद्धा सोडले नाही. पुढे जाऊन हा मोठा चोर होतो की काय?"

शेवटी बाबा आले, बाबांनी सोहमला सोडवले. बाबा हिरोच वाटले त्या दिवशी.

"मुलगा हातचा वाया चालला आहे" हे दिसत होते आईला. आईला वाटले, "याच्यावर "कोणीतरी करणी केली असेल, याला दृष्ट लागली असेल" असे समजून, देवाला जाण्यापासून, गंडे दोरे, तावीज, चमत्कारी

बाबा, तांत्रिक-मांत्रिक असे सगळे प्रकार झाले. पण याच्यात काहीच पडला नव्हता इतक्या वर्षात. दर्ग्यातल्या बाबांचे बोलणे, हा अगदी त्यांना देव समजून ऐकायचा. पण, फक्त ऐकायचाच. वागण्यात काहीच फरक पडत नव्हता.

आईने, सोहम पास होण्यासाठी सोळा-सोमवारचे व्रत सुरु केले. साधारणपणे हे व्रत चार महिन्यात संपते. पण आईने, खास सोहमसाठी हे व्रत वर्षभर चालू ठेवले. म्हणजे एका वर्षात तीन वेळा केले. या व्रतामुळे महादेवाला सुद्धा टेंशन आले असेल. "आता याला पास कसे करायचे?" असा विचार केला असेल महादेवाने.

दरम्यान याच्या आईला वाटू लागले. "अभ्यासात काही याचा उजेड दिसत नाही. पण, व्यायाम चांगला करतो. याला पोलीस बनवूया". मग याला जवळच्या पोलीस ग्राउंडवर शिकायला पाठवले. तिकडचे सर ओळखीचेच होते. आता हा संध्याकाळी ग्राउंडवर जाऊ लागला. हा नुसता ग्राउंडवर पळतच राहायचा. कौशल्य काहीही नव्हते.

त्या काळीच सरकारने काही परीक्षा काढल्या होत्या. जी मुले या शारीरिक परीक्षांमध्ये पास व्हायची, त्यांना पोलीस होण्यासाठी पोलिसी शाळेत घातले जायचे. सोहम सुद्धा गेला परीक्षेसाठी. पोलीस लाईन मधल्या सगळया मुलांनी याला मदत केली. पण हा नापासच झाला.

दरम्यान, सोहमच्या दोन्ही काकांने त्यांच्या मुलांची मुंज ठरवली. दोघांने एकत्रच कार्यक्रम ठरवला आणि सोहमच्या वडिलांना विचारलेसुद्धा नाही. तसा, या सगळया मुलांमध्ये सोहम सगळयात मोठ्ठा. साधारणपणे आठवे वर्ष मुंजीसाठी सगळयात योग्य समजले जाते. पण, सोहम आता जवळ-जवळ १४ वर्षाचा झाला होता. तरी याची मुंज झाली नव्हती. त्यातच, सोहमच्या बाबांना त्यांच्या भावांने एकदाही न विचारले नाही. बाबा एकदम दु:खी झाले. त्यांना वाटले "एकदा तरी विचारायला हवे होते भावांने" मी काय पैसे द्यायला नाही म्हणालो असतो का?"

असो, आठवीत सोहमने भरपूर अभ्यास केला. परीक्षा संपली. सुट्ट्या लागल्या. बाबांनी ठरवले, आपले कुलदैवत आहे "तिरुपती बालाजी". इतक्या आयुष्यात आपण एकदाही तिरुपतीला गेलो नाहीत. बहुदा त्यामुळेच सोहम असा वागत असेल. मग बाबा सह-कुटुंब तिरुपतीची वारी करून आले.

काही दिवसांने परीक्षेचा निकाल लागला. सोहम आता ८वी  मधून ९ वी मध्ये गेला. म्हणजे तिरुपतीची वारी सफल झाली होती तर. शिक्षक स्वत: हैराण होते "हा इतका वाया गेलेला असूनही पास कसा

काय होतो दरवर्षी?" बहुतेक कॉपी करत असेल." झाले, परीक्षेत, खास सोहमसाठी वर्गात दोन दोन पर्यवेक्षक ठेवले जाऊ लागले. पण, कॉपी करत नसल्यामुळे सोहम पकडला गेलाच नाही.

सगळ्यांना वाटले, यावेळेस हा सुधारला असेल. पण नाही, आता सोहम वेगळे पराक्रम करणार होता.

शाळेच्या सुरुवातीलाच, वर्गात इंग्रजीच्या तासाला गोष्टीचे पुस्तक वाचताना पकडला गेला.

भावाला त्याच्या वर्गातला एक मुलगा फार त्रास द्यायचा, सारखा मारायचा. सोहमने त्या मुलाला दोन-तीन वेळा समजावले. पण, तो काही ऐकतच नव्हता. सोहम सुद्धा आता तरुण होऊ लागला होता. अंगात जोश होता.

सोहमने त्या मुलाला अशी काही कानाखाली लगावली, की त्याचा कानच फुटला. तो जवळचाच राहणारा होता. त्याने सोहमला मारायला तीन-चार मुले पाठवली. आता सोहम ९वीत होता तर ती सगळी मुले ६वीत. सोहमसमोर ती काय टिकणार होती? त्या सगळ्यांना सुद्धा याने मारून परत पाठवले. त्यांने सोहमला मारायला अजून एक मुलगा पाठवला. तो फारच बुटका होता. सोहमची कॉलर पकडण्यासाठी त्याला उडी मारायला लागत होती. सोहम शांतच राहिला. विचार केला "कशाला विषय वाढवायचा?" एवढी मारामारी झाल्यावर त्याला शहाणपण सुचले होते.

पण, तो मुलगा आईवरून शिव्या द्यायला लागला. सोहमला सुद्धा मित्रांने पेटवून दिले. "सोहम, तुला आईवरून शिवी दिली तरी तू शांत कसा?" मी तर खूप धुतले असते त्याला". सोहमचे शहाणपण पुन्हा हारवले. सोहमने त्या मुलाला इतके मारले, की त्याचे दोन्ही बूट, मोजे सुद्धा हरवून गेले.

तेवढ्यात शाळा भरली आणि सगळे वर्गात गेले. वर्गात, बाईंनी सोहमला पुढे बोलावून शिक्षा केली. पण आता हा कोडगा झाला होता. वर्गात शिक्षा करा किंवा घरी शिक्षा करा, याला काहीही फरक पडत नव्हता.

आता, मधली सुट्टी सुरु झाली. ९ वी फ तुकडीतला, शाळेचा कबड्डीचा उत्कृष्ठ खेळाडू सोन्या, त्याच्या टोळक्यासोबत सोहमकडे आला. सोन्या एक तर फ तुकडीतला असल्यामुळे सोहमला आधीच खूप भीती वाटली. त्यातही सोन्या जवळच वाकडेवाडीत रहात होता. महत्वाचे म्हणजे, तो शाळेच्या कबड्डीच्या टीमचा कप्तान होता. सोहमने ज्या चार मुलांना मारले होते, त्यातला एक या सोन्याचा भाऊ होता.

सोहम खूप घाबरला. त्याने सोन्याला सगळे समजावून सांगितले. सोन्याला सुद्धा समजले असावे, आणि सोहम वाचला.

सोहमला वाटले "आता हा विषय संपला". पण नाही, सकाळी ज्याला याने मारले, त्याने अजून दोन-तीन छोटी मुले पाठवली सोहमला मारायला. ती सुद्धा शिवीगाळ करू लागली. सोहम त्यांनाही मारणारच होता. पण तेवढ्यात सोन्याचा एक साथीदार आला आणि म्हणाला "अरे मारामारी नका करू. याने सगळे सांगितले आहे सोन्याला".

आता खरेच हा विषय संपला होता. पण बाईंना कळालेच होते सोहमचे पराक्रम.

आता, नववी मध्ये थोडे अवघड विषय सुरु झाले. सोहमला मिळणारे मार्क्स कमी होऊ लागले. त्यातल्या त्यात गणित म्हणजे, फारच भयानक विषय वाटू लागला.

सोहमला पुन्हा "इंग्रजी" आणि "गणिताचा" क्लास लावण्यात आला. दरम्यान त्याने शाळेतच क्रिकेट खेळणे सुरु केले होते.

आता ही क्लासची वेळ आणि क्रिकेट खेळण्याची वेळ एकच होती. काही दिवस सोहम क्लासला गेला. पण, शेवटी क्रिकेटच जिंकले. आता सोहम शाळेत जाऊ लागला होता. पण क्लास बुडवू लागला. एवढे पैसे भरून हा क्लासला जातच नव्हता. हे सुद्धा घरी २ महिन्यांने कळाले. पुन्हा मार पडला. शेवटी क्लास बंद झाला.

शाळेत नियमितपणे जाण्याचे कारण म्हणजे, सोहम आता १४-१५ वर्षांचा झाला होता. नुकतेच त्याने तारुण्यात पाउल ठेवले होते. वर्गातली बॉब-कट केलेली अश्विनी त्याला आवडत होती. असेच एकदा, भर वर्गात आणि तेही तास चालू असताना, हा पठ्ठ्या दुसऱ्या बेंचवरून मागे वळून वळून अश्विनीकडे पहात बसला होता. तिने सुद्धा याला पाहिलेच होते, तिच्याकडे असे वेड्यासारखे पाहताना. जेव्हा ती याला तोंड वाकडे करून "बावळट" असे म्हणाली, तेव्हापासूनच याने मागे वळून तिच्याकडे पहाणे बंद केले.

आतापर्यंत सोहमची कीर्ती सगळीकडे पसरली होती. जो पण आई-बाबांना भेटायचा, तो म्हणायचा "कोणत्याही पेपरवर लिहून घ्या पण तुमचा मुलगा काही दहावी सुटत नाही". हे ऐकले, की सोहमचा मार ठरलाच होता. ओळखीचे लोक दिसले, की ते हमखास सोहमचा विषय काढायचे आणि आई-बाबांना मान खाली घालावी लागायची. आणि, घरी आले की सोहमला मार देणे ठरलेलेच असायचे. मारामुळे सोहमला

आता काही फरक पडत नव्हता.

दरम्यान चाचणी परीक्षा झाली. त्याला गणित काही जमतच नव्हते. याने पुढच्या मुलाचे पाहून एक गणित सोडवले. पण, नेमके त्याचे उत्तर सुद्धा चुकीचेच होते. आता, चुकीचे गणित याने जसेच्या तसे कॉपी केले होते. अर्थातच, हे गोडबोले सरांना समजले. आता, गोडबोले सर म्हणजे शाळेतील पर्यवेक्षक. ते सुद्धा फार कडक स्वभावाचे होते. त्यांने आधी सोहमला शिक्षा केली आणि पालकांना आणायला सांगितले.

आई पुन्हा शाळेत आली. सरांने सोहमचे सगsssळे, म्हणजे, मारामारीचे, तासाला गोष्टीचे पुस्तक वाचण्याचे, कॉपीचे पराक्रम आईला सांगितले. आई पुन्हा रडली सरांसमोर. संध्याकाळी पुन्हा मार पडला.

सर म्हणाले, "तुम्ही कशाला काळजी करता?, तुम्ही कशासाठी रडता? याला जर असे करण्याचे कळत असेल. तर, सुधरायचे असेल तर तोच सुधारेल."

गोडबोले सरांने, मुलांना गणित सोपे जावे म्हणून पाढे पाठ करण्याची एक नवीन पद्धत तयार केली होती. ती म्हणजे १ तिने ३, बे त्रिक सहा, ३ त्रिक नऊ, चार त्रिक बारा. असे १ ते ३० पर्यंतचे पाढे पाठच करून ठेवायचे. या पद्धतीमुळे, कोणताही पाढा चटकन तोंडी येणार होता. आणि परीक्षेत वेळ वाचणार होता.

सोहमलासुद्धा माहिती होतेच "आपणच सगळयात मोठ्ठे बकरे असणार आहोत. सर नक्कीच आपल्याला पाढे म्हणायला सांगतील" दुसऱ्या दिवशी सरांने सोहमलाच पाढा म्हणायला सांगितले. काय आश्चर्य? सोहमने ३ चा पाढा बिनचूक म्हणला. त्यानेही नवीन आयडिया काढली होती पाढे पाठ करण्याची. ती म्हणजे, तीनचा पाढा असेल तर, जवळचा सोप्पा पाढा आठवायचा आणि त्यामध्ये ३ मिळवायचे.

म्हणजे जर, २६ त्रिक किती? असे विचारले तर, आधी २५ त्रिक ७५ हा सोप्पा पाढा आठवायचा आणि ३ मिळवायचे. म्हणजे, २५ त्रिक ७५ अधिक ३ = ७८. तर असे ३ मिळवून, त्याने पूर्ण पाढा म्हणला आणि गोडबोले सरांची थाप मिळवली पाठीवर. असेच एकदा वर्गात, सरांने १०० ते १ असे उलटे अंक म्हणून दाखवण्याची स्पर्धा लावली. फक्त सोहमच म्हणू शकला, बाकी कोणीही नाही. आजही सोहम, १०० ते १ हे अंक फक्त ३० सेकंदात म्हणू शकतो.

हे पाढे ठीक होते. पण, बीजगणित आणि भूमिती कधीच जमले नाही. गणितात याने नवीनच कसोट्यांचा शोध लावला होता. को-को-बा, बा-बा-को, को-बा-बा वगैरे वगैरे. अर्थातच, काहीच समजत नसल्यामुळे, फेका मारण्याशिवाय पर्यायच नव्हता. sin, cos, tan चा, पुढच्या आयुष्यात काय उपयोग होऊ

शकतो? हे तर समजतच नव्हते.

आता सोहमसुद्धा या रोजच्या कटकटीला कंटाळला होता. "काय रोजच मार खायचा? नाही जमत मला अभ्यास करायला". नाही जमत मला गणित. नाही आवडत मला शाळेत जायला". पण, यातून सुटणार कसे?"

"आपण पळूनच गेलो घरातून तर?" हळू हळू, घरातून पळून जाण्याची त्याची कल्पना मनात वाढू लागली होती. थोडा कुठे अपमान झाला की वाटायचे "घरातून पळून जावे." जरा कोणी अभ्यास कर म्हणाले की वाटायचे "घरातून पळून जायचे."

सोहमने आधी त्याची ही कल्पना मला सांगितली. मी द्विधा मन:स्थितीत पडलो. माझे काही उत्तर येत नाही हे पाहून, त्याने सोहम पार्ट टूला त्याची कल्पना सांगितली. पण, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सोहम पार्ट टू म्हणजे अगदी सोहमच्या विरुद्ध असणारा, अगदी सोहमच्या भावासारखा. त्याने सोहमची कल्पना अगदी धुळीसारखी उडवून लावली.

अशातच सोहमला एक नवीन सोबती भेटला, त्याचे नाव अमित होते. अमितसुद्धा ९वीतच होता. हा अमित म्हणजे तोच मुलगा, ज्याने सोहम ७वीत असताना घरी चिठ्ठी टाकली होती "सोहम शाळेत येत नाही, बाईंना येऊन भेटणे." अमितलाही गणित अवघड जात होते. तो सुद्धा पळून जाण्याच्या तयारीत होता. तो सुद्धा याच्यासारखाच समदु:खी. सोहमने त्याचा प्लॅन अमितला सांगितला.

मग दोघे प्लॅन करू लागले, "पळून कुठे जायचे? करायचे काय? राहायचे कुठे? खायचे काय?" अमित म्हणाला "आपण कोल्हापूरला जाऊ" मी ऐकलय, तिथे छत्रपती संभाजी महाराजांचे संस्थान आहे. तिथे आपल्यासारख्या मुलांना हॉटेल मध्ये काम मिळते. रहायची सोय पण होइल आणि खायला पण मिळेल." (असे कोणतेही संस्थान नाही, पळून गेलेल्या मुलांसाठी तर नाहीच नाही).

यांचा प्लॅन फिक्स झाला होता. यांनी ठरवले "आता सहामाही परीक्षा होईल. बघू पास होतो का नापास. आणि, नापास झालो तर पळून जाऊ."

मग सहामाही परीक्षा झाल्या. अपेक्षेप्रमाणे सोहमला गणिताचा पेपर फार अवघड गेला.

जेव्हा निकाल लागला, त्याला गणितात, १५० पैकी फक्त ३० गुण मिळाले होते. म्हणजे दिवाळीच्या परीक्षेत सोहम नापास झाला होता. इतकी वर्ष तो कधीच नापास झाला नव्हता. पण यावेळी

पहिल्यांदाच नापास झाला.

घरी तो गणिताचा पेपर दाखवावा लागणार होता. त्याने नवीनच शक्कल लढवली. याने काय केले? कुठून तरी कोऱ्या उत्तरपत्रिका मिळवल्या. त्यावर गणिते सोडवली. त्याचा त्यानेच, लाल रंगाच्या पेनने तो पेपर तपासला. त्याचे त्यालाच गुण दिले. १५० पैकी, त्याने स्वत:ला १३० गुण दिले. तो पेपर घरी दाखवला. घरचे एकदम खुष.

आता प्रगती पुस्तक मिळाले. त्यावर सुद्धा ३० चे १३० केले. म्हणजे, ३० च्या अगोदर, फक्त १ हा आकडा टाकला. आणि, खालचा लाल शेरा मिटवून टाकला. घरी थोडा संशय आला होता. मामाने विचारलेच "ही खाडाखोड कसली?" तर हा म्हणाला "मला काय माहिती? बाईंच्याच हातून झाली असेल". मी तुम्हाला पेपर दाखवला होताच की. त्याच्यावर काही खाडाखोड होती का?

त्याची थाप पचली. मग त्याने प्रगती पुस्तकावर बाबांची सही घेतली. १ चा आकडा पुन्हा मिटवला. तसेच परत, खाली लाल शेरासुद्धा मारला. आता याने, प्रगती पुस्तक होते तसे केले आणि शाळेत देवून टाकले.

घरचे विचार करू लागले, "हा कधीपासून एवढा हुषार झाला?" हुषार हुषार मुलांनासुद्धा, ९वी मध्ये गणितात १५० पैकी १३० गुण मिळणे फार अवघड वाटते. सोहम तर साधारण विद्यार्थी होता.

आता सोहमला, त्याने केलेल्या चुकीच्या गोष्टी लपवायची नवीन आयडिया मिळाली होती. मग काय, प्रगतीपुस्तकावरचे मार्क्स वाढवणे. दांडी मारून, प्रगती पुस्तकावरचे उपस्थितीचे दिवस बदलणे. बाबांची सही झाली, की पुन्हा प्रगती पुस्तक होते तसे करून शाळेत परत देणे. असे नवीन उद्योग सुरु झाले.

पण हे सुद्धा उघडकीला आले. त्याचे असे झाले की, हा असले उद्योग गच्चीत जाऊन करायचा. एकदा वडिलांने याला गच्चीवर जाताना पाहिले. याचे मस्त पैकी खाडाखोड करून नवीन मार्क्स लिहिणे चालू होते. आणि, वडील शेजारी उभे राहून हे पहात होते. हा फार मग्न झाला होता पराक्रम करण्यात. त्याला कळलेसुद्धा नाही, की कधी वडील शेजारी येऊन थांबले होते.

पुन्हा मरेस्तोवर मार खाल्ला. खूप अपमान झाला शाळेत, घरी. आता सोहमला खरेच पळून जावे वाटू लागले. अशातच "अमित" पुन्हा भेटला. अमित पास झाला होता गणितात. पण, त्याला फक्त ५२ गुण

मिळाले होते. सोहम त्याला म्हणाला, "चल पळून जाऊ". तर तो म्हणाला "अरे मी गेलो होतो पळून. पण रस्त्यातच, त्याच रेल्वेमध्ये, नेमका मामा होता. मामाने मला पकडले आणि घरी घेऊन आला."

अशा तऱ्हेने सोहमचा पार्टनर कमी झाला होता. म्हणजे, सोहम पुन्हा एकटाच होता.

काही दिवसांने "राजू मामा" म्हणाला "उद्या शाळेत नको जाऊस, मी तुझा गणिताचा अभ्यास घेणार आहे".

सोहमने विचार केला "अरे बाप रे, मामा अभ्यास घेणार. मला तर काहीच येत नाही." म्हणजे खूप मार पडणार. त्या पेक्षा पळून जाऊ."

सोहमने ठरवले, उद्या आईला म्हणायचे "आई मला शाळेत जाऊ दे"

१. आई म्हणेल "जा."

२. आई म्हणेल "नको जाऊस, मामा अभ्यास घेणार आहे."

सोहमने दोन्हीही शक्यता तपासल्या, आणि ठरवले.

"जर आई शाळेत जा म्हणाली, तर वाचलो". आणि जर आई नको जाऊ म्हणाली, तर पळून जायचे."

त्याने तयारी करून ठेवली. गल्ल्यातून ५०-६० रुपये काढले आणि झोपी गेला.

त्या रात्री त्याला झोपच लागत नव्हती. दिवाणवर आई, भाऊ आणि सोहम झोपायचे. त्याने आईच्या मऊ-शार, ऊबदार साडीवर हात टाकला. झोपायचा प्रयत्न करू लागला. पण, अजूनही झोप येतच नव्हती. त्याला खूप रडू येऊ लागले. मनातच म्हणाला "आई, आज ही तुझ्याजवळ झोपण्याची शेवटची रात्र. उद्यापासून मी कुठे असेल? तुला काय वाटेल? तुझे काय होईल? माझे काय होईल? ते माहिती नाही." आज शेवटचे तुझ्याजवळ झोपून घेतो. आईला झोप लागलेली पाहून गुपचूप सोहम आई-बाबांच्या पाया पडला. "हे शेवटचे पाया पडणे आहे" असे समजून भावना उचंबळून आल्या होत्या.

रडून रडून देवाला सगळे सांगावे वाटत होते. "देवा, मला अभ्यास नाही रे जमत करायला. मी वाईट नाही. पण, काय होते काय माहिती? शाळेतच जावेसेच वाटत नाही. गेलो तर खेळावे वाटते. गणित नाही रे जमत मला. सगळीकडे अपमान होतो रे माझा. सगळे तुच्छतेने पहातात माझ्याकडे. कुठेतरी दूर निघून

जावेसे वाटते. उद्या मी घरातून निघून जाणार आहे. मला माहिती आहे, आई मारते पण, तेवढेच प्रेम करते माझ्यावर. पण, शिक्षण घेऊन माझे काही चांगले होईल असे वाटत नाही."

मनावर दगड ठेऊन सोहम आईशेजारी जाऊन पडला. उद्या आपलं कारट काय करणार आहे? याची सुतरामही कल्पना नव्हती घरी.

पहिल्यांदाच, आई म्हणजे काय असते? हे त्याला समजले असावे. आईच्या ऊबदार कुशीत झोपण्याची त्याला पुन्हा संधी मिळणार नव्हती. रात्री कधी तरी मायेच्या लोकांमध्ये त्याला झोप लागली.

दुसऱ्या दिवशी सकाळी आई शेंगदाणे भाजत होती. सोहम आईला म्हणाला "आई मला शाळेत जाऊ दे". आई म्हणाली "नको जाऊस, मामा अभ्यास घेणार आहे.".

सोहम घाबरला. ठरवले "आता पळून जायचेच." पण, कुठे जायचे? काय करायचे पळून गेल्यावर?" आधी घरातून निघू, जी पहिली रेल्वे मिळेल तिकडे जाऊ." नको, मुंबईला जाऊ". तिथे काय करायचे? ते जाताना ठरवू".

त्याने विचार केला "आपण आत्तापर्यंत घरच्यांना खूप त्रास दिला आहे". त्यांचे अजून नुकसान नको करायला.".

घरातली एक जुनी स्लीपर घातली, जुना शर्ट घातला. घरातून गुपचूप निघाला आणि थेट खडकी रेल्वे स्टेशन गाठले. त्या वेळेस ११ वाजले असतील. मद्रास-मुंबई एक्स्प्रेस आली. सोहम गाडीत चढला आणि त्याचा प्रवास सुरु झाला.

"आता पुढे काय करायचे?". मुंबईला जाऊन आधी चौपाटी शोधायची. तिकडे भरपूर थम्प्स-अप, कोका-कोलाच्या बाटल्या पडल्या असतील. त्या उचलून विकायच्या. काही पैसे मिळवायचे. नंतर हॉटेल मध्ये काम करायचे. खूप पैसे कमवायचे. मग स्वत:चे हॉटेल काढायचे. येणाऱ्या पैश्यातून घरी पैसे पाठवायचे. घरच्यांना खूप मदत करायची." लांबूनच घरी चिठ्ठी पाठवायची "आई, बाबा मी खूप खुष आहे. मी व्यवस्थित आहे. तुम्ही माझी काळजी करू नका. मी दर महिन्याला तुम्हाला पैसे पाठवत जाईल. मला शोधू नका. मी तुमची सगळी स्वप्न पूर्ण करीन."

विचार करता करता, मळवली, कामशेत, लोणावळा, खंडाळा जाऊ लागले. तसे घरची फार आठवण येवू लागली. "आईला काय वाटत असेल? भाऊ काय करत असेल? बाबा, मामा काय म्हणतील?"

फार रडतील का सगळे?." घरी परत जायचे का?"

"नाही, आता आपण मोठ्ठा माणूस बनू. मगच घरी जाऊ" "आता भावनीक होऊन काहीच फायदा नाही" कुछ पाने के लिये कुछ खोना पडता है". असे फिल्मी डायलॉग म्हणून तो स्वत:ला आधार देऊ लागला.

"पुढे कधी खायला मिळेल माहिती नाही?" असे समजून कर्जतला दोन वडापाव खाल्ले. दादरला पोचल्यावर लोकांना विचारले, "चौपाटी कुठे आहे?" लोक म्हणाले "चर्चगेटच्या जवळ आहे". हा चर्चगेटला पोचला. चर्चगेट पासून चालत चालत "गेट वे ऑफ इंडिया" पर्यंत गेला. जवळच एक वस्ती होती, तिथेही जाऊन आला. पण चौपाटी काही दिसत नव्हती.

इकडे घरी सगळे हैराण झाले. शाळेत शोधले, सोहम जिथे जिथे जाऊ शकतो तिथे शोधले. मित्रांकडे विचारले. जुन्या घरी सुद्धा जाऊन आले. पण हा काही सापडतच नव्हता. आई, बाबा, मामा, भाऊ सगळे रडकुंडीला आले.

एव्हाना, सोहम गायब झाल्याची खबर सगळीकडे वाऱ्यासारखी पसरली होती. जो तो विचारत होता "सोहम कुठाय?" पळून गेला वाटत". आम्ही सांगतच होतो "त्याच्यावर लक्ष द्या, केस हाताबाहेर गेली आहे." काही शुभचिंतक लोकसुद्धा सोहमला शोधण्यासाठी फिरू लागले. कमीत कमी १०-१५ लोकांना कामाला लावून सोहम घरातून पळून गेला होता.

जसा जसा दिवस मावळू लागला, तसे सोहम परत भेटण्याच्या आशा अंधुक होऊ लागल्या. सगळे रडवेले झाले. आईने सगळे देव पाण्यात ठेवले. आई म्हणाली "देवा, तू असे आयुष्य का दिलेस आम्हाला? सासरच्यांने हाकलले, माहेरच्यांची काही मदतीची अपेक्षा करू शकत नाही. भरपूर लोकांनी फसवले. मुलगा पण असा दिलास, की नसता दिलास तर परवडले असते असे वाटते. इतके दिवस हा कधीतरी सुधारेल, मोठा होईल, हाताखाली येईल, घराला हातभार लावेल या आशेवर आम्ही जगत होतो. पण, तो मुलगासुद्धा पळून गेला रे. आता सोहम परत येत नाही तोपर्यंत तू सुद्धा पाण्यातच बस. सोहम जर परत आला नाही, तर कधीही तुझे तोंडसुद्धा पाहणार नाही."

सोहमला परत कसे आणायचे? या चिंतेत देवालाही झोप लागली नसेल. आईने तर तोंड न पाहण्याची धमकीच देऊन ठेवली होती.

बाबा सुद्धा आई आणि मामावर चिडले. म्हणू लागले "तुमच्यामुळेच माझा मुलगा पळून गेला. इतके मारायचे असते का मुलाला?". आता सोहम सापडेपर्यंत त्यांचे काहीही खरे नव्हते. शाळेत शिक्षकांना सुद्धा

समजले होते, सोहमच्या मित्रांना सुद्धा समजले. सोहमची प्रसिद्धी एकदम शिगेला पोचली होती. आई-मामा वेड्यासारखे, रिक्षाने फिरून त्याला शोधत होते.

इकडे, मुंबईला सोहमकडचे पैसे संपले. पण त्याने दृढनिश्चय केला "घरी जायचे नाही". पण, आई-बाबा-मामा-भाऊ, सगळे मरून जातील माझ्याविना. त्यांचे कसे होईल? फार रडत असतील सगळे. सोहमला सुद्धा खूप रडू येऊ लागले. सारखी घराची आठवण येत होती. डोळ्यातले पाणी काही थांबत नव्हते.

झाले, त्याचा दृढनिश्चय तुटला होता. त्याने ठरवले "मार खाऊ पण घरी जाऊ". बहुतेक देवाने त्याला भावनिक करून करून, त्याला घरी जायला भाग पाडले होते.

संध्याकाळी ६-७ वाजले असतील. त्याने ठरवले "आलेल्या रस्त्याने परत जायचे." खिशात एकही पैसा शिल्लक नव्हता. भूक लागली होती. कधी एकदाचे घरी पोचतो, असे झाले होते. सारखे रडू येत होते.

सोहमचे रडणे पाहून एक दोन जणांने विचारले "का रे रडतो आहेस? कुठे रहातोस?" "मी घरून पळून आलो आहे" हे सांगायला लाज वाटत होती. लोकांनी पकडून पोलिसात दिले असते तर सगळे अवघड होऊन बसले असते.

सोहमने खोटी कहाणी सांगून दिली. "काका मला घेऊन मुंबईला आला. बाथरूमला जाऊन येतो म्हणाला आणि परत आलाच नाही." लोकांना सोहमवर दया आली. दोन तीन जणांने २०-३० रुपये दिले. पुण्याला कसे जायचे हे सुद्धा सांगितले. चला, पोट भरण्याची सोय तर झाली होती.

इकडे, आई-बाबा-मामा, सगळे शोधतच होते सोहमला.

सोहम घरी निघाला, परत चर्चगेटला पोचला. तिथून दादरला आला. दादरला पुन्हा, पुण्याला जाणारी रेल्वे पकडली आणि पुण्याला निघाला. साधारणपणे, पहाटे ३-४ वाजता सोहम पुन्हा पुण्यात परत आला. आता, पहिली लोकल होती ४.४५ वाजता. तेवढा वेळ त्याने स्टेशन वरच काढला. ४.४५ ची लोकल पकडून खडकीला उतरला आणि गुपचूप घरी आला.

घरी पोचला तर, मामाची रिक्षा खालीच उभी होती. "म्हणजे मामा घरीच होता तर". सोहम गुपचूप वर गेला. घराच्या बाहेर असणारी एक चादर घेऊन गच्चीवर जाऊन झोपला.

सकाळीच, मामा सोहमला शोधायला पुन्हा गच्चीवर आला. काय आश्चर्य? त्याला सोहम दिसला. मामाचा जीव भांड्यात पडला.

सोहमला सगळयांनी विचारले "कुठे होतास काल?

याने दिली थाप मारून "खडकी बाजारात फिरत होतो". मुलगा परत आला म्हणून कोणी गोष्ट फार वाढवली नाही.

मग सोहम शाळेत गेला. तिकडे आधीच हा प्रसिद्ध झाला होताच. याने सुद्धा, सगळयांना गोष्टी वाढवून वाढवून सांगायला सुरुवात केली. आता कोणीही शाळेत याच्यासोबत पंगा घेणारे उरले नव्हते.

या गोष्टीनंतर, सोहममध्ये अचानकच खूप बदल होऊ लागला. पण बदल तात्पुरताच होता. आता सोहमला कोणी मारत नव्हते, कोणी टोचून बोलत नव्हते. याला सुद्धा वाटू लागले "किती चुकीचे वागत होतो आपण?" किती त्रास झाला सगळयांना आपल्यामुळे". खरेच, हे वाईट आहे". आपण चुकीचे वागत होतो". खूप त्रास दिला आपण सगळयांना.". कोणीही असे करू नये". आता आपण खूप अभ्यास करायचा, आई-बाबा-मामाला रडवायचे नाही."

त्याने अभ्यास सुरु केला. पण काहीकेल्या गणित जमतच नव्हते. त्याला भीती वाटत होती की "जर वार्षिक परीक्षेला गणितात नापास झालो, तर वर्षच वाया जाईल.".

सोहम देवासमोर गेला आणि म्हणाला "देवा या वेळेस पास कर." मी नक्कीच सुधरेन".

नववीच्या परीक्षा संपल्या आणि सुट्टी लागली. हा आता जांभळे तोडायला गेला. झाडावर चढला. अर्धे झाड यानेच रिकामे केले होते. अजून जांभळे मिळावीत म्हणून हा अजून वर गेला. एका फांदीवर पोचला, मग तिच्या उपफांदीवर पोचला. जांभळे तोडतच होता की झाड तुटण्याचा आवाज आला. याला वाटले उपफांदी तुटत असेल. म्हणून याने मूळ फांदीवर येण्याचा प्रयत्न केला. पण झाले असे, की मूळफांदीच तुटत होती. आता कोणताच आधार नव्हता. याने विचार केला "जर मी उडी मारली, तर वरून डोक्यात फांदी पडेल आणि आपण काही वाचणार नाहीत. त्यापेक्षा, आपण या फांदिलाच पकडून राहू आणि फांदिबरोबरच खाली पडू. सगळा झटका फांदी सहन करेल." तो फांदिबरोबरच खाली पडला. पानांच्या गुच्छातून बाहेर आला. देवाने वेळेवरच बुद्धी दिली आणि हा वाचला. नाहीतर काही खरे नव्हते.

तोपर्यंत आईपर्यंत ही बातमी पोचलीच होती. पण हा तर तोपर्यंत समोरच आला होता.

ज्यांच्या इच्छा कर्म पूर्ण होतात, त्यांना देव नवीन जन्म देतो किंवा मुक्ती देतो. कदाचित अजूनही,

सोहमच्या काही इच्छा किंवा कर्म शिल्लक असावीत. म्हणूनच देवाने त्याला वाचवले.

असेच दिवस चालले होते. दरम्यान, बाबांना काळजी वाटत होतीच "अजून माझ्या मुलांची मुंज नाही झाली". बाबांना वाटले "कदाचित मुंज न झाल्यामुळेच सोहम असा वागत असेल." बाबांनी ठरवले "आपल्या मुलांची मुंज तिरुपतीला करायची". पुन्हा सगळे तिरुपतीला आले. खूप नशीबवान होते सोहम आणि त्याचा भाऊ, की त्यांची मुंज तिरुपतीला झाली. इथेच, आयुष्यात पहिल्यांदाच बालाजीची एन्ट्री झाली होती.

तसेच, गेली कित्येक वर्ष आईला वाटत होते, "आपले स्वत:चे घर असावे". कसे तरी पैसे जमवून यांने स्वत:चे घर सुद्धा घेतले. तिरुपतीला जाणे भलतेच फळाला आले होते.

असो, तर अश्या प्रकारे सोहमचे नववीचे वर्ष संपले. निकालाचा दिवस जवळ आला. निकाल लागला. आयुष्यात पहिल्यांदाच सोहम निकाल घेताना घाबरला होता.

निकाल साक्षात गोडबोले सरच वाटत होते. सोहमला पुढे बोलावून म्हणाले "या वर्षी चांगला अभ्यास कर आणि पास हो". सोहमला कळून चुकले होते "आपण नापास झालो आहोत". गणितातच झालो असणार". त्याने निकाल हातात घेतला. विचार केला "बघू किती पडले असतील गणितात?" पाहतो तर, ५२ मार्क्स होते १५० पैकी. आता "५२ मार्क्स म्हणजे, गणितात काठावर पास झालोय आपण". मग नापास कशात झालो? बाकी तर कोणताच विषय अवघड नाही जायचा आपल्याला?"

त्याने बाकीचे विषय सुद्धा तपासले "मराठीत १०० पैकी ५५, संस्कृतात १०० पैकी ६०, इतिहास - भूगोलात १५० पैकी १००, इंग्रजीत १०० पैकी ६१. फक्त विज्ञान बाकी होते, "म्हणजे विज्ञानात उडालो वाटत." पण, पाहतो तर काय? विज्ञानात सुद्धा १५० पैकी ९८.

मग याने निकाल पुन्हा एकदा व्यवस्थित तपासला. खाली शेरा होता "पास". (गोडबोले सरांच्या म्हणण्याचा अर्थ होता "या वर्षी, दहावीत व्यवस्थित अभ्यास कर आणि पास हो. बोर्डाची परीक्षा आहे). असेही कदाचित, "याला नापास केले तर हा बाबा पळून जायचा आणि सगळे आपल्यावरच यायचे" अशी भीती नक्कीच सरांना वाटली असावी. सरांच्या दृष्टीने, सोहम अगदी वाया गेलेला असेल. सोहमला शाळेत ठेवून त्यांना शाळेचे नाव खराब करायचे नसेल. म्हणून, "पटकन हा कधी एकदाचा शाळेतून जाईल?" असे झाले असेल सगळयांना.

म्हणजे सोहम, या वर्षी सुद्धा कसातरी पास झालाच होता. अर्थातच, अनपेक्षितरीत्या.

आता सुट्ट्या सुरु झाल्या होत्या. सोहमने देवाला म्हणल्याप्रमाणे सुट्टीतच अभ्यास सुरु केला. आधी इतिहास, भूगोल, नागरिक-शास्त्र, अर्थ-शास्त्र असे विषय निवडले. त्यातील गाळलेल्या जागा, एका वाक्यात उत्तरे, एका शब्दात उत्तरे पाठच करून टाकली. सोहमला झोपेतसुद्धा उत्तरे देता यायला लागली. खूप वेळा उजळणी सुद्धा केली.

त्यानंतर शास्त्र, मराठी आणि इंग्रजी उरकून टाकले.

नंतर गणित घेतले. गणिताचे अ, ब, आणि क गट पूर्ण करून टाकले. ड आणि ई गट काही त्याला जमतच नव्हते. याने दहावीला, गणितात कसे पास व्हायचे? याचे प्लॅनिंग केले. "अ, ब आणि क गटांचे मिळून होतात ९० मार्क्स. आणि, ड आणि ई गटांचे ६० मार्क्स. असे १५० मार्क्स. त्यापैकी अ, ब आणि क गटात, एक सुद्धा मार्क गेला नाही पाहिजे. हे गट त्याने पाठच करून ठेवले. बाकीचे ड आणि ई गटात जेवढे मिळतील तो बोनस" असे ठरवले.

काही दिवसांने शाळा सुरु झाली. सोहम "९ वी" मधून पुन्हा "१० वी" मध्ये पोचला होता. दहावीत सगळे उद्योग बंदच करून टाकले. शाळेत सुद्धा अभ्यास करू लागला. घरचा अभ्यास पूर्ण करू लागला.

सोहमने शाळेच्या सगळया परीक्षा व्यवस्थित दिल्या. आता अभ्यासाच्या सुट्ट्या मिळाल्या होत्या. त्याने पुन्हा दोन-तीन वेळा उजळणी केली.

आता बोर्डाची परीक्षा होती, काही साधीसुधी नव्हे.

शेवटी परीक्षेचा दिवस उजाडला. पहिला पेपर होता मराठीचा. मराठीचा पेपर देऊन हा घरी आला. खाली दोन लहान मुले खेळत होती. एकाने दुसऱ्याच्या पोटाला दोरी बांधली होती आणि ओढत होता. सोहमने फक्त त्या दोरीला हात लावला, तर त्या मुलाने रडायलाच सुरुवात केली. मोठ्याने भोंगा पसरला. रडून रडून सगळयांना सांगू लागला "सोहमने मला मारले". ऐन परीक्षेत सोहमवर खोटा आळ आला होता. त्या मुलाची आई सोहमच्या आईकडे भांडायला आली. त्या दिवशी तुंबळ भांडणे झाली. सोहमने घरी खूप बोलणी सुद्धा खाल्ली.

सोहम आईला म्हणाला "आई मी काहीच नव्हते केले. खरे काय आहे ते लवकरच कळेल तुला". आई

सुद्धा म्हणाली "जर हा आळ खोटा असेल तर त्यांना शिक्षा होइल."

घरी आल्यावर याच्या लक्षात आले की हॉल-तिकीट कुठे तरी हारवले होते. पुढचा पेपर दुसऱ्याच दिवशी होता. याने घरी काहीही सांगितले नाही. रात्रभर याला झोप काही आलीच नाही. याने विचार केला "जर उद्या हॉल-तिकीट नाही सापडले, तर परीक्षा कशी द्यायची?" आपण एक काम करू, आधी परीक्षा केंद्रावर जाऊन पाहू. मिळाले हॉल-तिकीट तर चांगलेच आहे. नाहीतर सरळ आपल्या मुख्याध्यापकांकडे जाऊ. ते करतील आपली काहीतरी व्यवस्था."

दुसऱ्या दिवशी सकाळीच हा परीक्षा केंद्रावर गेला तिथे सगळया शिपायांना विचारले. तर झाले असे होते की, पेपर लिहिताना याने हॉल-तिकीट बेंचच्या मधल्या कप्प्यात ठेवले. नंतर विसरून गेला. वर्ग साफ करताना एका शिपायाला सापडले ते. शिपायाने ऑफिस मध्ये जमा केले. नेमके सोहमला, सकाळी तेच शिपाई मामा भेटले आणि हॉल तिकीट परत मिळाले.

दुसरा पेपर सुद्धा संपला. हा परत घरी आला. याला नवीन बातमी कळाली की, काल ज्या मुलाने याच्यावर खोटा आळ घेतला होता, त्याने पाच रुपयाचे नाणे गिळले. आता दवाखान्यात भरती झाला आहे. देवाने दाखवून दिले, सोहम नेहमीच खोटे नाही बोलायचा. तसा सोहमच्या डोक्यावर, लहानपणापासूनच देवाचा हात होता. साक्षात दुर्गा देवीचा प्रसाद होता तो. म्हणूनच, कदाचित देवी त्याला वाचवत होती.

कोणीही सोहमला मारायला लागले, की त्या व्यक्तीचा हात वरच्या वर पकडला जायचा. एकदा दोनदा आई आणि मामालासुद्धा असेच अनुभव आले होते.

शेवटी एकदा परीक्षा संपली. इतक्या वर्षाचे सगळे मित्र आता दूर होणार होते. कोण कुठे जाईल? माहिती नव्हते. परत कधी भेटतील? माहिती नव्हते. सगळयांनी ठरवले, "आजचा दिवस मजा करायची". सगळे चालत चालत केन हाउसला आले. उसाचा रस पिला. आता निघायची वेळ झाली होती. सगळे एकदम भावनिक झाले. एकमेकांची गळे भेट घेतली. खूप रडले सगळे मिळून. आणि शेवटी निघाले आपापल्या घरी. शाळा सोडताना तसे सगळयांनाच दु:ख होत असते. शेवटच्या दिवशी, सगळे शिक्षक, सगळे मित्र, आत्तापर्यंत केलेली मजा, भांडणे, खेळलेले खेळ, असे सगळेच आठवते.

सुट्टीमध्ये त्याला सगळयांची फार आठवण यायची. त्याला वाचनाचे वेड लागले. असेच कधी तरी

त्याने, पेपर मध्ये एक गोष्ट वाचली. त्याला वाटू लागले "आपण सुद्धा अशी एखादी गोष्ट लिहावी".

तर, त्याने लिहिलेली गोष्ट म्हणजे, "मैत्रीण". गोष्ट पुढीलप्रमाणे आहे.

तशी तिची आणि माझी रोजच भेट व्हायची. ती अगदी माझ्यासारखीच अबोल होती. शक्यतो बोलणे टाळायची. क्रीम रंगाचा पोशाख आणि लाल रंगाची ओढणी, फार छान दिसायची तिच्यावर. ओढणीवर शोभणारी टिकली सुद्धा, तिला फार शोभून दिसायची. तिला चष्मा होता.

ती कितीही उशिरा आली, तरी मी तिची वाट पाहायचो. पण, मला जरा जरी उशीर झाला, तर ती निघून जायची. कारण, मी पुढच्याच स्टेशनला रहायचो. तर ती फार दूरच्या. जायला वेळ लागणार म्हणून ती निघून गेलेली असायची. आमचे जास्त काही बोलणे होत नसत. प्रवास फक्त ५-६ मिनिटांचाच असायचा. मी तिला, भावनिक होताना कधीच पाहिले नव्हते. गेली कित्येक वर्षे, जेव्हा मला सगळे वाळीत टाकायचे, मी जेव्हा दु:खी असायचो, कोणीही माझ्याशी बोलायचे नाही, तेव्हा तीच माझी साथीदार बनायची. माझ्या भावना, बहुतेक तिलाच एकटीला समजायच्या. तिने कधीही मला दूर केले नाही. मी ज्या दिवशी घरातून पळून जाणार होतो, त्या दिवशी मी तिच्या व्यतिरिक्त कोणालाही कल्पना दिली नव्हती.

पण, आज परीक्षेचा शेवटचा दिवस होता. जसे माझे शाळेतले मित्र, मला पुढे भेटतील की नाही? हे माहिती नाही. तसेच, तिच्या सुद्धा विरहाचे दु:ख होणार होते मला. मी पुढे कोणत्या कॉलेजमध्ये जाईल? हे माहिती नाही. पुढे तिचे काय होईल? हे ही माहिती नव्हते. पुन्हा रेल्वेनेच, आणि तिच्यावेळेसच प्रवास होइल का? हे ही माहिती नाही. ती काही माझ्या शाळेत नव्हती. पण दोघांची निघायची आणि शिवाजीनगरला पोचायची वेळ एकच होती. आणि जिव्हाळा पण फार झाला होता.

शेवटचा पेपर संपला. मित्रांबरोबरची शेवटची भेट सुद्धा संपली. आणि आता मला, तिला भेटण्याचे वेध लागले होते. शेवटच्या दिवशी चुकामुक नको म्हणून, मी अगदी अर्धा तास अगोदरच स्टेशनवर पोचलो. पण, दु:खात बुडाल्यामुळे, मी विसरूनच गेलो होतो की "आपण अर्धा तास अगोदरच आलो आहोत". ५ मिनिटे झाली, १० मिनिटे झाली, १५, २० मिनिटे झाली. पण ती काही येतच नव्हती. आता पाऊस सुद्धा सुरु झाला होता. बहुतेक माझ्या विरहाचे दु:ख, आभाळच रडून रडून सांगत होते. शेवटी निघण्याची वेळ सुद्धा झाली. पण हीचा अजूनही पत्ता नव्हता. मला काहीच सुचत नव्हते. तेवढ्यात, तिच्यासारखीच एक येताना दिसली. ती जवळ आली, पण छे, ती नव्हती.

मी अजूनच रडवेला झालो होतो. वेळ संपत चालली होती. निघायची वेळ झाली होती. तेवढ्यात ती येताना दिसली. उशीर होईल, मी भेटणार नाही म्हणून ती पळतच येत होती. मला जाणवले, ती रडतसुद्धा होती. डोळ्यांमधून येणारे पाणी हातांने पुसत होती.

ती जवळ आली. आणि आमचा प्रवास सुरु झाला. मी बोलायच्या मनस्थितीत नव्हतो. कोण जाणे, बोलायला गेलो तर कधी अश्रूंचा बांध फुटेल? आणि मी रडायला लागेल?. आधीच, सगळे मित्र आज दूर गेल्याचे दु:ख मनात होतेच. हे दुसरे दु:खसुद्धा सहन करावे लागणार होते. मी तिच्याकडे पहातच राहिलो. आमची भेट काही फार वेळ चालणार नव्हती. मला काही तिच्या स्टेशनपर्यंत जावेसे वाटत नव्हते. कारण, आजपासून अधिकृत सुट्टी लागली होती. सुट्टीच्या पहिल्याच दिवशी खेळण्याची मजा काही औरच असते.

आता ती तर जवळच होती. पण, बोलायला सुद्धा काहीच सुचत नव्हते. अगदी ५-६ मिनिटात आमची शेवटची भेट संपली.

माझे स्टेशन आले आणि मी उतरलो. हात हलवून तिला "गुड बाय" म्हणालो. ती पुढे निघाली. मी पहातच राहिलो तिच्याकडे. खूप पुढे गेली ती. पुढे जाऊन थांबली. पण, वळून नाही पाहिले. पुन्हा निघाली. अशी आमची शेवटची भेट संपली होती. आणि आम्ही आमच्या पुढच्या मार्गाने निघालो होतो.

मित्रांनो, गैरसमज नका करून घेऊ, ती ५.४५ ला निघणारी पुणे-लोणावळा लोकल होती. (क्रीम रंगाचा पोशाख म्हणजे लोकलचा रंग, टिकली म्हणजे "पुणे-लोणावळा" असा लिहिलेला बोर्ड, चष्मा म्हणजे पुढच्या काचा. ती रडत होती म्हणजे, पावसाचे पाणी पुढच्या काचेवर पडत होते. आणि हातांने डोळे पुसत होती म्हणजे, वायपर चालू होते पाणी हटवण्यासाठी.)

म्हणजे लहानपणापासूनच, सोहमला रहस्यमय गोष्टी वाचण्याची आणि गोष्टी रहस्यमय करून लिहिण्याची आवड होती. कदाचित, यामुळेच त्याची गोष्ट मी रहस्यमय करून लिहावी, असे त्याने मला सांगितले असावे.

तर अश्या प्रकारे सोहमचे दहावीचे वर्ष संपले. आणि आता वाट पहायची होती निकालाची. घरच्यांना, आजूबाजूच्या लोकांना पूर्ण विश्वास होता "हा नापास होणारच".

शेवटी एकदा निकालाचा दिवस उजाडला. सकाळीच बाबा म्हणाले "बाबा रे, नापास झालास तरी चालेल पण पळून नको जाऊस". सोहम दिलासा देण्यासाठी बाबांना म्हणाला "बाबा ७०% पडतील, काळजी

नका करू.".

पण बाबांना विश्वास नव्हता. सोहम निकाल घ्यायला गेला. त्याच्या मागे गुपचूप बाबा आले. भाऊ शाळेतच होता वाट पहात. मागून मामा सुद्धा आला. तोपर्यंत, आईने दोन तीन लोकांना सोहमच्या मागावर पाठवले होते.

हा शाळेत आला, वर्गात गेला. वर्गाबाहेरच भाऊ होता. शाळेच्या एका गेटवर मामा थांबला. दुसऱ्या गेट वर बाबा थांबले. रेल्वे स्टेशन वर दोन-तीन जण, एस. टी. स्थानकावर दोन-तीन जण. अशी पूर्ण फिल्डिंग लागली होती सोहमसाठी.

इकडे बाईंनी निकाल वाटप सुरु केले. बाई म्हणाल्या "आपल्या वर्गात या वर्षी एक जण नापास झाला आहे". सोहमला वाटले "मीच असणार बहुतेक".

हळू हळू प्रत्येकाचे नाव घेऊन, बाई त्याला समोर बोलावत होत्या. कोणाला ५०%, कोणाला ७०%, कोणाला ७१%, कोणी काठावर पास. इतरांचे गुण पाहून थोडा हुरूपसुद्धा येत होता मनात. "अरे, हा तर इतका मठ्ठ होता. पण, यालासुद्धा ६०% गुण मिळाले. मग मी कमीत कमी पास तरी झालो असेल".

शेवटी सोहमचा नंबर आला. निकाल लागलेल्या पैकी अजून कोणीच नापास झाले नव्हते. आणि, फारच कमी निकाल शिल्लक होते वाटायचे. सोहमने विचार केला "मग मी असू शकतो, तो नापास झालेला मुलगा." सोहम घाबरत घाबरत पुढे गेला. निकाल घेतला आणि गुण पाहिलेच नाहीत. आधी पाहिले, पास की नापास. निकालावर लिहिले होते "पास". सोहमचा जीव भांड्यात पडला.

मग त्याने मार्क्स पाहिले. मार्क्स होते ७५० पैकी ५३९. म्हणजे ७१.८६%. म्हणजे सोहमला, त्याच्या अंदाजापेक्षाही १४ मार्क्स जास्त मिळाले होते.

आधी गणिताचे मार्क्स पाहिले १५० पैकी १०२. म्हणजे, अ, ब आणि क गटाचा अभ्यास कामी आला होता. मग शास्त्रात होते १५० पैकी ११०. संस्कृतात १०० पैकी ७८, मराठीत १०० पैकी ६२. इंग्रजी मध्ये १०० पैकी ५७. म्हणजे बाकीचे मार्क्स पडले होते इतिहास भूगोलात. १५० पैकी १३०. म्हणजे त्याने सुट्टीत केलेला अभ्यास कामी आला होता तर.

नवीन आश्चर्य म्हणजे, सोहम वर्गात (शाळेत नव्हे) पहिला आला होता. जे लोक, "सोहम नापासच

होणार" म्हणून कोणत्याही कागदावर लिहून द्यायला तयार होते, त्यांची मुले चांगल्या १५-२० टक्क्यांने मागे होती सोहमच्या.

जेव्हा सोहमने बाबा, मामा, भाऊ, ओळखीचे सगळे, यांना निकाल सांगितला, त्यांना सुद्धा विश्वास बसला नाही. प्रत्येक जणाने वारंवार सोहमची मार्क-शीट तपासून पाहिली. "बाबाने, दुसऱ्या कोणाची मार्क-शीट तर नाही ना दाखवली आपल्याला?" पण नाही, ती सोहमचीच मार्कशीट होती.

मग, आधी घरी फोन करून आईला सांगितले. आईने उपास सोडला. आईने गेली चार वर्ष केलेल्या सोळा-सोमवारांचे फळच दिले होते महादेवाने आईला.

तसेच, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सोहमच्या आईची शनी महादशा याच काळात सुरु झाली होती. शनी महाराजांने काहीही न मागता, आईच्या मनातले स्वप्न आल्याआल्याच पूर्ण केले होते. सोहमच्या आयुष्यात नसली, तरी आईच्या आयुष्यात शनी महाराजांची एन्ट्री झाली होती. आजूबाजूला सुद्धा शनी महाराजांचे अस्तित्व जाणवले, की सगळे जण कसे सुतासारखे सरळ होतात. शनी महाराज म्हणजे सर्वात धार्मिक देव. कुंडलीमध्ये इतर ग्रह कितीही चांगले असले, तरी शनी महाराजांच्या परवानगीशिवाय काहीच होऊ शकत नाही. म्हणूनच त्यांना न्यायाधीशाचा दर्जा मिळाला आहे. हे शनी महाराजांचे अस्तित्व अजून काही सोहमला जाणवले नव्हते. पण, अस्तित्व होतेच की.

गोडबोले सरांची ती वाक्य खरी ठरली होती "सुधारायचे असेल तर तोच सुधारेल." त्यावेळेस जर सरांने सोहमला नापास केले असते तर? माहिती नाही, पुढे सोहम अजून किती वाया गेला असता.

मग काय, त्या दिवशी पेढे भरपूर वाटले गेले होते.

पुढे गोडबोले सर, शाळेतील पुढच्या मुलांना सोहमचे उदाहरण देऊ लागले होते "२-३ वर्षांपूर्वी, एक मुलगा होता आपल्या शाळेत. खूप उनाडक्या करायचा". मुले म्हणायची "सोहम का? सोहम का?" (मुलांना आधीच माहिती असायचे). गोडबोले सर पुन्हा म्हणायचे "त्याच्या आईचे रडणे त्याला आवडले नाही. म्हणून त्याने खूप अभ्यास केला आणि वर्गात पहिला आला." तुम्ही सुद्धा खूप अभ्यास करा" आई-बाबांची स्वप्ने पूर्ण करा".

सोहमचा भाऊ हे नेहमी सांगतो (त्याने सुद्धा ३ वर्षांने हे ऐकले होते ना).

सोहम असा का वागायचा? तर, लहानपणापासून होणारी तुलना, मित्रांने खेळायला न घेणे. अश्या गोष्टींमुळे त्याने त्याचे स्वत:चे एक जग निर्माण केले होते. टीम मधून काढला गेला, की हा शाळेला दांडी

मारून खेळण्यासाठी नवीन मित्र शोधायचा. आपल्याच जगात दंग रहायचा. तो जास्त बोलायचा नाही. आजही नाही बोलत. मनातच विचार करायचा. स्वत:शीच जास्त बोलायचा. स्वत:शी बोलून, तो स्वत:लाच कन्फ्युज करायचा (गोंधळात टाकायचा). आपल्याच मनाचे खेळ रंगवत बसायचा.

तसा सोहम फार भोळा होता. त्याला कोणीही सहज फसवू शकायचे. आजही तो, कोणत्याही गोष्टीवर सहज विश्वास ठेवतो. अगदी लहान मुले सुद्धा त्याला कधी कधी सहज वेड्यात काढतात. हे मी स्वत:सुद्धा पाहिले आहे.

अजून एक महत्वाची गोष्ट म्हणजे, सोहमने कधीही, कोणतीही परीक्षा बुडवली नव्हती. तसेच, एक गोष्ट पाहिली तर, सोहम नेहमी पावसाळ्यात शाळेला दांड्या मारायचा. आता या मागे शास्त्रीय कारण होते, ते म्हणजे उन्हाळा संपल्यावर पावसाळ्याच्या काळात जेव्हा वातावरण थंड असते, तेव्हा, आपल्या पेशींमध्ये / हार्मोन्समध्ये काही बदल होतात. ज्यामुळे आपल्यात मानसिक बदल निर्माण होतात. जाउदे ही गोष्ट आहे, याच्यात शास्त्र नको घुसवायला. पण, ज्योतिष घुसवता येईल की. सोहमच्या कुंडलीचा अभ्यास, पुढील भागांमध्ये लिहूच की.

साधारणपणे, १९९८-९९ साली सोहमच्या आईची शनी महादशा सुरु झाली. एखाद्या रिंग-मास्टर प्रमाणे त्यांने सोहमला सरळ केले. इतकी वर्ष, सोहमचे विचित्र वागणे सहन करून करून हैराण झालेल्या आईला, शनी महाराजांने, सोहमला पास करून थोडे समाधान मिळवून दिले. आईच्या कष्टांचे फळ दिले.

तर अश्या तऱ्हेने गोष्टीचा पहिला भाग संपला. पण पुढे याच गणितामुळे सोहमची कशी गोची होणार आहे ते पाहूच.

लहान मित्रांनो, अभ्यास करा. सोहमसारखे नका बनू. व्यवस्थित शाळेत जा. सोहम चुकला तुम्ही नका चुकू.

## १२. शाखाबदल, कॉलेजचे पहिले आणि दुसरे वर्ष.

तर, आता सोहमची एकदम हुषार मुलांमध्ये गणना व्हायला लागली होती. टवाळक्या करूनही चांगले गुण मिळवल्यामुळे, मित्रसुद्धा याला भारी समजू लागले होते. कॉलनीमध्ये, शाळेत, ओळखीच्यांमध्ये, आता लोक सोहमचा सल्ला घ्यायला येऊ लागले होते. सोहमला सुद्धा वाटू लागले, "आपण बऱ्यापैकी हुषार आहोत". "आपण चांगले आहोत" ही भावनासुद्धा कधी कधी माणसाला चांगले बनवते.

तर, दहावी झाली की पुढे आपल्यासाठी काय काय पर्याय आहेत? हे शोधले जाते. कोणी सायन्सला जाते, कोणी कॉमर्स निवडते, कोणी आय.टी.आय करते, कोणी डिप्लोमा करते. तर असेच, सोहमसुद्धा विचार करत होता. शेजारचे देशमुख काका म्हणाले, "तुला छान मार्क्स मिळाले आहेत, तेव्हा तू डिप्लोमा कर". पण, सोहमच्या कुटुंबात, आधी कोणीच फार शिकलेले नव्हते. सोहमला पूर्ण मार्गदर्शन करणारे कोणीच नसल्यामुळे, शेवटी सोहमने सायन्स शाखेचा एकच फॉर्म भरला.

सोहमला नेहमी वाटायचे "आपण मस्तपैकी सिंबायोसिस, बी.एम.सी.सी, मराठवाडा, एस.पी. अशा मोठ्या कॉलेज मध्ये शिकू. त्याने फक्त सायन्स शाखेचा फॉर्म भरला होता. आईच सगळे पुढच्या प्रवेशाचे पहात होती. पण, जास्त माहिती नसल्यामुळे फार मोठी अडचण होती. "आता शोधणार कसे, की कोणत्या कॉलेज मध्ये प्रवेश मिळाला आहे?" प्रत्येक कॉलेजमध्ये जाऊन शोधेपर्यंत संपूर्ण ॲडमिशन संपले असते. त्यावेळी ना मोबाईल होते ना आजसारखे ऑन-लाईन प्रवेश होत होते.

पण, सोहमने काहीतरी गणित केले आणि आईला म्हणाला "आई तू सांगवीच्या कॉलेजमध्ये जा, माझा नंबर तिकडेच लागला आहे". आई तिकडे गेली आणि सोहमचा नंबर खरेच तिकडेच लागला होता. पहिल्या यादीत त्याचा नंबर, सांगवीच्या कोणत्यातरी कॉलेज मध्ये लागला. झाऽऽले, मोठे कॉलेज न मिळाल्यामुळे याचा सगळा उत्साहच मावळला. त्यावेळी यांना हे सुद्धा माहिती नव्हते, की अजून तीन याद्या लागणार आहेत. आणि त्यात, याचा नंबर आवडत्या कॉलेजला लागू शकतो.

शेवटी यांने सांगवीच्या कॉलेजमध्येच प्रवेश घेतला. तसे, देव जे करतो ते भल्यासाठीच करतो. सोहम आधीच उडाणटप्पू, त्यातच मोठ्या कॉलेजमध्ये गेला असता तर कदाचित अजूनच बिघडला असता.

याला माहितीच होते, "आपण सायन्स शाखेला प्रवेश घेतला आहे. आणि सायन्स शाखेला गणित असते." गणितात आपला फार काही उजेड नाही". मग त्याने दोन चार मित्रांना कॉमर्स शाखेबद्दल विचारले. सगळयांकडून, कॉमर्स शाखेबद्दल चांगले ऐकून याला वाटू लागले "आपण कॉमर्स शाखेला प्रवेश घ्यावा. म्हणजे गणिताचा संबंधच येणार नाही."

सायन्सला प्रवेश घेतल्यापासून एक महिना झाला होता. याने घरी सांगितले "आई मला कॉमर्सला प्रवेश घ्यायचाय". घरचे उडालेच हे ऐकून.

मग याने परस्परच, सायन्स शाखा बदलून कॉमर्सला प्रवेश घेतला. घरच्यांनासुद्धा समजावून सांगितले.

कॉमर्स याला व्यवस्थित जमू लागले. अकाउंट हा तर त्याचा आवडत विषय झाला होता. आता गणिताची चिंता नव्हती. काही दिवसांने, शेजारच्या मेडिकलच्या दुकानात आईने याला काम मिळवून दिले. आता याला हळू हळू औषधांची माहिती व्हायला लागली. ११वीत याने कोणताही क्लास लावला नाही. सकाळी कॉलेज आणि संध्याकाळी मेडिकलचे दुकान, असा हा डबल शिफ्ट करू लागला. रात्री घरी आले की व्हॉलीबॉल खेळायचा.

हळू हळू व्हॉलीबॉल मध्ये हा तरबेज होऊ लागला. अकरावी संपली आणि हा बारावीत गेला. बारावीमध्ये याने अकाउंटचा क्लास लावला. याला कळाले होते "मी क्लास नाही केला तरी चांगले मार्क्स मिळतील." मग, क्लासला दिलेल्या पैशातून याने काजू-बदाम विकत घेतले. ते काजू बदाम घरी दिले.

घरी सांगितले "पुढे एक जण गाडीवर चालला होता. त्याच्या गाडीवरून हे काजू बदाम पडले. मी त्याला आवाज दिला. पण तो नाही थांबला. मग मी हे घरी घेऊन आलो". दहावीत चांगले गुण मिळाल्यामुळे, याचे घरी गल्ल्यातून पैसे चोरणे वैगरे आता बंद झाले होते. तसेच, आता स्वत: कमवायला लागल्यामुळे, याला आई बाबांच्या कष्टाच्या पैश्याची किंमत समजली होती. आई-बाबांचे कष्टाने कमावलेले पैसे वाया जाऊ नयेत म्हणून, याने क्लासच्या फीच्या पैशांतून, काजू बदाम विकत घेऊन घरी दिले.

क्लासच्या वेळेस हा घरून निघायचा आणि युनिवर्सिटीच्या जंगलात जाऊन अभ्यास करायचा.

याने अकाउंट हा विषय पाठच करून टाकला होता. १२ वीचा अभ्यास करता यावा म्हणून, गेले एक वर्ष मेडिकल मध्ये करत असणारे काम सुद्धा सोडून दिले.

हा जास्त काही हुषार नसल्यामुळे, घरच्यांना याच्या भविष्याची चिंता पडली होती. हा काही कॉमर्स साईड घेऊन सी.ए होणार नव्हता. "मग जास्तीतजास्त याला कुठे तरी सेल्स-मन म्हणून काम मिळेल" असे घरच्यांना वाटू लागले. त्या काळात सेल्स-मन म्हणजे, दारावर येऊन साबण विकणारा एक व्यक्ती. एवढेच त्यांना वाटायचे.

कॉमर्स साईड घेणाऱ्यांना, कंपनी सेक्रेटरी, एम.बी.ए असे कोर्स पूर्ण करून मोठ्या हुद्द्यावर नोकरी मिळते. हे त्यांना माहितीच नव्हते. कॉमर्स साईड घेणारे बहुतेक लोक भरपूर पैसा कमावतात. पण, हे सोहमच्या घरच्यांना कुठे माहिती होते?

१२ वीच्या परीक्षा झाल्या, अकाउंट मध्ये ७८ मार्क्स मिळाले. १२वी सुद्धा पास झाला सोहम.

**१३. पुन्हा शाखाबदल, गणिताने केलेली गोची. आणि पुन्हा पहिले, दुसरे तिसरे आणि चौथे वर्ष. तीन-चार प्रेम प्रकरणे.**

याला काहीही करून मोठ्या कॉलेजमध्ये प्रवेश घ्यायचाच होता. १२वी झाल्यावर, याने पुन्हा एकदा मोठ्या कॉलेजमध्ये प्रवेश घेण्याचा प्रयत्न केला. पण, याला १२वीत फक्त ६४.१३% टक्केच गुण मिळाले होते. मोठे कोणी ओळखीचेसुद्धा नव्हते. ज्यांच्या वशिल्याने हव्या त्या कॉलेजमध्ये प्रवेश मिळाला असता. याला काही मोठ्या कॉलेजमध्ये प्रवेश मिळालाच नाही.

मग याला देशमुख काकांचे बोलणे आठवू लागले. मागे एकदा देशमुख काका म्हणाले होते, "तुला १०वीला चांगले गुण मिळाले आहेत. तू डिप्लोमा कर."

याने ठरवले "आपण दहावीच्या मार्कांवर डिप्लोमाला प्रवेश मिळतोय का ते पाहू. नाहीच मिळाला, तर बाहेरूनच कॉमर्सचे पुढचे शिक्षण घेऊ आणि नोकरी करू."

त्याने डिप्लोमाचा फॉर्म भरला. पण, डिप्लोमाला गणित असते हे त्याला माहितीच नव्हते. तसेच, आता याला आरक्षण म्हणजे काय असते? ते कळू लागले. सोहम ब्राम्हण, म्हणजे अनारक्षित वर्गात मोडणारा. याचा प्रवेश घेण्याचा नंबर लागतच नव्हता. कॉलेज सुरु होऊन २ महिने झाले तरी प्रवेश प्रक्रिया संपली नव्हती. पण हा प्रत्येक राउंडला जातच राहिला. नशिबाने, शेवटी एकदा याचा नंबर आला. शेवटच्या राउंडचा शेवटचा प्रवेश याला मिळाला. याला इलेक्ट्रिकल शाखा मिळाली.

याने फक्त मोठ्या कॉलेजमध्ये प्रवेश मिळवण्यासाठी डिप्लोमाला ॲडमिशन घेतले होते. बाकी डिप्लोमाशी याचे काहीही घेणे देणे नव्हते.

याला प्रवेश मिळाला तेव्हा, कॉलेज सुरु होऊन अडीच महिने झाले होते. आता दहावीत ज्याला दहावीचे गणित व्यवस्थित येत नव्हते, त्याने डिप्लोमाला प्रवेश घेतला होता. भारतातील सर्वात चांगल्या असणाऱ्या महाविद्यालयात या कॉलेजचा नंबर लागतो. डिप्लोमाला सगळे विषय आणि अर्थातच, गणितसुद्धा इंग्रजीमध्ये असणार होते. आधीच याचे मराठीत असणाऱ्या गणिताचे वांदे होते. तिथे आता सगळेच इंग्रजीमध्ये असणार होते.

"पॅरेलल" म्हणजे समानंतर, "ट्राएंगल" म्हणजे त्रिकोण, "पेन्टागॉन" म्हणजे पंचकोन हे सुद्धा त्याला

आत्तापर्यंत माहिती नव्हते. पुढच्या गोष्टींचा विचारच न केलेला बरा.

१२वीची परीक्षा साधारणपणे फेब्रुवारी मध्ये संपते. याला सप्टेंबरमध्ये डिप्लोमाला प्रवेश मिळाला. म्हणजे गेले ७-८ महिने हा घरीच सुट्टी एन्जॉय करत होता. हा जेव्हा कॉलेजला आला, तेव्हा सुद्धा याचा सुट्टीचा मूड काही गेलाच नव्हता. याची मानसिक आणि शारीरिक, अश्या दोन्हीही तयाऱ्या झाल्या नव्हत्या. मग हा टंगळ-मंगळ करत कॉलेजला जाऊ लागला. पहिले चार दिवस वर्गच माहिती नव्हता. कसे तरी याने वर्गाची माहिती मिळवली, विषयांची माहिती मिळवली.

त्यात पहिल्या वर्षाला गणिताचे दोन विषय होते. ते सुद्धा पूर्ण इंग्रजीमधून. आता हा मराठी माध्यमाचा विद्यार्थी, अडीच महिने उशिरा कॉलेजमध्ये प्रवेश मिळाला होता. कसे काय गणित सोडवणार होता? देवच जाणे.

याने कशी तरी विषयांची माहिती मिळवली. इंजिनिअरिंग मध्ये तीन वर्षात, ३३-३४ वेगळे वेगळे विषय असतात. दर सहा महिन्याला ५-६ वेगळे वेगळे विषय असतात. असे तीन वर्षांत ३३-३४ विषय सोडवले, की मुले डिप्लोमा होल्डर होतात.

पहिल्या वर्षात ११ विषय होते. पहिल्या सहामाहीला ६ विषय आणि दुसऱ्या सहामाहीला ५ विषय. विषय होते - केमिस्ट्री (रसायन शास्त्र), फिजिक्स (भौतिक शास्त्र) इत्यादी. या विषयांची नावे सुद्धा "कोणत्यातरी जर्मन माणसाची असतील" असे त्याला वाटू लागले. यातले इंग्रजी शब्द तर सोडूनच द्या. "टायट्रेशन" म्हणजे काय? हे अजूनसुद्धा मलाही सांगता येणार नाही. त्याचे तर विचारूच नका. इंजिनिअरींग ड्रॉइंग, इंजिनिअरींग मेकॅनिक्स, असले विषय तर त्याला काळच वाटू लागले. त्याच्यातच गणित सुद्धा होतेच की. पहिल्या सहामाहीला गणित भाग एक आणि दुसऱ्या सहामाहीला गणित भाग २.

त्यातल्या त्यात, कम्प्युटर आणि संवाद कौशल्य (कम्युनिकेशन स्किल्स) हे विषय जरा सोपे वाटत होते. कारण या विषयांत फेका मारता येतात.

याला कळू लागले होते, "इथे गणिताचे सुद्धा बाप असणारे विषय आहेत. आपले काही खरे नाही. "आपण पुन्हा कॉमर्सला प्रवेश घेऊ आणि सुखाने जगू."

गणित म्हणजे कमालीचे अवघड होते. कसली कसली चिन्ह होती. "या चिन्हांचा अर्थ कोण

समजावणार? बरं, क्लास लावायचा तर फी परवडत नाही." एका विषयाची फी ३०००-४००० रुपये. एवढी फी तर कॉलेजच्या पूर्ण एका वर्षाची होती.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे, शाळेत कधीच आवश्यक गोष्टी याच्याकडे नसायच्या. त्या गोष्टींची नावे सुद्धा याला माहिती नसायची. आता तर याने इंजिनिअरींगला प्रवेश घेतला होता. इथेही तोच प्रकार होता. मुले इंग्रजीमधून, कुठल्या कुठल्या वस्तूंची नावे सांगत होती.

कॅल्क्युलेटर, सेट स्क्वेअर, ट्राय-स्क्वेअर, ड्राफ्टर, इत्यादी. इथे पेन्सिलचे सुद्धा वेगळे वेगळे प्रकार होते- एच.बी, एच, २एच इत्यादी. अक्षर लिहिण्यासाठी डार्क पेन्सिल, आकृत्या काढण्यासाठी फेंट पेन्सिल वगैरे वगैरे. आत्तापर्यंत याला फक्त कॅम्लिनचीच पेन्सिल माहिती होती. कॅल्क्युलेटरचे सुद्धा ५-६ प्रकार होते. आता यापैकी कोणत्या गोष्टी लागतात? आणि कोणत्या विकत घ्यायच्या? हे सुद्धा समजत नव्हते.

त्यातच आता सबमिशन सुरु होणार होते. "सबमिशन म्हणजे काय?" हे सुद्धा समजायला ५-६ दिवस लागले त्याला. शेवटी एकदाचे समजले. सबमिशन म्हणजे, आपण जे काही प्रात्यक्षिक (प्रयोग) करतो, ते सगळे वहीच्या कागदांवर लिहायचे आणि एका फाईलमध्ये लावायचे. पुढे ही फाईल शिक्षकांकडून तपासून घ्यायची.

पण, नवीन प्रॉब्लेम आला. "आपल्याला कोणते विषय आहेत? त्यांचे वर्ग कुठे भरतात? त्यांची प्रात्यक्षिक (प्रॅक्टिकल्स) कुठे होतात?" हे सुद्धा अजून कळले नव्हते. वेळापत्रक सुद्धा नव्हते जवळ.

सगळा अंधारच दिसू लागला होता. त्याने पुन्हा विचार केला "यार, आपले कॉमर्सच बरे होते."

जेमतेम आठवडा झाला असेल, हा वर्गात जाऊ लागला होता. आणि, चाचणी परीक्षा सुरु झाल्या. प्रत्येक पेपर २० मार्कांचा. प्रत्येक विषयांत याला २० पैकी शून्य गुण मिळाले. जास्तीत जास्त विषयात, ० मार्क्स मिळवणारा हा पहिला विद्यार्थी ठरला.

दर १५ दिवसांना १ चाचणी, अश्या ३ चाचणी परीक्षा होत्या. तीनही मध्ये, सगळ्या विषयांत, याने ० मार्क्स मिळवण्याचा नवीन पराक्रम केला.

इंजिनिअरींग मध्ये १०० पैकी ४० मार्क्स मिळाले तर पास. त्यातील २० मध्ये याला ० होते. आता बाकीच्या ८० पैकी ४० मिळवायचे म्हणजे, अगदी अशक्यच वाटू लागले याला.

दरम्यान, याने थोड्याफार आवश्यक गोष्टी जमवल्या आणि सबमिशन सुरु केले. जे सबमिशन

हाताने फाईलवर लिहायचे होते, ते याने कसेबसे पूर्ण केले. "पण, इंजिनिअरींग ड्रॉइंग मध्ये काय करणार?" मोठ्या शीटवर कसल्यातरी आकृत्या काढायच्या होत्या. गेल्या दोन वर्षांत याने कॉमर्स साईड घेतली होती. शाळेत मिळवलेले शास्त्राचे, गणिताचे, सगळे ज्ञान हा विसरून गेला होता.

ड्रॉइंगला हा मराठीतूनच आकृत्या म्हणू लागला. म्हणजेच, याला किती कळत असेल याचा विचार न केलेलाच बरा. तसेही, अजूनही हा शार्पनरला टोकयंत्र म्हणायचा. इरेजरला खोडरबर म्हणायचा. सेट-स्क्वेअर म्हणजे काय? माहितीच नव्हते. त्याचा उपयोग काय? हेही माहिती नव्हते. कॅल्क्युलेटर कसा वापरायाचा? तेही कळत नव्हते. ड्रॉइंग काढायचे म्हणले तर, याला पट्टी आणि पेन्सिलशिवाय अजून कोणतीही गोष्ट वापरता येत नव्हती. म्हणायला कर्कटक वापरता येत होते. पण, फक्त गोल काढण्यापुरते. आता या कर्कटकाचे इंग्रजीमधील नाव काय असेल? ओळखा पाहू.

पार्टीला हा मेजवानी म्हणायचा. याचे मराठी शब्द वापरणे पाहून मुलांमध्ये हा चेष्टेचा विषय झाला होता. कोणीही मदत करायला तयार नव्हते.

कसे तरी याला दोन-तीन मित्र मिळाले. अमित आणि कुणाल. कुणाल म्हणजे अगदी दिनो मोरिया सारखा दिसायचा. त्याचे दिसणे, हुषार असणे, त्याचे अक्षर पाहून सोहम भलताच इम्प्रेस झाला. अमित म्हणजे आपला अशोक सराफ. कुणाल सोहमसारखाच होता, पण थोडा हुषार. अमित हुषार होता. अमितने त्याच्या एका सुनील नावाच्या मित्राकडून, सोहमच्या ड्रॉइंगच्या शीट काढून घेतल्या. सोहमचा सगळयात मोठा प्रश्न सोडवला त्याने.

८ पैकी ७ शीट सुनीलने काढून दिल्या. पण त्याचे स्वत:चे सबमिशन सुद्धा होतेच की. तेव्हा सुनील सोहमला म्हणाला "आता एक शीट तूच काढ.". सोहमला फक्त पट्टीच वापरता येत होती. एक शीट काढण्यासाठी याला, अगोदर दोन शीट वाया घालवाव्या लागल्या.

सोहम शीटवर ड्रॉइंग काढत बसला होता. तेवढ्यात, वर्गातली एक सुंदर पंजाबी मुलगी, त्याच्या जवळ आली आणि म्हणाली "क्या मै आपका कंटेनर देख सकती हू?" आता हे कंटेनर म्हणजे, शीट ठेवतात तो डब्बा. याला वाटले "आईला, एवढी सुंदर मुलगी आपल्याशी बोलायला आली?" बहुतेक, आपण खूप भारी असणार". हिने नक्कीच, आपले रूप न पाहता आपले मन पाहिले असेल." हा एकदम स्वप्नांच्या दुनियेतच गेला. त्याने, स्वप्नात तिला गर्ल फ्रेंड सुद्धा बनवून टाकले.

त्याचे झाले असे, की तिचे शीट चोरीला गेले होते आणि तिला सोहमवर संशय होता. तसेही, हा

कधीच वर्गात न दिसला नाही. तिला याच्यावरच संशय येणे स्वाभाविक होते. म्हणूनच तिला सोहमचे कंटेनर तपासायचे होते. सोहमने चोरी केलीच नव्हती आणि त्याला काही माहितीसुद्धा नव्हते. याने तिला कंटेनर देऊन टाकले. तिने ते तपासले. पण तिची शीट सापडली नाही.

तश्याच, सोहमच्या शीट विस्कटून ती निघून गेली. सोहमला कोणी तरी सांगितले "अरे तिची शीट कोणीतरी चोरली. म्हणून तिने तुझे कंटेनर तपासले". सोहमचे स्वप्न तुटले होते. त्याच्या स्वप्नातली गर्ल-फ्रेंड, त्याला चोर समजत होती.

याने आपले शीट कसे बसे पूर्ण केले. सबमिशनचा शेवटचा दिवस होता. सरांकडे गेल्यावर सर चिडलेच. सर म्हणाले "हे काय काढले आहे?" हे शीट तुला पुन्हा काढावे लागेल.".

सोहम एकदम रडकुंडीला आला. सर त्याने काढलेल्या शीटवर काठ मारणार, तेवढ्यात त्याने सरांचा हातच पकडला. आणि म्हणाला "सर, आज शेवटचा दिवस आहे, सहा वाजले आहेत. मी कधी हे शीट काढणार? माझे वर्षच वाया जाईल. त्यापेक्षा सर, मला कमी मार्क्स द्या. पण, असे नका करू". पूर्वीची हिंमत कामी आली होती.

सरांना दया आली, आणि त्यांने सोहमचे सबमिशन कबूल केले.

वर्क-शॉप या विषयात वेगळे वेगळे तांत्रिक प्रशिक्षण दिले जाते. उदा. प्लंबिंग, सुतारकाम, फिटिंग, लोहारकाम इत्यादी. वर्क-शॉप या विषयाची परीक्षा नव्हती. फक्त दिलेली कामे पूर्ण करायची एवढेच. ही कामे मात्र हा मन लावून करू लागला. याच्यामध्ये हा एकदम पटाईत. त्याने वर्गातील इतरही मुलांची कामे पूर्ण करून दिली.

चला, अशाप्रकारे त्याचे सबमिशन संपले होते.

याच काळात हा, डान्स शिकण्यासाठी रोज शुक्रवार पेठेतल्या "महाराष्ट्राची लोकधारा" हा कार्यक्रम सादर करणाऱ्या सरांच्या ग्रुपमध्ये जाऊ लागला. पुढे कधीतरी याच सरांना (संतोष संखद), त्यांच्या संहिता या चित्रपटातील नृत्य-दिग्दर्शनासाठी पारितोषिक मिळाले. टी.व्ही वर त्यांना पारितोषिक घेताना पाहून सोहमची छाती अभिमानाने भरून आली होती.

याला डान्स जमायचाच नाही. सगळी मुलंडान्स करत असताना हा एका कोपऱ्यात थांबायचा. फक्त प्रेक्षकाचीच भूमिका करायचा. पण, मनात डान्स करण्याची इच्छा होतीच.

काही दिवसांने दिवाळीच्या मुख्य परीक्षा जवळ आल्या. याला कळून चुकले होते, "इकडे आपले काहीही चालणार नाही.". आत्तापर्यंत झालेल्या चाचणी परीक्षांमध्ये आपण नापासच झालो आहोत." आपण पुन्हा कॉमर्सला प्रवेश घेऊ. आधीच आपण दहावीनंतर १२वी केली. पुन्हा १०वीच्या मार्कांवर डिप्लोमाला प्रवेश घेतला. म्हणजे, आपली दोन वर्ष आधीच वाया गेली आहेत. जर आपण नापास झालो, तर २+१ अशी ३ वर्ष वाया जातील. हा सगळयात वयस्कर होता वर्गामध्ये.

याने घरी सांगितले. बाबा, मामा, आई, भाऊ असे सगळेच खूप रागावले.

बाबा म्हणाले "तुला सांगत असतानासुद्धा, तू ११ वी मध्ये सायन्स सोडून कॉमर्सला प्रवेश घेतलास. नंतर कॉमर्स सोडून डिप्लोमाला प्रवेश घेतलास. सहा महिने झाल्यावर आता तू म्हणतो आहेस, की पुन्हा कॉमर्स करायचे". युनिवर्सिटी काय तुझ्या बापाची आहे काय, तुला हवे तेव्हा आणि हवे तिथे प्रवेश द्यायला?". बरं, सगळे तू तुझ्याच मनाने केलेस आणि आता नाही जमणार म्हणतोस होय?". अरे तुझे वय बघ, तू कसा वागतोस ते बघ. शाळेत तू लावलेले दिवे आम्हाला माहितीच आहेत." गुपचूप डिप्लोमा पूर्ण करायचा". आता तुझे काहीही ऐकून घेणार नाही मी.".

अश्या तऱ्हेने याच्या मनाचा हिरमोड झाला होता. "ही इंजिनिअरिंग साईड आपण का निवडली?" असे सोहमला वाटू लागले होते. सोहम इंजिनिअर होणार म्हणून घरचे खूष होते. पण, जणू काही फाईव्ह-स्टार हॉटेलमध्ये जेवायचे आमिष दाखवून, एखाद्याला समोर शिळे अन्न वाढण्यासारखे सोहमचे नशीब झाले होते. कॉमर्स सोपे वाटत असूनही घेता येत नव्हते. आणि डिप्लोमा जमत नव्हता.

शाळेतली मुले याला म्हणायची "सोहम, तू टवाळक्या करायचास. पण नेहमी, आमच्यापेक्षा जास्त मार्क्स मिळवायचास". पण आता हा स्पर्धेच्या जगात आला होता. जो तो शिक्षकांना खुष करून जास्तीत जास्त मार्क्स मिळवायचा प्रयत्न करत होता. गोरी मुले, गोरी हुषार मुले, सभ्य मुले, शिक्षकांची आवडती मुले पाहून, याचा आत्मविश्वास अजूनच डळमळीत होऊ लागला होता. हा ना गोरा होता, ना हुषार होता, ना सभ्य होता, ना शिक्षकांचा आवडता होता.

वर्गात, सॉरी 'क्लास' मध्ये, मुले उठून उठून शिक्षकांच्या प्रश्नांची उत्तरे द्यायची. याला प्रश्नसुद्धा अर्ध्या तासाने कळायचा. सरांचे इंग्रजी बोलणे समजायचे. पण, त्या बोलण्यात तांत्रिक भाषेचे शब्द आले की गोची व्हायची. जोशी, पेडणेकर, वाघेला, पाटील अशी हुषार मंडळी याच्याशी बोलायची सुद्धा नाहीत. इथेच

सुरुवात झाली, याचा आत्मविश्वास संपण्याची. कुठे तो मुलगा होता, जो खात्रीने सांगायचा "बाबा ७०% मिळतील". आणि कुठे तो मुलगा, जो अजूनच खात्रीने सांगत होता "७-८ विषय उडणार यावेळी.".

लहानपणी लावून घेतलेल्या सवयी आता फार महाग पडू लागल्या. "आपण कधीच वेळापत्रक लिहून घेतले नाही. इतिहासाच्या वहीत गणित, मराठीच्या वहीत शास्त्र, गणिताच्या वहीत भूगोल असे कसेही लिहित गेलो. तीच सवय अंगवळणी पडली. परीक्षा आल्यावर कसे तरी पाठ करून पास झालो." कॉलेजमध्ये तर हा फक्त एकच वही घेऊन जायचा. एकाच वहीत सगळ्याच विषयांचे लिहिले, की कोणाला तरी ते पुढे समजेल का?

"या गोष्टींचा त्याला आता पश्चाताप होऊ लागला होता. तसेच, १०वी नंतर आलेला अति-आत्मविश्वास सुद्धा महाग पडू लागला. त्याचे झाले असे की "आपण सहज १०वी प्रमाणे पास होऊत, शेवटच्या चेंडूवर सिक्सर मारुत" या अति-आत्मविश्वासामुळे हा वर्गात लक्षच नाही द्यायचा, क्लास बंक मारायचा. "कॉलेज म्हणजे बंक मारण्याचे ठिकाण" असे त्याला वाटू लागले होते.

परीक्षा तोंडावर आल्या होत्या. नेहमीप्रमाणे याच्याकडे अभ्यासक्रम नव्हता. मित्रांचे पत्ते माहिती नव्हते. जिवलग मित्र लांब राहणारे होते. "वर्गातली हुषार मुले आपल्याला मदत करणार नाहीत" याची खात्रीसुद्धा होती. मदत करणारे कोणीच उरले नव्हते. अभ्यास ज्याचा त्यानेच करायचा होता.

इकडे कुणाल, व्यवस्थित अभ्यास करूनही सोहमसारखाच नापास होत होता. तर अमितसुद्धा काही वेगळा नव्हता. फक्त फरक एवढाच होता, की ते दोघे कमीत कमी प्रयत्न तरी करत होते.

यानेसुद्धा कशी तरी पुस्तके जमवली. पण, अभ्यासक्रम नसल्यामुळे आख्खे पुस्तकच हा वाचू लागला. आता, प्रत्येक विषयाचे आख्खे पुस्तक वाचायचे म्हणजे कमीत कमी सहा महिने लागले असते. याने जेमतेम अभ्यास सुरु केला आणि परीक्षा सुरु झाल्या.

याचे "थ्री ईडीयटस" सिनेमा सारखे झाले. प्रश्नच कळत नव्हता, तिकडे उत्तर काय लिहिणार? मग याने थापा मारायला सुरुवात केली. फक्त उत्तरपत्रिका काळी करायची कामे करू लागला. आता जेव्हा पेपर संपले, तेव्हा याने "पेपर कसे गेले?" याचा आढावा घेतला. याने प्रत्येक प्रश्नाचे उत्तर लिहिले होते. भलेही फेका मारल्या होत्या. पण याला वाटू लागले "आपण नक्की ६ पैकी ४ विषयात पास होउत."

निकाल लागला. हा फक्त वर्क-शॉप आणि कम्प्युटर मधेच पास झाला होता. म्हणजे, ६ पैकी ४ विषयात नापास. शाळेत जसे अंदाज खरे व्हायचे, तसे इकडे होत नव्हते.

आता दुसरी सहामाही चालू झाली आणि नवीन ५ विषय आले. ४ विषयात नापास झाल्याने याचा सगळा मूडच गेला होता. हा वर्गात जायचा, सबमिशन करायचा. पण, परीक्षा देऊन शून्य गुण मिळाले, तर भर वर्गात अपमान होईल. त्यापेक्षा पेपर न देऊन शून्य गुण मिळाले, तर अनुपस्थित हा शेरा मिळेल. "अनुपस्थित राहून नापास होणे परवडेल" असे समजून हा चाचणी परीक्षाच नाही द्यायचा. कमीतकमी, "अनुपस्थित असल्यामुळे मी नापास झालो" हे कारण तरी सांगता येणार होते ना. शेवटी व्हायचे तेच झाले. पुन्हा प्रत्येक चाचणी परीक्षेत २० पैकी ० मार्क्स. याने नापास होण्याचा नवीन विश्व-विक्रम केला होता.

मुलेच काय, हा शिक्षकांचा सुद्धा चेष्टेचा विषय झाला होता. याला सगळयांच्या नजरा कळत होत्या. पण काहीच चालत नव्हते.

दुसऱ्या सहामाहीमध्ये, व्हॉलीबॉल मध्ये यांची टीम जिंकली. याचे इम्प्रेशन कॉलेजमध्ये थोडे वाढले. पण, अभ्यासात प्रगती खुंटली होती.

दरम्यान यालासुद्धा वाटू लागले, आपली सुद्धा गर्ल-फ्रेंड असावी. सोहमची लफडेबाजी इथेच सुरु झाली असावी. याला त्याची सिनियर असणारी काश्मीरची मुलगी आवडू लागली. याने लहानपणापासूनच ऐकले होते "काश्मीरच्या मुली खूप सुंदर असतात." होते ही तसेच, ती मुलगी अगदी गोरी पान, अगदी करीना कपूर सारखी सुंदर होती. तिला पटवायचे म्हणजे, मोठेच काहीतरी करायला हवे होते. आता हा ड्रामे-बाज बनू लागला होता. हा काहीतरी कारण काढून तिच्याशी बोलला. दुसऱ्या दिवशी पूर्ण कॉलेजमध्ये अफवा पसरवून दिली "त्या मुलीच्या मित्रांने, मी तिच्याशी बोललो म्हणून मला मारले". एवढेच नाही, तर ५-६ दिवस हा पठ्ठ्या, हाताला बँडेज गुंडाळून फिरत होता कॉलेजमध्ये.

आता याचे सिनियर, जे याच्या व्हॉलीबॉलच्या टीम मध्ये होते. त्यांने त्या मुलीला सांगितले "तुझ्यामुळे सोहमला मार पडला." झाले, याने तिची सहानुभूती तर मिळवली होती.

पुढे याने तिच्याशी मैत्री सुद्धा केली. पण, खरेच तिचे मित्र याच्या मागे पडले. याने विचार केला "आता कोण वाचवणार?" तेवढ्यात, कॉलेजमध्ये ज्या मुलाचा वट आहे, असा मित्र मिळाला. याचे शत्रू गप्प झाले.

पुढे याने सरळ तिला विचारले "मला तू आवडतेस." ती म्हणाली "अरे तू माझ्यापेक्षा ४ वर्षांने लहान आहेस.". झाले, याची पहिली प्रेम कहाणी इथेच संपली होती. पण, याच्यातही एक सकारात्मक गोष्ट त्याला मिळाली. ती म्हणजे, कोणीतरी याच्यापेक्षाही वयस्कर होते कॉलेजमध्ये. याने पुन्हा विचार केला "मी

तर फक्त २० वर्षाचा आहे आणि ती २४. म्हणजे, मी नापास झालो तर काय बिघडले?"

पण, याला हे माहिती नव्हते, की ती मुलगी होती. ती सुंदर असल्यामुळे, तिला कधीही चांगला कमावणारा मुलगा (नवरा) मिळाला असता. आणि सोहम मुलगा होता. मुलांचे सौंदर्य त्यांच्या कर्तुत्वात लपलेले असते. सोहमचे काय कर्तुत्व होते? ३ वर्षं वाया घालवण्याचे? पुढे, ती मुलगी पास होऊन परत काश्मीरला निघून गेली.

व्हायचे असे की, हा लहानपणापासूनच एकटा राहायचा. याला एकटे राहणारे, एकटे पडलेले कोणी दिसले, की याची चटकन मैत्री व्हायची त्या व्यक्तीबरोबर. ती सुद्धा एकटीच वाटली असावी याला. तसेच होते. त्या काळी, बाहेरच्या राज्यातून आलेल्या मुला-मुलींना, कॉलेजमधली मुले-मुली अघोशीतपणे वाळीत टाकायची. ही सुद्धा त्यापैकीच एक. अरुणाचल प्रदेश, मणिपूर, सिक्कीम, आसाम, या राज्यातून आलेल्या मुलामुलींना, आजही, नेपाळी, चायनीज म्हणून बोलावतात काही लोक. पण, सोहम यांच्याशीच मैत्री करायचा.

त्यांना सुद्धा महाराष्ट्रातील मुलांशी पंगा घ्यायचा नसायचा. सोहमची कॉलेजच्या डॉनशी ओळख होती. आता, ही बाहेरच्या राज्यातून आलेली मुलं सोहमसोबत राहून त्याचाच आधार मिळवायची.

दरम्यान, वार्षिक परीक्षा झाल्या. गेल्यावेळेप्रमाणेच, या वेळीसुद्धा याने परीक्षेत थापा मारल्या. एकूण ९ विषयांपैकी. म्हणजे, आधीचे ४ आणि नंतरचे ५. तर, अश्या ९ पैकी, हा फक्त २ च विषयात पास झाला.

एकूण निकाल पाहिला तर, ११ पैकी फक्त ४ विषय याने सोडवले होते याने. पुढच्या वर्षाला प्रवेश मिळवण्यासाठी याने कमीतकमी ६ विषय सोडवायला हवे होते. म्हणजे, "आपण नापास झालो आहोत. आता पुढच्या वर्षात प्रवेश मिळणार नाही" हे त्याला कळाले होते.

पण दैव याच्या पाठीशी होते. सरांने नवीन नियम काढला. पुढच्या वर्षात प्रवेश मिळू शकणार होता. ७ + १२ नवीन विषय मिळणार होते. पण एक अट होती. ती म्हणजे, कॉलेजमध्ये पालकांची चिठ्ठी द्यायची "मला पुढचे विषय द्या. मी अभ्यास करून पास होइल".

हा चिठ्ठी देण्यासाठी डोंगरे सरांकडे गेला. सरांकडे याची कीर्ती आधीच पोचली होती. सर याला चेहऱ्याने ओळखत नव्हते. पण नावाने ओळखत होते. याने सांगितले "सर माझे नाव सोहम". सर म्हणाले, "तू आतीषचा मित्र ना रे?" सोहम म्हणाला "हो". "तूच चोरी केली होतीस का हॉस्टेलमध्ये?".

हा दचकलाच हे ऐकून. याला माहितीच नव्हते, की हॉस्टेलमध्ये काही चोरी झाली आहे. सोहम म्हणाला "कसली चोरी?".

सर म्हणाले "सगळे कळत असूनही न कळल्यासारखे कशाला करतोस?"

सोहम म्हणाला "सर, मला काहीही माहिती नाही". "मी चोरी केलेली नाही".

कसातरी तो विषय संपला. आणि त्याला पुढच्या वर्षाला प्रवेश मिळाला.

त्याचे झाले असे की, बहुतेक आतीषने हॉस्टेलमध्ये काहीतरी चोरी केली असावी (कदाचित नसेलसुद्धा केली). पण, आतीष याचा मित्र असल्यामुळे, नाव याच्यावर सुद्धा आले. आतीषसुद्धा नापास होऊन, कॉलेज वगैरे सोडून परत घरी गेला होता. त्यामुळे, खरे काय आणि खोटे काय? हे सोहमला समजले नाही.

आता, सोहम चोर सुद्धा ठरला होता तर.

याच्याशी वर्गात कोणीच बोलत नव्हते. फक्त अमित आणि कुणाल होते. पहिल्या वर्षीचे ७ आणि नवीन ६, असे एकूण १३ विषय झाले होते. याच्यावरच कर्जाचा डोंगर वाढतच होता. इंजिनिअरिंगमध्ये, मुलांना ४ विषयसुद्धा सोडवणे अवघड वाटते. याच्यावर तर १३ विषयांचा डोंगर होता.

यावेळी सुद्धा, सबमिशनची फाईल लिहिताना ती पंजाबी मुलगी पुन्हा सोहमकडे, त्याची फाईल मागायला आली. सोहमला पुन्हा वाटले "हिला बहुतेक हिची चूक समजली असेल. उगाचच माझ्यावर आळ घेतल्यामुळे हिला वाईट वाटले असेल. म्हणूनच, ही आपल्याशी मैत्री करण्याच्या बहाण्याने आपली फाईल मागायला आली." सोहमने एकदम आनंदात तिला आपली फाईल दिली. तिने एक-दोन मिनिट काहीतरी पाहून फाईल याला परत दिली.

सोहम भोळेपणाने म्हणाला "आप रख लो फाईल, काम होने के बाद दे देना"

ती म्हणाली "हो गया मेरा काम".

पुन्हा मित्राने सांगितले "अरे हिची फाईल हरवली. तिला परत तुझ्यावरच संशय आला".

यावेळेस सोहमला राग आला. थेट तिच्याकडे जाऊन, तोडक्या मोडक्या हिंदीत सोहम म्हणाला "आप अपनी चीजे संभालके रख नही सकती. और हमेशा मेरे पास आ के क्यो पुछती हो?”

तिच्याशी भरपूर भांडण करूनच सोहम परत आला.

याला पुन्हा एकटे पडल्यासारखे वाटू लागले होते. याला पुन्हा एकदा, "आपल्याला कोणीतरी गर्ल-फ्रेंड असावी" असे वाटू लागले. जवळच राहणारी नवीन मुलगी आवडू लागली.. पण, तिच्याशी बोलणार कसे?

याने ठरवले "आपण एक काम करू, तिच्याशी कोणतेतरी पुस्तक मागण्याच्या बहाण्याने बोलू". सोहमने तिच्याकडे गणिताचे पुस्तक मागितले. तिने पुस्तक थेट घरीच आणून दिले. पुस्तक तर काही कामाचे नव्हते. पण, यातून एक संकेत मिळाला होता. बहुतेक तिलाही सोहम आवडत होता.

"पुस्तक परत देताना तिला प्रपोज करू" असे ठरवून याने, पुढे २-३ महिने तिचे पुस्तक परत दिलेच नाही. व्हायचे असे की, दर वेळेस हा पुस्तक देण्याचे आणि प्रपोज करण्याचे ठरवायचा. पण, कधी कधी हा विसरून जायचा. कधी कधी आठवले की हिंमत व्हायची नाही. शेवटी तिची आई पुस्तक मागायला आली. तेव्हा कुठे याने तिचे पुस्तक परत दिले.

आता तिच्याशी बोलण्याचे काही कारणच उरले नव्हते, काही बहाणाच उरला नव्हता. पण, ती कोणत्या रस्त्याने कॉलेजला जाते? हे त्याने पाहूनच ठेवले होते. असेच एकदा, भावना असह्य झाल्यावर याने ठरवले "उद्या तिला प्रपोज करायचाच." सोहम दुसऱ्या दिवशी, चक्क सकाळी १० वाजताच उठला. तोपर्यंत तिची कॉलेजला निघायची वेळ झाली होती. याने बाहेर येऊन पाहिले. ती कॉलेजला निघाली सुद्धा होती. तिला जाताना पाहून सोहमने पटकन शर्ट घातला. भिंतीवरून उडी मारून, शॉर्ट-कट ने तिच्या रोजच्या रस्त्यावर जाऊन थांबला. मागून ती आली. याने तिला थांबवले आणि थेट म्हणाला "मला तू आवडतेस". तुझे काय उत्तर आहे?"

ती म्हणाली "मी विचार करून सांगते". सोहम परत घरी आला आणि स्वत:च्या कॉलेजला निघाला. पुढे, २-३ महिने, "ती हो म्हणेल की नाही?" या विचारातच त्याने तिचे उत्तर सुद्धा विचारले नाही.

असेच एक दिवस, हा कॉलेजच्या मित्रांसोबत शेजारच्या गणपती मंदिराजवळ बसला होता. तेवढ्यात ती दिसली. "आज तिचे उत्तर विचारूनच टाकू" असा विचार करून तो तिच्याकडे गेला. पुन्हा विचारले "तुझे काय उत्तर आहे".

ती म्हणाली, "तू जिथे मला प्रपोज केलेस, तिथेच उद्या येऊन मला उत्तर विचार."

मनात नाना शंका येत होत्या. "तिने घरी तर सांगितले नसेल ना?" अशी भीती वाटत होती.

पण, हिंमत करून, दुसऱ्या दिवशी पुन्हा सोहम १० वाजता उठला. या वेळेस चड्डीवरच पळत जाऊन तिला गाठले. पुन्हा विचारले "सांग, तुझे काय उत्तर आहे?"

चक्क ती "हो" म्हणाली. ती म्हणाली "चल फिरायला जाऊ".

सोहम म्हणाला "मी दातसुद्धा घासले नाहीत. आत्ताच उठलो आणि तू जाताना दिसलीस. म्हणून

चड्डीवरच पळत पळत आलो."

ती म्हणाली "असा कसा आहेस रे तू?"

"असाच आहे" सोहम म्हणाला.

ती सुद्धा, बहुदा लहानपणापासूनच एकटी रहात असल्यामुळे हो म्हणाली असावी.

दोघेही, फक्त एकदाच डेट वर गेले. गेले कुठे? तर चतु:श्रुंगीच्या डोंगरावर. इथेही काही सुत जुळले नसावे.

कालांतराने, तिला दूरच्या कोणत्यातरी कॉलेजमध्ये प्रवेश मिळाला. ही तिथल्याच हॉस्टेलवर रहायची. अधून मधून ती तिच्या घरी यायची. याला त्याच्यातून कधी तरी दिसायची. तेव्हा दोघे कधी तरी भेटायचे. याच्याकडे काही फोन वगैरे नसल्यामुळे, त्यांचे कधीही बोलणे सुद्धा झाले नाही. हा सुद्धा "पास कसे व्हायचे?" या चिंतेमध्ये होता. मग यालाही विसर पडला की "आपली कोणीतरी गर्ल-फ्रेंड आहे". मधेच यांचे काहीतरी बिनसले. आणि याची पहिली प्रेम कहाणी तिथेच संपली.

दरम्यान, हा पास व्हायच्या नवीन आयडिया शोधू लागला. "कशी तरी सेटिंग करून पास होता येईल का? किंवा, थोडे पैसे देऊन पास होता येईल का?" हे तो पाहू लागला. "पेपर आधीच मिळाला तर आपण पास होऊ" असे त्याला वाटू लागले.

पण ना पेपर मिळाला आणि ना काही सेटिंग झाली.

वर्गात, प्रश्नांची उत्तरे न देता आल्यामुळे नेहमी याचा अपमान होऊ लागला. याचा शिक्षणातला रस हळू हळू संपत चालला होता. यावेळेसही याने एकही चाचणी परीक्षा दिली नाही. अर्थातच, सगळ्या विषयांमध्ये २० पैकी ० मार्क्स. याचा विश्व-विक्रम अजूनच वाढला होता. नापास होणाऱ्या मुलांमधला हा "सचिन तेंडूलकर" झाला होता. पुढे कित्येक वर्ष याचे विक्रम मोडले जाणार नव्हते. १३ विषयात २० पैकी शून्य गुण होते.

अधे मध्ये हा सकारात्मक विचार करायचा "नापास झालो म्हणून काय? कित्येक मुले अशी असतील, जे शाळेत, कॉलेजमध्ये गेले सुद्धा नाहीत. पण त्यांने खूप पैसे कमावले." "आपण सुद्धा असेच काहीतरी करू. बाहेरूनच कॉमर्सची परीक्षा देऊ आणि मोठे होऊ."

त्याने विचार केला "डिप्लोमा काही आपल्याला जमणार नाही." आपण आत्ताच कमवायला सुरुवात करू. म्हणजे हळू हळू आपण ४-५ वर्षात मोठे होऊत." पण बहुतेक, याची कर्मच आडवी येत होती. देवाने अजून काय लिहिले होते? अजून आई-बाबांना काय दिवस दाखवायचे होते? ते माहिती नव्हते.

कॉलेजमध्ये, सगळयात वाया गेलेल्या मुलांपैकी हा एक झाला होता. चाचणी परीक्षांमध्ये २० पैकी ० गुण आणि तेही एक नाही, २ नाही तर १३ विषयांमध्ये.

पुन्हा सहामाही (दिवाळीच्या) परीक्षा आल्या. याने पुन्हा विचार केला "या वेळेस अभ्यास करू.". पण आज करू, उद्या करू, करता करता शेवटी परीक्षेचा दिवस उजाडला. याने पहिला पेपर दिलाच नाही.

पुन्हा विचार केला "दुसऱ्या पेपरचा, व्यवस्थित अभ्यास करू आणि पास होऊ.".

पुन्हा आज करू, उद्या करू, असे करून त्याने पुन्हा अभ्यास केला नाही. आणि परत दुसराही पेपर बुडवला. असे करत करत त्याने १३ चे १३ पेपर बुडवले. हा सुद्धा नवीन विश्व-विक्रम झाला होता. १३ विषयात अनुपस्थित आणि नापास. वाया जाण्याची सुद्धा काहीतरी सीमा असते. पण, सीमा, लिमिट वगैरे शब्द तर, सोहमच्या शब्दकोशातच नव्हते. देव प्रत्येक वेळेस संधी देत होता. आणि आमचा सोहम, त्या संधीची माती कशी करता येईल? याच्या नवीन नवीन आयडिया शोधत असायचा.

पण, सोहमची प्रतिमा जन-माणसात उजळवण्यासाठी, देव मात्र मनापासून साथ देत होता.

शेवटच्या पेपरच्या दिवशी, असाच तो कट्ट्यावर बसायला चालला होता. समोरून एक मुलगी येत होती. ती जवळ आली तसे याने ओळखले "अरे ही तर आपल्या इथेच राहते". हा कधीच तिच्याशी बोलला नव्हता. दोघांना एकमेकांची नावेही माहिती नव्हती. ती जवळ आली. तिने चेहऱ्याने काही तरी खाणाखुणा केल्या. तिच्या खुणांवरून याने अंदाज लावला "कोणीतरी मुलगा हिच्या मागे येत असावा". म्हणून हिने असे हाव-भाव केले असावेत"

याचा अंदाज खरा ठरला. ती मुलगी सोहमच्या बाजूने पुढे गेली. सोहम सुद्धा कट्ट्यावर पोचला. मागून एक मुलगा चालत येत होता. तो बहुतेक त्या मुलीलाच शोधत होता. सोहमने आधी विचार केला "कशाला भानगडीत पडायचे?" पण, नंतर काहीतरी विचार करून सोहमने त्या मुलाला जवळ बोलावले. त्याचे आय-कार्ड मागितले. तो मुलगा घाबरला आणि आय-कार्ड दाखवले. तो मुलगा सोहमच्याच कॉलेजचा

होता. सोहमने विचारले "काय रे कोणाला शोधत आहेस?"

तो मुलगा सुरूच झाला. त्याने सांगितले "अरे पुढे गेली ती आमच्या वर्गातली मुलगी. तिला मी आवडतो. मी तिला प्रपोज करणार होतो पण तू अडवलेस."

दरम्यान, त्या मुलाबरोबर बोलताना, त्या मुलीने लांबूनच सोहमला पाहिले होते. सोहमने कसेतरी समजावून त्या मुलाला परत पाठवले. नंतर कळाले की, त्या मुलाच्या मित्रांने, तिला प्रपोज करण्यासाठी त्याला पेटवून दिले होते.

सोहम हिरो ठरला होता. नंतर कोणीतरी सांगितले, "त्या मुलीला तू आवडत होतास."

दरम्यान पुन्हा सुट्ट्या लागल्या, संपल्यासुद्धा. आणि पुन्हा कॉलेज सुरु झाले. आधीचे १३ अधिक नवीन ६, असे एकूण मिळून १९ विषय सोडवायचे होते.

याला आता दोन नवीन मित्र मिळाले. "अक्षय आणि संकेत". हे दोघेही अष्टपैलू होते. अभ्यासात हुषार, खेळण्यात हुषार. संकेत चित्रकलेत, नृत्यात, बुद्धिबळात फार हुषार होता. तर अक्षय सुद्धा नृत्यात, क्रिकेटमध्ये, धावण्यात, लांब उडीमध्ये खूप हुषार. संकेत फार बडबडा होता तर, अक्षय एकदम शांत. पुढे, अक्षय कॉलेजच्या क्रिकेटच्या टीमचा कप्तान झाला.

संकेत नेहमी सोहमला "राज कपूर" म्हणायचा. कारण सोहम त्याच स्टाईल मध्ये भोळेपणाने बोलायचा.

पण, सोहम विचार करायचा "संकेत छान दिसतो, अक्षय सावळा असला, तरी त्याचे व्यक्तिमत्व कॉलेजमध्ये कोणाहीपेक्षा मस्त आहे. अक्षय कॉलेजचा कप्तान आहे. त्याला मित्रसुद्धा भरपूर आहेत. आपल्याला जास्त कोणी मित्र नाहीत. आपल्याला, अक्षय, संकेत, कुणाल आणि अमित सोडले तर कोणीही मित्र नाही."

संकेत आणि अक्षय ज्या सहजतेने मुलींशी बोलायचे. ते पाहून सोहमचा आत्मविश्वास अजूनच डळमळीत व्हायचा. "आपण घाणेरडे दिसतो" हा न्यूनगंड अजूनही मनातून गेला नव्हता. अधेमध्ये, स्वत:ला आत्मविश्वास देण्यासाठी हा बाबा, साधारण दिसणाऱ्या पण अगदी गोड बोलणाऱ्या मुलांचे उदाहरण स्वत:समोर ठेवू लागला. आणि तसेच, अतिशय गोड बोलायचा प्रयत्न करू लागला. "आपण चांगले दिसत नसलो म्हणून काय? आपण गोड बोलून सगळयांची मने जिंकू" असे त्याला वाटायचे. पण माणूस, जसा आहे तसाच व्यवस्थित असतो. बेडकाने बैल बनायचा प्रयत्न केला, तर, फुगून फुगून शेवटी तो फुटतच असतो.

दर चार महिन्याला सोहमला कोणीतरी वेगळीच मुलगी आवडायची. त्या मुलीला पटवण्यासाठी, हा बाबा आधी तिच्या मैत्रिणींसोबत मैत्री करायचा. तिच्याशी इतके गोड बोलायचा की विचारायलाच नको. तिच्या मैत्रिणींना हा कसा कोण जाणे, आपल्या बाजूला वळवून घ्यायचा. "माझे तुझ्या मैत्रिणीवर किती अतोनात प्रेम आहे" हे पटवून द्यायचा. त्या मुलीची मैत्रीण सुद्धा, तिच्या मैत्रिणीचे आणि सोहमचे प्रेम जुळावे म्हणून मनापासून प्रयत्न करायची. सोहमचे ८०% काम तर तिची मैत्रीणच करायची.

पुढे व्हायचे असे की, आवडणाऱ्या मुलीसोबत बोलायची वेळ आली रे आली, की याची सगळी हिंमत गुंडाळली जायची. आणि, खरा, भित्रा, लाजाळू, सोहम बाहेर पडायचा. गेले काही दिवस, आवडणाऱ्या मुलीच्या मैत्रिणीशी अगदी गोड बोलणारा सोहम, एकदमच शांत, अबोल आणि भित्रा होऊन जायचा.

आवडणारी मुलगी आणि तिची मैत्रीण समोर दिसली रे दिसली, की हा बाबा उलट्या दिशेने पळत सुटायचा. आणि त्या दूर जाईपर्यंत कुठेतरी लपून बसायचा. हा त्याला आवडणाऱ्या मुलीसोबत बोलूच शकायचा नाही. खोटे जास्त काळ टिकायचे नाही. सोहम नावाचा बेडूक, जो बैल बनायचा प्रयत्न करायचा, त्याचा खोट्याचा फुगा पटकन फुटून जायचा. खरा सोहम असा नव्हताच.

मैत्रिणीने सांगितलेला सोहम आणि खरा सोहम, यांच्यात जमीन-आसमानाचा फरक असायचा. यामुळे कॉलेजमध्ये भरपूर मुलींना वाटायचे "सोहम हे सगळे टाईम-पास म्हणूनच करतो आहे".

स्वत:चे नाव जमेल तेवढे बदनाम करायचे कसब मात्र सोहमला चांगलेच जमत होते.

पण, मजेची गोष्ट म्हणजे, "आधीच्या मुलीसोबत बोलायची आपल्यात हिंमत नाही. इथे आपले काही जुळणार नाही" असे समजून हा बाबा स्वत:चाच आत्मविश्वास कमी करायचा. आधीची मुलगी दुसऱ्या वर्गात गेली, किंवा कॉलेजमधून शिक्षण संपवून बाहेर पडली, की चार महिन्यांने हा बाबा नवीनच मुलीवर प्रेम करू लागायचा. पुन्हा नवीन मुलीच्या मैत्रिणीशी मैत्री करायचा, आणि......आधी घडल्याप्रमाणेच सगळे घडायचे.

(सोहमच्या या प्रेम-प्रकरणांमुळे पुढे तो चांगलाच गोत्यात येणार होता. जर याची वर लिहिलेली अजून ३-४ प्रेम-प्रकरणे यशस्वी झाली असती, तर सोहम आज जिवंत दिसला नसता).

ही सगळी प्रेम-प्रकरण ठीक होती पण, अभ्यासाचे काय? सगळे मित्र, बाकी गोष्टी करून सुद्धा पास व्हायचे. आणि सोहम फक्त बाकीच्या गोष्टीच करायचा. पास होणे त्याला माहितीच नव्हते.

हळू हळू यांचा ग्रुप मोठा होऊ लागला. नृत्य- स्पर्धा, खेळणे अशा विषयात यांचे नाव होऊ लागले. अर्थातच अक्षय आणि संकेतचे नाव मोठे होते. सोहमला फार वाईट वाटायचे "हे मोठे आहेत, आपल्यापेक्षा चांगला डान्स करतात". यांच्याबरोबर डान्स केला, तर आपल्याकडे कोणाचेही लक्ष जात नाही.

नेहमीप्रमाणे, शाळेचे वार्षिक स्नेह-संमेलन जवळ आले होते. सोहमला माहिती होते "जर आपण अक्षय आणि संकेत बरोबर डान्स केला, तर शेवटच्या रांगेत थांबावे लागेल.". त्यापेक्षा, आपण आपलाच नवीन डान्स ग्रुप काढू. म्हणजे आपल्याला पुढच्या रांगेत डान्स करायला मिळेल. तसेच, कॉलेजमध्ये आपल्यासारखीच काही मुले आहेत. आणि अशीही काही मुले आहेत, ज्यांचे शेवटचे वर्ष आहे. पण, कधीही स्टेज वर गेली नाहीत. अजूनही काही मुले आहेत, ज्यांना डान्स करायची इच्छा आहे, पण डान्स करता येत नाही. तर अश्या मुलांना घेऊन आपण आपलाच डान्स बसवू."

इथेही या बाबाचे एक तत्वज्ञान होते. "वाघांच्या कळपातला एक वाघ बनून रहाण्यापेक्षा, मेंढरांच्या कळपाचा राजा बनावे."

याने अशी मागच्या बाकावर बसणारी, फार काही हुषार नसणारी, कधीही स्टेजवर न गेलेली मुले गोळा केली आणि काहीतरी डान्स बसवला. यांचा डान्स पूर्णपणे फ्लॉप झाला. पण, भरपूर मुलांना स्टेजवर जाण्याची संधी मिळाली. अक्षय आणि संकेतचा अर्थातच दुसरा नंबर आला.

अक्षयची टीम क्रिकेटमध्ये जिंकली, तर सोहमची टीम व्हॉलिबॉलमध्ये जिंकली.

अक्षय आणि संकेतबरोबर रात्रभर भटकणे. अक्षयच्या घरी सिनेमा पाहायला जाणे. अण्णाच्या गाडीवर एकच मिसळ घेऊन, तिघांने १२-१५ पाव घेऊन खाणे. सिंगल वडा सांबर बरोबर १४-१५ पाव संपवणे. थियेटर मध्ये जाऊन सिनेमे पाहणे, लांब लांब सहलीला जाणे. अक्षयच्या गाडीवर, ट्रिपल सीट बसून रात्रभर भटकणे सुरु झाले होते. आता, मैत्री काय असते? हे हळू हळू समजू लागले होते. अक्षय श्रीमंत आणि दिलदार होता. नेहमी, सगळया मित्रांसाठी पैसे खर्च करण्यात त्याचा हात पुढे होता.

अक्षय आणि संकेतच्या भरपूर मैत्रिणी होत्या. सोहमची एकही नव्हती. अक्षय आणि संकेत मुलींशी ज्या सहजतेने बोलू शकायचे, तसे सोहमला जमायचे नाही. मनातून फार वाईट वाटायचे. सोहम विचार करायचा "मला बोलता का येत नाही? आणि मी बोललो तर, चुकीचेच काहीतरी बोलतो". आत्मविश्वास अजूनच कमी होऊ लागला होता. सोहम आत्मविश्वासाने मुलींसोबत बोलायचा. पण, त्याने स्वत:चीच छबी स्वत:च्याच मनात उभी केली होती. त्याला न्यूनगंड व्हायचा.

स्नेह-संमेलनाचे दिवस सरले. सबमिशन आणि परीक्षेचे दिवस जवळ आले होते.

दुसऱ्या वर्षात, अधिकचे विषय मिळूनही सोहमने मिळालेल्या संधीची माती केली. आधीचे १३ विषय आणि नवीन ६ विषय. असे एकूण १९ विषय सोडवायचे होते. या सगळया, १९ पैकी १९ विषयात, सोहमने २० पैकी ० गुण मिळवले होते.

यामुळे, सोहम आता अशा विहिरीत पडला होता जिथून आकाश दिसणे तर सोडाच, आकाश कसे दिसत असेल? याचा अंदाजही करणे अवघड वाटू लागले होते.

अजूनही, अभ्यास कसा करावा ते समजत नव्हते. सबमिशन तर संपवले. पण अभ्यास कसा करणार? पुन्हा पहिले पाढे पंचावन्न. पुन्हा याने १९ चे १९ पेपर बुडवले. आयुष्यात पहिल्यांदाच सोहमचे वर्ष वाया गेले होते. पहिल्यांदाच, सोहम एक वर्ष घरी बसणार होता.

याने आता विचार केला "हे वर्ष वाया गेले म्हणजे घरचे गुपचूप मला कॉमर्सला प्रवेश घेऊ देतील."

१९ विषयात नापास होण्याचा पराक्रम काही कमी नव्हता. आजूबाजूला हुषार मुले असतील, तर नापास होण्याचे दु:ख जास्त होत असते. पण, सोहम १९ विषयांत नापास होऊनही घरचे काही ऐकायलाच तयार नव्हते. डिप्लोमा पूर्ण करावाच लागणार होता.

आता घरी अजून एक पंचाईत होती. याने डिप्लोमाला प्रवेश घेतल्यापासून, कॉलनीमधल्या भरपूर लोकांना वाटू लागले "आपल्यासुद्धा मुलांना डिप्लोमाला प्रवेश घेऊन द्यावा". असेच, कॉलनीमधल्या एका मुलाने सोहमच्याच कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. आई सोहमला म्हणाली "हे बघ सोहम, तू तर आता नापास झालाच आहेस. तुझे कमीतकमी एक वर्ष वाया गेलेच आहे." पण, तू घरी दिसलास तर सगळयांना कळेल, की तू नापास झाला आहेस." त्या पेक्षा तू कॉलेजलाच जात जा. म्हणजे शेजारच्या राजूला कळणार नाही.

आता कॉलेजला पूर्णवेळ जाता येत नव्हते. एवढा वेळ टाईम पास कसा करायचा? तर, अधे मध्ये हा इंटरनेटवर जाऊन चॅटिंग करू लागला. चॅटिंग करता करता याने अजून एक मैत्रीण मिळवली. ती ओरिसाची राहणारी होती. पुण्यात शिक्षणासाठी आली होती. तसे, दोघे फक्त एकदाच भेटले होते इंटरनेटवर. नंतर, "ती आज येईल उद्या येईल" असे समजून सोहम रोज इंटरनेटवर जात राहिला. पण, तिची पुन्हा भेट झाली ती थेट दोन महिन्यांने.

यावेळी, तिने थेट स्वत:चा मोबाईल नंबर दिला. याला थेट भेटायलाच बोलावले. सोहमचा मोबाईल नंबर सुद्धा मागितला. पण सोहमकडे काही मोबाईल नव्हता. आणि, "माझ्याकडे मोबाईल नाही" हे सांगायला लाज वाटत होती. शेवटी याने अक्षयचा नंबर तिला दिला. आता अक्षयला नवीन काम लागले होते - तिचा फोन आला, की सोहमला तिचा निरोप सांगायचे. अक्षय सुद्धा हे निरोप देण्याचे काम करून करून कंटाळला असेल. ती कधीही सोहमला फोन करायची. पण नंबर अक्षयचा असल्याने, रात्री अपरात्री अक्षयला त्रास व्हायचा. पण, मैत्रीखातर अक्षय हे सहन करत राहिला.

शेवटी एकदाची, सोहमची आणि त्याच्या नव्या मैत्रिणीची भेट ठरली. भेटायचे होते कोथरूडच्या दशभुजा गणपती मंदिरात. जास्त काही नाही, पण सोहम फक्त दुसरयांदच कोणत्यातरी मुलीसोबत डेटवर

गेला होता. कॉफीशॉपमध्ये जाऊन, कॉफी पिऊन होईपर्यंत रात्रीचे १० वाजले. दोघेही आपापल्या घरी गेले. पुन्हा कधीही, ना सोहमने तिला फोन केला, ना तिने सोहमला. असे एकाच डेटनंतर, अजून एक सो कॉल्ड प्रेम प्रकरण संपले होते.

पण, नापास झाल्यामुळे याचा आत्मविश्वास पुन्हा डळमळीत होऊ लागला होता. अगदी आत्महत्या करण्यापर्यंत हा विचार करू लागला होता. हा विचार करायचा "आपण काहीच कामाचे नाहीत". "ना आपण घराला काही हातभार लावू शकलो. आणि ना शिक्षणात काही करू शकलो". "सगळी बरोबरची मुले पुढे गेली आहेत. आपण सगळयात मागे पडलो आहोत". असेही, आपण आत्तापर्यंत सगळयांना खूपच त्रास दिला आहे". जर आपण आत्महत्या केली, तर हा शेवटचा त्रास असेल. आणि एकदाच सगळे रडून घेतील माझ्यासाठी. नंतर नाही रडायला लागणार".

पण, "आज आत्महत्या करू, उद्या आत्महत्या करू" असे करत करत हा जगला.

कालांतराने निकाल लागला. आणि, सोहमच्या होत्या नव्हत्या इज्जतीचे धिंडवडे निघाले क्लासमध्ये.

सोहमबरोबर शाळेत शिकणारी मुले दरम्यान खूप पुढे गेली होती. कोणी डिप्लोमा करत होते. कोणी इंजिनीअरिंग करत होते. कोणी कॉमर्स, कोणी सायन्स. कोणी कोणी तर, शिक्षण संपवून काम-धंद्याला सुद्धा लागले होते. जी मुले पहिल्या वर्षी सोहम बरोबर शिकत होती, त्यांना आता शेवटच्या वर्षात, मोठ्या कंपन्यांमध्ये नोकरी सुद्धा मिळाली होती.

सोहमचा भाऊ सुद्धा, १२वी पास होऊन कम्प्युटर मध्ये पुढचे शिक्षण घेत होता.

सोहमने पुन्हा मनाला समजावले "नेहमी आपल्यापेक्षा छोट्या माणसाकडे पहावे. म्हणजे, आपण छोटे असण्याचे दुःख नाही होत." साल्याची फिलॉसॉफी पण भारीच होती.

हा कॉलेजला जात होता. पण वर्गात बसता येत नव्हते. याच्या फिलॉसॉफी प्रमाणेच, याचे एक वर्ष वाया गेले होते म्हणून, याने दोन वर्षे वाया गेलेल्या मित्रांची संगत निवडली. आता हे सगळे मित्र, अगदी सोहमसुद्धा, स्वतःला हुषार समजायचे आणि बाकीच्यांना मठ्ठ.

या काळात याला होत्या नव्हत्या त्या भरपूर वाईट सवयी लागल्या. हा पुन्हा जास्तच वाया जाण्याच्या मार्गावर जाऊ लागला. आधी देवाला मानणारा सोहम, आता म्हणू लागला "देवाने काय दिले? देव

नसतोच". असलाच, तरीही त्याने माझ्यासाठी काहीही केले नाही. मग मी त्याला का मानू?" कधी काळी आस्तिक असणारा सोहम आता पूर्णपणे नास्तिक झाला होता. कधीतरी मित्रांबरोबर मंदिरात जाणे झाले, तरीही हा मनापासून देवाच्या पाया नाही पडायचा. देवाचा आणि सोहमचा ३६ चा आकडा झाला होता. देवाचे नाव काढले की सोहमला राग येऊ लागला होता.

भरीस भर म्हणून, कॉलनीमधले वयाने मोठे असणारे काही मित्र, कॉलेजमधले काही मित्र, त्यांनी पटवलेल्या मुलींचे किस्से सांगायचे. त्यांची सगळी कहाणी सांगायचे. कोणी मोठा मित्र "त्याने कसे दुसऱ्याच्या बायकोला पटवले" हे सांगायचा. कोणी ब्लू-फिल्म दाखवायचे. सोहमला सुद्धा हळू हळू या गोष्टी आवडू लागल्या होत्या. ब्लू-फिल्म्स मध्ये पाहून, कामोत्तेजक मासिकांमध्ये वाचून, सोहमलासुद्धा आता कोणाचीतरी बायको पटवाविशी वाटू लागली होती. त्या खोट्या, फक्त कामोत्तेजना वाढवण्यासाठी लिहिलेल्या गोष्टी याला खऱ्या वाटायच्या. आणि तसेच करावेसे वाटायचे. नशीब, त्याच्यात तेवढी हिंमत नव्हती. नाहीतर, नक्कीच चपलेने मार पडला असता. (माणसाला मनावर ताबा ठेवायला जमायला हवे, नाहीतर आयुष्य बरंबाद व्हायला वेळ लागत नाही. पण, सोहमला हे सगळ कळायला अजून वेळ होता.)

दरम्यान, हा नापास झाला होता तरी त्याच कॉलेजमध्ये होता. म्हणून, याची निवड कॉलेजच्या व्हॉलीबॉलच्या टीम मध्ये झाली. नेमके याच वर्षी यांचे कॉलेज जिल्हा पातळीवर जिंकून आले.

पुन्हा परीक्षा जवळ आल्या. आधी "कॉपी करणार नाही" असे म्हणणारा सोहम, आता कॉपीसुद्धा करायला तयार झाला होता. पण, अमितने आणि कुणालने "अभ्यास कसा करावा?" हे शिकवले. याने अभ्यासक्रम गोळा केला. कुणाल आणि अमितने शिकवल्याप्रमाणे अभ्यास सुरु केला. एक सांगायचे म्हणजे, अमित आणि कुणालसुद्धा, अभ्यास करूनही नापास झाले होते. आता त्या तिघांना एकमेकाचीच साथ उरली होती.

सोहमने विचार करून विषयांची यादी जमवली "कोणते विषय सोपे वाटतात? कोणते अवघड आहेत?" हे त्याने समजून घेतले. मग त्याने ठरवले "दोन वर्षात, गणिताचे तीन विषय आहेत. ते सगळ्यात अवघड आहेत. तिथे पास होणे सध्यातरी शक्य नाही". मग त्याने सोपे विषय निवडले आणि अभ्यास सुरु केला.

इंजिनिअरिंगमध्ये अभ्यासक्रमाला फार महत्व असते. अभ्यासक्रमातच, कोणते प्रश्न विचारले जातील? याचा अंदाज येतो. फापट पसारा वाचत बसले की नापास होणे ठरलेलेच असते. फक्त अभ्यासक्रम पाहून "एका युनिटमध्ये फक्त ३-४च वेगळे वेगळे प्रश्न विचारले जाऊ शकतात" हे समजते. ते ३-४ प्रश्न सोडवले की पास होता येते. एका विषयात सहा युनिट असतात. प्रत्येक युनिटमध्ये प्रत्येकी १६ गुण. तीन

युनिट जरी व्यवस्थित सोडवले, तरी पास होता येते. अश्याप्रकारे, देवाने कुठून तरी आशेचा किरण दाखवला होता.

दरम्यान, का कोण जाणे? पण इंटरनेटवर चॅटिंग करताना, मुली स्वत:हून याला आपला मोबाईल नंबर द्यायच्या. पण, ना मुलींच्या बाजूने प्रकरण पुढे वाढायचे ना सोहमच्या बाजूने. असेही, सोहमकडे स्वत:चा मोबाईल नव्हता. मुली त्याला फोन तरी कसा करणार? दर वेळेस अक्षयला त्रास देणे बरे नव्हते वाटत.

(सोहमच्या या प्रेम-प्रकरणांमुळे, पुढे तो चांगलाच गोत्यात येणार होता. जर, चॅटिंगची अजून ४-५ प्रकरणे यशस्वी झाली असती, तर सोहम आज जिवंत दिसला नसता. म्हणूनच देवाने, अजूनपर्यंत त्याला स्वत:चा मोबाईल दिला नसावा).

असो, तर सोहमच्या विचारांनुसार, सोहमचे एकही प्रेम प्रकरण आत्तापर्यंत यशस्वी झाले नव्हते. पण, "आपली प्रेम कहाणी साधीसुधी नसावी. अतिशय रोमॅन्टिक असावी" असे मनापासून वाटत होते. अशी कहाणी पुढे घडणारच आहे.

दिवाळीच्या परीक्षा सुरु झाल्या. एक एक करत परीक्षा संपली. निकाल लागला. एकाच झटक्यात, सोहम १९ पैकी ७ विषयात पास झाला. त्याला थोडासा हुरूप आला. एक गणिताचा विषय सुद्धा निघाला कसातरी. याला वाटले "तसे पास होणे अवघड नाही. आपण पास होऊ शकतो". त्याला सहा महिन्यांने अजून एक संधी मिळणार होती. हा परीक्षा येईपर्यंत थांबला. शेवटच्या १० दिवसात अभ्यास सुरु केला.

परीक्षा सुरु झाली. हा एक एक करून पेपर देत होता. असाच एक पेपर देऊन येत असताना त्याला आदिती भेटली. ती शेवटच्या वर्षाला शिकत होती. तसे ती सोहम बरोबरच पहिल्या वर्षात एकत्र शिकत होती. पण, सोहम नापास झाला आणि मागे पडला. आणि ती पास होऊन पुढे गेली.

याने पेपर दिला आणि निघालाच होता. तेवढ्यात आदिती भेटली आणि दोघे एकत्र जाऊ लागले.

हे दोघे चालले होते तेव्हा, रस्त्यात गेटपाशी अरुंद जागेत, कॉलेजमध्येच शिकणारी ७-८ मुले जागा अडवून उभी होती. आधीच जागा फार अरुंद होती. इतकी अरुंद होती, की कसाबसा एकच माणूस त्या जागेतून जाऊ शकेल. त्यातही ही मुले अर्ध्या जागेत उभी होती. आदिती सोहमच्या पुढे चालली होती. गेट अडवून थांबलेल्या मुलाने आदितीला गेटपाशी येताना पाहिले होते. त्याने मुद्दामहूनच तिच्या छातीला कोपर मारले. सोहमने हे पाहिले होते. सोहमला काही हे आवडले नाही. सोहमने त्याला विचारले "का रे धक्का मारलास?" हे पाहून आदितीला सुद्धा राग आला. ती सुद्धा त्या मुलाला बोलू लागली.

तो मुलगा, सोहमला आईवरून शिव्याच देऊ लागला. त्याने सोहमला एक कानफाटात लगावण्याचा प्रयत्न केला. पण, सोहम खाली वाकला आणि वाचला. सोहमने सुद्धा पालटून त्याला मारण्याचा प्रयत्न केला. पण, तो मुलगा सोहमपेक्षा फार तगडा असल्यामुळे, सोहमने मारलेला फटका त्या मुलापर्यंत पोचूच शकला नाही. तेवढ्याच, त्या मुलाच्या मित्राने सोहमला ढकलून दिले. सोहम सावरतच होता, की आधीच्या मुलाने आदितीच्या कानफाटात लगावली. सोहमने ते पाहिले. पण तेवढ्यात, कोणीतरी सोहमला सुद्धा कानफाटात लगावली. सोहमला वाटले "आता मेलोच". आता काही वाचणे शक्य नाही".

भांडण, मारामारी करायची सवय नसल्यामुळे अंग थरथरू लागले होते. घसा कोरडा पडला होता. अचानकच अंगातले सगळे त्राणच निघून गेल्यासारखे वाटत होते.

कसेतरी अंगात बळ आणून सोहमने ओरडायला सुरुवात केली. "प्रिन्सिपलना बोलवा. प्रिन्सिपलना बोलवा." आरडा ओरडा ऐकून, सगळे शिपाई धावत आले. हे पाहून ती सगळी मुलेसुद्धा घाबरली. सोहमला म्हणू लागली "तुझ्या पाया पडतो, पण पुढे हे प्रकरण वाढवू नकोस". पण सोहमसुद्धा चिडला होता. सोहम आदितीला घेऊन डोंगरे सरांकडे गेला.

सरांने विचारले "नावे काय त्यांची?" सोहमला नावे माहिती नव्हती. पण, मनातून सोहमसुद्धा घाबरलाच होता. आदिती तर सारखी रडतच होती. पुढे सोहम तिला म्हणाला "चल पोलिसात जाऊ". पण, ती एका प्रतिष्ठित राजकारण्याची मुलगी असल्यामुळे तिला बंधन होते. पुढे हे प्रकरण वाढले नाही.

दोनच मिनिटात, एवढा सगळा गोंधळ सोहमच्या आयुष्यात झाला होता. त्या दोन मिनिटात कशी कुठून जाणे? देवाने सोहमला ओरडण्याची बुद्धी दिली. आणि तो, आदितीला आणि तिच्यासारख्याच काही मुलींना होणाऱ्या नेहमीच्या मोठ्या त्रासापासून वाचवू शकला. असेही ती सगळी मुले, नेहमीच कॉलेजमधल्या मुलींची छेड काढण्यासाठी प्रसिद्ध होती. पुढे ती मुलेसुद्धा झालेल्या प्रकारामुळे शरमली आणि त्यांना आपली चूक समजून आली.

हा प्रकार घडला नसता तर, कदाचित त्या मुलांची हिंमत अजूनच वाढली असती. त्यांने, अजूनच विचित्र प्रकार सुरु केले असते.

कदाचित, पुढे कोणीतरी इतर मुलगी त्यांच्या तावडीत सापडली असती. किंवा ती मुले संकटात सापडली असती. आणि त्यांचे आयुष्य बरंबाद झाले असते.

असो, देवाने पुन्हा एकदा सोहमची प्रतिमा उजळवली होती.

तर, सोहमची परीक्षा सुद्धा संपली. काही दिवसांने निकाल लागला. त्याने १२ पैकी अजून ५ विषय सोडवले. म्हणजे आता शेवटच्या वर्षाला प्रवेश मिळू शकणार होता. पण, एका वर्षात फक्त १० विषयच घेऊ शकण्याचा नियम पुन्हा आला होता. बहुतेक, सोहमच्या विश्व-विक्रमामुळेच हा नियम परत आला असावा. शेवटच्या वर्षात, एकूण मिळून ८ विषय आणि एक प्रोजेक्ट होता. आधीचे ७ विषय आणि नवीन ९ विषय. म्हणजे १६ विषय सोडवायचे बाकी होते. पण, एका वर्षात १० विषयच घेता येणार होते. अजून एक वर्ष वाया जाणार होते.

शेवटच्या वर्षात असणारे ३ सोप्पे विषय याने निवडले. हे विषय इतरांना अवघड वाटायचे. "हे ३ विषय विना अभ्यास करताही पास होता येतील" असे त्याला वाटत होते. तसेही, झाले असे की, अभ्यासक्रम मिळाल्यापासून आणि कळल्यापासून, याला अभ्यास करण्याची नवीनच आयडिया मिळाली होती. सोहम इतका तरबेज झाला होता, की परीक्षेत कोणते प्रश्न विचारले जाणार आहेत? हा त्याचा ८०% अंदाज खरा व्हायचा.

याने शेवटच्या वर्षी सुरुवातीपासूनच अभ्यास सुरु केला. चाचणी परीक्षांचे महत्व याला आता कळाले होते. सगळ्या चाचणी परीक्षांमध्ये २० पैकी १५ पेक्षा जास्त गुण मिळवले. या मुळे पास होण्याची शक्यता वाढणार होती.

या वेळेस वर्गात याला दुय्यम न समजणारी मुले होती. यांच्या मध्ये हा मस्तपैकी रुळला होता. सतीश डॉन, रोहित, अमोल, सचिन, हसन, दीपक असे मस्त जीवाला जीव देणारे मित्र मिळाले सोहमला.

तसेच आदितीसाठी, एका मोठ्या राजकारण्याच्या मुलीसाठी ७-८ मुलांशी भांडल्यामुळे, कॉलेजमध्ये, शिक्षकांमध्ये याची प्रतिमा उजळली होती. आता ज्यांना हे प्रकरण माहिती होते, ते याच्याकडे आदराने पाहू लागले होते.

तसेही हा दुसऱ्या वर्षात असताना, यांच्या ग्रुपमध्ये असणाऱ्या एका मुलीला कॉलेजमध्ये एकाने छेडले. तेव्हा, सोहमने त्या मुलाला हॉस्टेल वरून उचलून आणून माफी मागायला लावली होती. एकाला तर याने, ग्रुपमधल्या मुलीचा हात पकडल्यामुळे हॉस्टेलवर जाऊन धुतले होते.

एकदा तर, कॉलेजमधली एक मुलगी सबमिशन करताना विचित्र अवस्थेत बसली होती. ती विचित्रपणे बसल्यामुळे, समोर बसलेल्या मुलांना तिच्या शरीराचा ओढणीमागचा, छातीचा भाग स्पष्टपणे दिसत होता. सगळी मुले मजा घेत घेत तिच्याकडे विचित्र नजरेने पहात होती. हे सोहमने पाहिले.

सोहम थेट त्या मुलीकडे जाऊन तिला म्हणाला "जरा नीट बसता येत नाही का?" अंगप्रदर्शन करायला कॉलेजमध्ये आला आहात का?"

पुढे, ती सुद्धा त्याची दिवाणी झालीच होती.

दरम्यान, पुन्हा एकदा सोहम प्रेमात पडला. पुन्हा एकदा आवडणाऱ्या मुलीच्या मैत्रिणींना समजावले. या वेळेस, आवडणाऱ्या मुलीला प्रपोजसुद्धा केला. प्रपोज कुठे केला असेल माहितीये? गर्ल्स हॉस्टेल समोरच्या चहाच्या गाडीवर. कुठे, कधी, कसे आणि काय बोलायचे? हे सोहमला माहितीच नव्हते. चान्स मिळाला रे मिळाला, की हा सुरु होऊन जायचा.

याचे म्हणजे थेट असायचे "मला तुझ्याशी लग्न करायचे आहे", तुझे काय म्हणणे आहे?" ती म्हणाली "आपण उद्या कॉलेजमध्ये भेटून बोलू".

सोहमचा तो उद्या, कधीच उजाडला नाही. काल असणारी हिंमत आज कुठे गायब झाली? देवच जाणे.

त्या मुलीला आधीच बॉय-फ्रेंड होता. हे नंतर समजले आणि सोहम वाचला.

असो, पुन्हा परीक्षा आल्या. याने फक्त एकच पेपर बुडवला. खरेतर, तो पेपर दिला असता तर याला नक्कीच ६० पेक्षा जास्त गुण मिळाले असते. पण, याला माहिती होते की "या वेळेस जे सर पेपर तपासणार आहेत ते फार कडकपणे पेपर तपासतात. आणि अर्थातच, कमी गुण देतात. पुढे, नोकरी मिळण्यासाठी शेवटच्या वर्षाचे गुण बघितले जातात." म्हणून याने "पुढच्या वेळेस चांगले गुण मिळवता येतील" म्हणून तो पेपरच दिला नाही.

तर असे याने, पूर्वीच्या ७ विषयांपैकी ५ सोडवले आणि २ च शिल्लक राहिले. नवीन विषयांत याने चांगले गुण मिळवले. नापास झालेल्या १९ विषयांपैकी १७ विषय, अधिक ३ नवीन विषय याने गेल्या तीन प्रयत्नात सोडवले होते.

असे असले तरी, शेवटच्या वर्षीचे, दुसऱ्या सहामाहीचे, अजून ३ विषय आणि एक प्रोजेक्ट काही मिळणार नव्हता. त्यामुळे अजून एक वर्ष वाया जाणार होते. "आता हे विषय मिळण्यासाठी काय करायचे? वर्ष कसे वाचवायचे?" याचा विचार तो करू लागला. याला कळले "पार्ट-टाईम डिप्लोमाला हे विषय याच सत्रात आहेत". म्हणजे, पार्ट-टाईमला सुद्धा कॉलेज करून, हे विषय मिळवून वर्ष वाचवता येईल. पण डोंगरे सर ऐकतील का? हे विषय देतील का?

हा पुन्हा डोंगरे सरांकडे गेला आणि म्हणाला "सर मला राहिलेले ३ विषय पार्ट-टाईम द्या". सर म्हणाले "पालकांना घेऊन यायला लागेल, तरच मी हे विषय तुला देईन".

सोहमने घरी सांगितले. घरीसुद्धा हळू हळू सोहम बद्दल विश्वास वाढत होता. आई कॉलेजमध्ये आली. सोहमने पुन्हा अधिकचे विषय मिळण्यासाठी पत्र लिहून दिले. सोहमला उर्वरित ३ विषय मिळाले. डोंगरे सरांना सगळी मुले देव-माणूस का म्हणायची? हे सोहमलासुद्धा कळाले.

पण, अजून एक अडचण होतीच की. सगळया मुलांचे प्रोजेक्टचे ग्रुप ठरले होते. सोहमला कोणीही पार्टनर उरला नव्हता. शेवटी याने ठरवले "आपण एकट्यानेच प्रोजेक्ट पूर्ण करायचा". याने एकट्यानेच प्रोजेक्ट मिळवला.

दरम्यान, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सोहम १० वीत असताना त्यांने स्वत:चे घर घेतले होते. गेली ५-६ वर्ष ते घर भाड्याने दिले होते. पण, बिल्डींग बांधणारा बिल्डर फारच तापदायक होता. घर त्याला विकावे म्हणून, विजेचे, पाण्याचे कनेक्शन तोडणे, पाण्याचा पाईप तोडून टाकणे, असे प्रकार त्याने सुरु केले. गेल्या पाच वर्षात, इमारतीचे बांधकाम सुद्धा त्याने पूर्ण केले नव्हते. बिल्डींग बांधताना जसे विटांचे बांधकाम सुरुवातीला दिसते. अगदी तसेच, ते पाच वर्षांनेसुद्धा दिसत होते. बिल्डींग पूर्ण केल्याचा दाखला सुद्धा मिळत नव्हता.

शेवटी आईने बिल्डरविरुद्ध कोर्टात केस केली. आईच्या डोक्याचा ताप अजूनच वाढला होता. हे राहायचे खडकीला आणि कोर्ट होते पिंपरीला. गेली चार-पाच वर्ष आईने फार मानसिक त्रास सहन केला होता. कोर्टाच्या तारखेला एकटीच जायची. बिल्डर यायचाच नाही. दर वेळेस पुढची तारीख मिळत होती. सकाळी उठायचे. देव पूजा करायची. बाबांचा, सोहमचा, त्याच्या भावाचा डब्बा भरून सगळयांना कामाला, कॉलेजला पाठवायचे. नंतर कोर्टात जायचे. एवढे करून आई दर वेळेस कोर्टात जायची. दर वेळेस निराश होऊन परत यायची.

अशातच एका भल्या ख्रिश्चन व्यक्तीने, सोहमच्या आईसमोर ते घर विकत घेण्याचा प्रस्ताव मांडला. आईने सुद्धा जास्त विचार न करता, त्या बिल्डरमुळे होणाऱ्या त्रासाला कंटाळून, ज्या किंमतीला घर घेतले त्यापेक्षा कमी किंमतीला ते विकले. घर १,८०,००० रुपयांना घेतले होते आणि, १,६०,००० रुपयांना विकावे लागले होते. पण, विकत घेणारी व्यक्ती फारच चांगली होती. कागदपत्रांवर सही करण्याअगोदरच, घराचे सगळे पैसे आईवर विश्वास ठेऊन त्यांने देऊन सुद्धा टाकले.

दरम्यान, सोहमच्या कॉलेजमध्ये पुन्हा वार्षिक स्नेह-संमेलन जवळ आले. या वेळेस सुद्धा सोहमने अशी मुले निवडली, ज्यांना स्टेजवर काहीतरी करण्याची इच्छा होती. पण घाबरत होती. याने पुन्हा डान्स

बसवला. या वेळेस, त्यांचा दुसरा नंबर आला. "प्रयत्नांती परमेश्वर". तसेच, व्हॉलिबॉलमध्ये सुद्धा यांची टीम जिंकली.

तसेच, एका मुलीने याला पटवले आणि याचे अजून एक प्रेम-प्रकरण सुरु झाले. तिने याला पटवले, म्हणून प्रेम-प्रकरण जुळले बरं का. या बाबाला तर जमलेच नसते. हा त्या काळात बसने कॉलेजला जायचा. त्याच बसने इतर कॉलेजच्या मुलीसुद्धा ये-जा करायच्या. तर, सोहमला पटवणारी मुलगी म्हणजे त्यापैकीच एक. बस मध्ये येता जाता दोघे भेटायचे.

पण काही दिवसांने, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, यांचे स्वत:चे जुने घर यांने याच काळात विकले होते. त्याचे दीड लाख रुपये जवळ आले. त्यामध्ये सोहमने ४० हजारांची एक दुचाकी विकत घेतली. याचे बसने जाणे बंद झाले. अश्या प्रकारे, याचे अजून एक प्रेम-प्रकरण ३-४ भेटींमध्येच संपले होते. बहुतेक, प्रेम वगैरे करणे हा सोहमचा पिंडच नव्हता. असेही तो नेहमी "पास कसे व्हायचे?" याच चिंतेत असायचा. त्यात प्रेम कोण करणार? पण, सोहमला हे सगळे समजायला अजून पुष्कळ अवकाश आहे.

सोहमच्या भावाला सुद्धा एक दुचाकी मिळाली.

त्याच वर्षी, यांच्या पुण्यातल्या छोट्याश्या वाड्याचेसुद्धा बांधकाम करून घेण्याचा विचार सुरु झाला. अर्थातच, सोहमचे कुटुंब तिकडे रहात नव्हते. पण, आजोबा आणि आज्जी स्वर्गवासी झाल्यामुळे हक्क मुलांमध्ये वाटून मिळणार होता.

(आजच्या तारखेला, हे लिहित असताना, एव्हाना गणपती विसर्जन होऊन पितर पंधरवडा सुरु झाला होता. अचानकच सोहमला त्याच्या आज्जी-आजोबांची (वडिलांचे आई-वडील) आठवण झाली.

आज्जीला तिच्या शेवटच्या काळात घशाचा कर्करोग झाला होता. हॉस्पिटलमध्ये असताना तिचे बोलणेच बंद झाले होते. तिच्या घशाला कृत्रिम शिट्टी बसवावी लागली होती. घशातून घरर्र घरर्र असा आवाज येऊ लागला होता. जेव्हा सोहमची आई, हॉस्पिटलमध्ये आज्जीला भेटण्यासाठी गेली. तेव्हा, तोंडाने बोलता येत नसले तरीही आज्जीची नजर भरपूर काही सांगून गेली. आईला भरपूर गोंजारून, मायेने तोंडावरून हात फिरवून, अश्रूंने भरलेल्या डोळयांने, जणू काही आज्जी आईला आशीर्वाद देऊन म्हणत होती "मुली, माझे चुकले. तुला दूर करायला नको होते. तुला पुण्यात राहू द्यायला हवे होते".

आजोबा तर प्राण सोडण्यापूर्वी आईला म्हणाले "मुली, तुझ्या वडिलांने, जसे तुझे लग्न झाले तसे मुलगी आमच्याकडेच सोपवून टाकली. कधीही तुझ्या संसारात, आमच्या घरात ढवळाढवळ केली नाही. तुझे वडील देव माणूस होते. मी जेव्हा जेव्हा तुझ्या घरी यायचो, तेव्हा तू नेहमीच मला चांगले वागवलेस. कधीही

माझा द्वेष, तिरस्कार केला नाहीस. वयापरत्वे पोटावर ताबा न राहिल्यामुळे, मी नेहमी धोतरातच शी-घाण करायचो. पण, तू कधीच माझे धोतर हाताने धुण्यासाठी टाळाटाळ केली नाहीस." मुली तुझे चांगले होईल. माझा आशीर्वाद आहे तुला." असे म्हणून आजोबांने, सोहमच्या बाबांच्या कुशीत आपले प्राण सोडले.

तर, नेमके आज पितर-पंधरवड्यातच सोहमला हे आठवण्याचे कारण म्हणजे, आमच्या आशीर्वादाने आणि देवाच्या कृपेनेच, तुम्हाला पुण्यातच तुमचे स्वत:चे घर मिळाले आहे. हे त्याच्या पितरांने त्याला दाखवून दिले असावे. आपल्याला आपल्या पितरांचा आशीर्वाद मिळणे फार गरजेचे असते. सोहमच्या आईने आणि बाबांनी त्यांच्या पितरांचा आशीर्वाद मिळवला होता).

तर वाचकांनो, आपल्या म्हाताऱ्या आई-वडिलांची काळजी घ्या. आपल्या आई-वडिलांना, सासू-सासऱ्यांना, दूर नका करू. पुढे मागे त्यांचे आशीर्वादाच उपयोगी पडतील. पुढे मागे, तुम्हीसुद्धा पित्रांपैकीच एक बनणार आहात. तुम्हीही म्हातारे होणार आहात, हे विसरू नका. नाहीतर, गाठ पितरांशी आहे.

तुम्हाला काय वाटलं? म्हातारे होऊन आपले आई-बाप/सासू-सासरे मेले, म्हणजे सगळे संपले? नाही, तसे नसते. मृत्युनंतर हे सर्व लोक पितरांच्या लोकात जातात. आता, किती लोक आजपर्यंत या जगात मेले असतील? किती लोकं, या पितरांच्या जगात असतील? काही आयडिया आहे का?

जर ही सगळी पितर एकत्र आली, तर सहजपणे आपल्याला आपल्या कर्माची फळे देऊ शकतात. या शब्दांवर विश्वास ठेवा. नंतर माझ्याकडे येऊ नका सांगायला.

सोहम हा असाच एक, ज्याच्याशी आत्मे संपर्क साधतात. तुमच्या पितरांचा संदेश तुमच्यापर्यंत पोचवणे, हे त्याचे काम होते.

(पितरांचा विषय निघालाच आहे. तर, थोडी माझीही गोष्ट सांगतो:

ताजा कलम: दिनांक १८.०९.२०१४ ते दिनांक २२.०९.२०१४ पर्यंत, मी कंपनीच्या कामानिमित्त वडोदरा आणि अहमदाबादला गेलो होतो. गेले काही दिवस "सोमनाथला जावे" म्हणून मनात विचार येत होता. तर, अहमदाबादचे काम संपवून मी सोमनाथला जायचे ठरवले.

२० तारखेला संध्याकाळी, मी अहमदाबादवरून सोमनाथला जायला निघालो. साधारणपणे पहाटे ४.३० वाजता सोमनाथला पोचलो. अहमदाबादला परत जाणारी रेल्वे होती सकाळी ९.५० वाजता होती. म्हणजे पुढच्या ६ तासात, मी दर्शन वगैरे घेऊन रेल्वे स्टेशनवर परत पोचणे गरजेचे होते.

गेले काही महिने, माझी बायको गरोदरपणासाठी गावी गेली होती. ती साधारणपणे १५ सप्टेंबर ते २५ सप्टेंबर या काळातच गरोदर होईल, असा अंदाज होता.

१५ सप्टेंबर रोजी, सूर्यदेव- सिंह राशीत (स्वगृही), चंद्रदेव - वृषभ राशीत (उच्चेचे), मंगळदेव - वृश्चिक राशीत (स्वगृही), बुधदेव- कन्या राशीत (स्वगृही आणि उच्चेचे), गुरुदेव - कर्क राशीत (उच्चेचे), शुक्रदेव

- सिंह राशीत, शनीदेव - तुळ राशीत (उच्चेचे), राहूदेव आणि केतूदेव - अनुक्रमे कन्या आणि मीन राशीत (स्वगृही). अशी ग्रहस्थिती असणार होती.

काही ज्योतिषांनी भविष्य सांगितले होते "देव १५ सप्टेंबरला, रात्री ९-१०.३० च्या दरम्यान जन्म घेईल". कारण, वर नमूद केलेली ग्रहस्थिती हजारो वर्षात एकदाच निर्माण होते, जेव्हा सगळे नवग्रह अनुकूल असतात. पण, विष्णूचा 'कलंकी' हा अवतार जन्माला यायला अजून भरपूर वेळ आहे. पण, काय फक्त विष्णूदेवच अवतार घेतो का?

पण, १५ सप्टेंबर गेला आणि आशा मावळली. २० सप्टेंबर सुद्धा गेला. या दिवशी, चंद्रदेव स्वगृही म्हणजे, कर्क राशीत आणि सूर्यदेव कन्या राशीत असणार होते. एवढाच फरक होता फक्त.

पण, "देव नेहमी आपल्या अपेक्षेपेक्षाही जास्त देतो" हे मला माहिती होते.

मुलगा झाला तर, "रुद्र" हे नाव ठेवायचे आणि मुलगी झाली तर "गौतमी" किंवा "दुर्गा" असे आधीच ठरले होते. पुन्हा गोंधळ, आई कालच म्हणाली, "आज्जी म्हणत होती, सोहमच्या मामे बहिणीला मुलगा झाला". तेव्हा, "त्याचे नाव "श्रीराम" ठेवा असे मी म्हणाले होते. पण, त्यांने काही त्याचे नाव श्रीराम ठेवले नाही. मग, तुझ्या मुलाचे नाव श्रीराम ठेवशील का?"

मी आधीच ठरवले होते "मुलगा झाला तर "रुद्र" आणि मुलगी झाली तर "दूर्गा". आता काय करायचे?

तर असाच, मी २० तारखेला संध्याकाळी ५.३० च्या बसने सोमनाथला जायला निघालो. २१ तारखेला, सकाळी ४.३० वाजता मी सोमनाथला पोचलो. "अंघोळ कुठे करायची, ते पण स्वस्तात?". हा प्रश्न होताच.

जवळच एक धर्मशाळा दिसली. मी कोणालाही न विचारता थेट आत घुसलो. "जवळचे सामान कुठे ठेवायचे?" हा विचार करतच होतो. तेवढ्यात मराठी भाषा ऐकू आली. चक्क महाराष्ट्रीयन लोक भेटले. माझी सगळीच सोय सोमनाथाने करून टाकली होती.

अंघोळ वगैरे करून सोमनाथाचे दर्शन घेतले. तसेच, शेजारी असेलल्या लक्ष्मी-नारायणाचे सुद्धा दर्शन घेतले. सोमनाथाचे मंदिर म्हणजे पहिले ज्योतिर्लिंग. महादेवाची पिंडच एवढी आकर्षक आहे, की विचारूच नका. जणू काही महादेवच "उभा राहून आपल्याला आशीर्वाद देतो आहे" असे वाटते. नेमका मी आरतीच्या वेळेसच मंदिरापाशी पोचलो. आणि भव्य दिव्य आरतीचा योग मिळाला.

हे मंदिर कित्येक वेळा लुटले गेले, तोडले गेले. पण प्रत्येक वेळेस, अहिल्याबाई होळकरांसारख्या, कोणीतरी धर्मवर्धक, दानशूर व्यक्तीने ते मंदिर पुन्हा बांधले. मंदिराच्या मागच्या बाजूला असणारा समुद्र म्हणजे, अगदी राजेशाही थाटात महादेवाला भेटू इच्छिणारा एक भक्तच. समुद्राच्या लाटा कितीही वेळ पाहत बसले, तरी मन भरत नाही.

महादेवाची सासुरवाडी म्हणजे हिमालय आणि श्री विष्णूची सासुरवाडी म्हणजे समुद्र. समुद्र सगळे सामावून घेतो. मी भरपूर वेळा समुद्र पाहिला आहे. पण, आता हिमालय पाहायचा आहे. पाहू कधीतरी, त्याने बोलावल्यावर.

मागे कधीतरी एक ओळखीच्या बाई म्हणाल्या होत्या "सोहम, तुला पहिली मुलगी होईल."

कदाचित, घटस्थापनेच्या दिवशी "मला मुलगी होऊन देवी जन्म घेईल" असेही वाटत होते.

पण त्याच संध्याकाळी मी काही कामाने सांगवीला चाललो होतो. रस्त्यात स्वामी समर्थांचे मंदिर दिसले. मी बाहेरूनच पाया पडलो. तेवढ्यात एक आई त्याच्या मुलाला बोलावत असताना मला ऐकू आले. ती म्हणत होती "अरे रुद्र, पटकन ये".

मला वाटले "स्वामींनी काहीतरी संकेत दिला असावा". पण मी फार काही मनावर घेतले नाही.

असो, मी आत्ता सोमनाथ मध्ये आहे.

तर, सोमनाथाचे दर्शन घेतले, त्याला आशीर्वाद दिले. "देवा, तुझी प्रसिद्धी जगभर होईल. पुन्हा कोणीही हे मंदिर तोडणार नाही. अगदी तिरुपती बालाजीसारखेच, हे मंदिर अजून भव्य दिव्य होत राहो. चल आता मी निघतो, रेल्वे पकडायची आहे." असे म्हणून मी प्रभास क्षेत्री आलो.

प्रभास क्षेत्र म्हणजे तीन नद्यांचा संगम असणारे ठिकाण. हे ठिकाण सोमनाथ मंदिरापासून फक्त १-२ किलोमीटर अंतरावर आहे. इथे पूर्वजांच्या नावाने श्राद्ध वगैरे केले जाते. श्राद्ध करण्यासाठी, हे भारतातले एक महत्वाचे ठिकाण.

अनायासे पितर पंधरवडा सुरु होता. मी पूर्वजांच्या नावाने थोडेसे काही केले आणि पुढे निघालो. पुढे, श्री-कृष्णाने अवतार संपवला ते ठिकाण, आणि भालका तीर्थ दिसले. मी रिक्षात बसलो होतो. बाहेरूनच पाया पडलो आणि आठवण आली "गेले कित्येक दिवस मी भटकत होतो. पण घरी कळवले नव्हते"

मी घरी फोन लावला आणि म्हणालो "मी येतो आहे, उद्या सकाळी ९ वाजेपर्यंत".

तसा मी घरी ७.३० वाजता पोचणार होतो. पण, का कुठून जाणे? मी म्हणालो "मी उद्या सकाळी ९ वाजेपर्यंत येतो आहे".

अंदाजाप्रमाणे मी, २२ सप्टेंबर रोजी सकाळी ८ वाजता घरी पोचलो. तासाभरातच सासुरवाडीवरून फोन आला "मुलगा झाला".

खरंच, स्वामी समर्थांची कृपा, माझ्यावरसुद्धा झाली होती की काय? नेमके, महादेवाचे दर्शन विना काही विटाळ घडता झाले होते. आणि लगेच घरी पोचल्यावर, आणि सोमवारीच देवाने प्रसाद दिला.

हो, मला मुलगा झाला. त्याचे नाव "रुद्रम" असणार आहे. रुद्रम = रुद्र + राम.

चला, कमीत कमी माझा मुलगा तरी माझ्यासारखा भित्रा होणार नाही. आमच्याही कुटुंबात कोणीतरी सिंहासारखे हवेच होते.

"पण, मी सकाळी ८ वाजता घरी पोचणार होतो. तरीही का म्हणालो "मी ९ वाजता येणार आहे"?

मी, मीच होतो ना? का कोणी इतर होते माझ्यात?

झाले असे की, सासऱ्यांचा फोन आला तेव्हा मागून बाळ खूप जोरजोरात रडत होते. मला आधीच दोन्ही कानांने कमी ऐकू येते. त्यातही फोनवर तर फारच कमी. पण, बाळाचे रडणे अगदी स्पष्ट ऐकू येत होते. जणू काही, बाळ मला सांगण्यासाठीच आसुसलेले होते "मी, ९ वाजताच आलो आहे".

"देवा, तुझी परवानगी असेल तर, त्याला मी हनुमान बनवेन, रामाची भक्ती शिकवेन. नाहीतरी, तू लिहिशील तेच होते. त्याचे काय करायचे? हे तूच पाहून घे. त्याला विष्णूभक्त करायचे, की शिवभक्त? हे तूच ठरव.)

सोहमची गोष्ट पुन्हा सुरु करतो -

असे देवाच्या कृपेने आणि पितरांच्या आशीर्वादाने, सोहमच्या बाबांचे नाव, वारसाहक्काने जागेवर लागले होते. सोहमच्या काकाने वडिलांना प्रस्ताव दिला "तू तुझा हक्क सोडून दे, मी तुला तुझ्या हक्काचे पैसे देईन." पण, सोहमच्या बाबांचे वय झाले होते ५४ वर्ष. अजूनही स्वत:चे घर नव्हते. काकाचीसुद्धा परिस्थिती चांगली नव्हती. काका पैसे देईल की नाही? हे माहिती नव्हते. आणि दिले तर कधी देईल? हे सुद्धा माहिती नव्हते. आईला चिंता होतीच स्वत:च्या घराची.

वाड्यात राहणाऱ्या सगळयांचे मतभेद होते. तसेच, बिल्डर सोबतही मतभेद होते. त्यामुळे काम काही पुढे सरकत नव्हते. शेवटी सोहमच्या आईने निर्णय घेतला आणि आपला हिस्सा एका बिल्डरला विकायचे ठरवले. नशिबाने त्यांना चांगले वकील मिळाले "मणियार वकील."

या मणियार वकीलांने, त्यांना त्यांच्या हिस्स्याचे दीड लाख रुपये मिळवून दिले. मणियार वकील अगदी देवासारखे धावून आले. त्यांने त्यांची फी म्हणून २५००० रुपये घेतले. याचा सोहमला फार राग आला होता. पण वकील साहेब म्हणाले "या फी मध्ये, मी तुम्हाला चांगले नवीन घर शोधून देईन, काळजी करू नका".

वकील साहेब म्हणायचे "तुम्ही ब्राम्हण लोकं. आम्ही मुस्लीम लोकं मांस-मच्छी खाणारे असतो. तुम्हाला मी, आम्ही राहतो तिथे घर घेऊन दिले असते. पण तुम्हाला मांस-मच्छीचा वास सहन होणार नाही.

तुम्हाला चांगल्या जागी घर शोधून देण्याची जबाबदारी माझी."

अगदी गुलाम-ए-मुस्तफा सिनेमाप्रमाणे, एक मुस्लीम व्यक्ती ब्राम्हणांचा विचार करत होती. त्यांना काय आवडेल, काय आवडणार नाही? या प्रमाणे घर मिळवून देण्यासाठी प्रयत्न करत होती. तसेच, जो हिस्सा सोहमची आई आणि बाबा, बिल्डरला फक्त ७५,००० रुपयात विकायला तयार होते. त्याचेच या मणियार वकिलांने १,५०,००० रुपये मिळवून दिले होते.

आता, बिल्डरला आपला हिस्सा विकल्यामुळे सगळे घरचे लोक आई-बाबांवर नाराज झाले. पुन्हा एकदा सोहमचे कुटुंब वाळीत पडले. पण आता वाड्याची इमारत बनवण्याच्या प्रक्रियेला, त्या बिल्डरमुळे वेग आला होता. जे नातेवाईक शहरापासून लांब रहात होते, त्या सर्वांनासुद्धा पुण्यासारख्या मध्यवस्तीत घर मिळाले होते. हे सगळे ते विसरूनच गेले.

हे सगळे परिस्थितीने गरीब, एकमेकात वितुष्ट असणारे असल्यामुळे, मोठा निर्णय घेण्याची कोणाचीही क्षमताच नव्हती. पण, सोहमच्या आईच्या निर्णयामुळे या सगळयांना नवीन घर मिळाले होते. पण लक्षात कोण ठेवतो?

मणियार वकीलांने सोहमच्या बाबांना, वाड्याजवळच एका नवीन बिल्डींग मध्ये घरसुद्धा शोधून दिले. त्यांने दिलेला शब्द पाळला.

सोहमच्या बाबांना कर्ज सुद्धा मिळाले. आणि शेवटी, त्यांचे स्वत:चे घर झाले. जिथून त्यांना हाकलून दिले होते, तिथेच कृष्णाने त्यांना घर मिळवून दिले. त्यांचा वनवास संपला होता.

इकडे, शेवटच्या वर्षीसुद्धा सोहमला अजून एक मुलगी आवडू लागली. ही सुद्धा पंजाबीच होती. तिच्यासोबत बोलता यावे म्हणून, पठ्ठ्याने तिच्यासोबत ट्रेकिंगच्या ग्रुपमध्ये नाव नोंदवले. ट्रेक निघाली सिंहगडला. काही मुलांने, प्रसादाच्या नावाखाली सगळयांना भांग खायला दिली. ट्रेकला गेलेली मुले, मुली, शिक्षक, शिक्षिका, सगळेच झिंगु लागले.

सगळी मुले आणि शिक्षक एका दिशेला जायचे. तर सोहम मात्र, ती आवडणारी मुलगी जाईल तिथे तिच्या मागे मागेच चालत जायचा. सोहमसोबत चमत्कार घडणे तसे काही नवीन नव्हते. गड चढता चढता ती मुलगी सोहमच्या पुढे होती. आधीच भांग खाल्ली होती आणि त्यातच, निसरड्या डोंगरावर तिचा पायच घसरला. सोहम मागेच होता. कसे कोण जाणे, तिला आधार देण्यासाठी सोहमचे हात वर उचलले गेले. नेमके सोहमचे हात तिच्या ढुंगणावर टेकले. तिला थोडासा आधार मिळाला आणि ती पडता पडता वाचली. एवढ्या उंचीवरून जर ती पडली असती, तर नक्कीच वाचली नसती. आता, "सोहमने तिला डोंगरावरून पडण्यापासून वाचवले" असे कोणीही म्हणणार नाही. पण, ज्याने कोणी ती घटना घडताना पाहिली होती, त्या सगळयांची तोंड मात्र आ वासून उघडी होती.

तेवढ्यात, आधी वर गेलेल्या मुलांपैकी एकाचा पाय सटकला. तो, कमीत कमी १०० फूट खाली घरंगळत घरंगळत कोसळला. तो मुलगा कॉलेजच्या कब्बडीच्या टीमचा कप्तान होता. सुदृढ शरीराचा असल्यामुळे तो वाचला. इतर कोणीही असता, तर नक्कीच मेला असता.

असो, सोहमने या सहामाहीला, ३ विषय पार्ट-टाईम, ३ विषय फुल-टाईम घेतले. प्रोजेक्टसुद्धा एकट्यानेच पूर्ण केला. परीक्षा दिल्या.

डिप्लोमाचे शेवटचे दोनच पेपर शिल्लक होते, त्यातला एक संपला आणि त्याच रात्री या बाबाला "काल" हा सिनेमा पाहण्याची इच्छा झाली. उद्या शेवटचा पेपर असूनही हा बाबा मित्रांबरोबर सिनेमाला निघाला. अमित आधी तयारच नव्हता पण, सोहमने त्याला सिनेमानंतर घरी सोडण्याचे आश्वासन दिले तेव्हा तो कुठे तयार झाला. अमितला चिंचवडला सोडेपर्यंत रात्रीचे १२.३० वाजले. इथून सोहम पुन्हा खडकीला निघाला. येताना बोपोडीला रस्त्याचे काम सुरु होते. रस्त्यावर सगळीकडे खडी आणि वाळू पसरली होती. गाडीचा वेग ताशी ६०-७० किलोमीटर असेल. एक किलोमीटर लांब रस्त्यावर एक मांजर रस्ता ओलांडत होती. सोहमला वाटले, आपण पोचेपर्यंत मांजर रस्ता ओलांडून पलीकडे जाईल. पण, मांजर रस्त्यातच थांबले. गाडीचे ब्रेक मारले असते तर वाळू आणि खडीवरून गाडी घसरली असती. ब्रेक मारता येत नव्हता, मांजर काही रस्त्यातून हलत नव्हती.

मांजराला चुकवून त्याच्या विरुद्ध बाजूने गाडी नेण्याचा प्रयत्न केला तर, मांजराने सुद्धा नेमकी त्याच वेळेस दिशा बदलली. गाडी मांजराच्या अंगावरूनच गेली. एव्हाना वेग कमी झाला होता. सोहमने पुढे जाता जाता एक धावता दृष्टीक्षेप टाकला. त्याला वाटले मांजर मेले असेल. पण नाही, मांजर रस्ता ओलांडून पळून गेले.

खरेच "काल (काळ)" आला होता पण, वेळ आली नव्हती. सोहम पुन्हा एकदा वाचला होता.

असो, साम-दाम-दंड-भेद, असे सगळे डाव-पेच वापरून त्याने सगळे विषय सोडवले. त्यातच आधीचे तीन विषय सुद्धा सोडवले. शेवटी एकदाचे ३३-३४ विषय सोडवून, हा डिप्लोमा होल्डर बनण्याच्या मार्गावर पोचला.

शेवटच्या वर्षात, याला पुन्हा ७०% मिळण्याची खात्री वाटू लागली. निकाल लागला. याला ७४.१३% टक्के गुण मिळाले आणि ते सुद्धा डिप्लोमाला. १५०० पैकी १११३ गुण मिळाले. इंजिनिअरींग मध्ये ६६% टक्के गुण मिळाले, की "विशेष प्राविण्य" असे समजले जाते.  विशेष प्राविण्यासह सोहम डिप्लोमा पास झाला होता. विशेष म्हणजे, त्याला अजूनही फक्त पट्टी सोडून इतर काही साधने वापरता येत नव्हती, अगदी कॅल्क्युलेटर सुद्धा. विना कॅल्क्युलेटर आणि इतर साधने वापरता सोहमने इतके गुण मिळवले होते.

(सोहमला किती गुण मिळाले, किती टक्के मिळाले ही मी तुम्हाला का सांगतो आहे? असे तुम्हाला वाटत असेल. पण हे सगळे गुण लक्षात ठेवा. कारण तुम्हाला नंतर समजेलच).

सोहम कृतज्ञतापुर्वक डोंगरे सरांकडे गेला. याचे गुण पाहून सर एकदम खुष झाले. सर म्हणाले "अरे, मला सुद्धा एवढे गुण मिळाले नव्हते". सोहमला माहिती होते "सरांना एवढे कमी गुण मिळणे शक्यच नव्हते. देव माणूसच होते सर त्याच्यासाठी.".

गोडबोले सरांप्रमाणेच, डोंगरे सर सुद्धा, आता पुढच्या मुलांना सोहमचे उदाहरण देऊ लागले होते. "एक मुलगा होता आपल्या कॉलेजमध्ये, त्याला त्याच्या आईचे रडणे आवडले नाही आणि............

कॉलनीमध्ये राहणारा त्याचा मित्र, आणि आदितीचा भाऊ, नेहमी सांगत असतात. (त्यांने सुद्धा एक वर्षाने हे ऐकलेच होते ना.) देवाने इथेही सोहमची इमेज चांगली केलीच होती.

अश्या प्रकारे सोहमचा डिप्लोमा सुद्धा संपला होता.

पण, पुढे याला याची देवी भेटणार होती. कशी ते पाहूच पुढच्या भागात.

**१४. पुन्हा गणिताने केलेली गोची, पुन्हा ४ वर्षांचे शिक्षण, अजून काही प्रेम प्रकरणे (सोहमचे, शाळेनंतर एकूण १० वर्ष पुढे शिक्षण चालू असणे), सोहमची २४ मांजरं, देवीची भेट, १३चा आकडा आयुष्यात येणे, कॅरेक्टरलेस प्रकरणाची सुरुवात, आपण संमोहित झाले असण्याची जाणीव होणे, सोहमचा मोबाईल हॅक होणे, एकाच प्रेमाचा ७-८ वेळा भंग.**

ठरवले तर सगळे शक्य असते. आणि, नाही ठरवले तर सगळे अशक्य. हे देवानेच सोहमला दाखवून दिले होते. पण, सोहमला अजूनही देवावर विश्वास कुठे होता?

तर, डिप्लोमा संपल्यानंतर याच्या आत्त्याच्या मिस्टरांनी याच्यासाठी चांगल्या कंपनीमध्ये नोकरी शोधली. ते सुद्धा त्याच कंपनीमध्ये काम करत होते. याची मुलाखत झाली. पण, नोकरी काही मिळाली नाही.

याचा भाऊ, ज्याला देवाने आत्तापर्यंत अशक्यप्राय अशा संकटांमधून वाचवले होते, त्याने घराला हातभार लावायला सुरुवात केली. आई-बाबांनी सोहमच्या भावाला, सत्य-नारायण, गणपती स्थापना अशा पूजा करायला शिकवल्या. हळू हळू मयुरेश, राहणाऱ्या परिसरात खूप प्रसिद्ध होऊ लागला. एका मोठ्या सोसायटीमध्ये त्याला सकाळी गणपतीची पूजा करण्याची नोकरी मिळाली. मयुरेश, सकाळी ब्रम्ह-मुहूर्तावर जाऊन गणपतीची पूजा करून यायचा. सोहमची ती झोपायला जायची वेळ असायची. मयुरेश देव-धर्म करायचा. सोहम, मस्त पैकी रात्री ३-४ वाजेपर्यंत टी.व्ही पहायचा. वयाच्या पंचविसाव्या वर्षी याला व्हिडीओ गेम खेळायचे वेड लागले होते. हा रात्रभर व्हिडीओ गेम खेळायचा आणि दुपारी १-२ वाजता उठायचा. पुजेवरून आल्यावर मयुरेश कॉलेजला जायचा. मयुरेश परत आला की सोहम झोपेतून उठायचा. मयुरेशच्या, मोठ्या मोठ्या लोकांशी ओळखी होऊ लागल्या. तर सोहम जास्तीत-जास्त एकलकोंडा रहायचा. मयुरेशचे, त्याच्या शिक्षणाकडे लक्ष असायचे. तर सोहमला उनाडक्या करण्यात रस होता.

हा दिवसभर इंटरनेट वर जाऊन चॅटिंग करत बसायचा. चॅटिंग करता करता याला अजून एक मैत्रीण मिळाली. ती बंगालची होती. बंगालच्या मुली तश्या स्वभावाने भोळया असतात. तसे, सगळयाच मुली भोळया असतात. पण, त्यातल्या त्यात ही फारच भोळी होती. ती बंगाली ब्राम्हण होती. सोहमला वाटले, "आपल्यासारख्या नापास होत होत पास होणाऱ्या मुलासोबत कोण लग्न करणार? त्यापेक्षा हीच आपल्यासोबत लग्न करू शकेल."

सोहम तिला एस.टी.डी वरून फोन करायचा. दोघेही वेळ ठरवून, इंटरनेटवर येऊन ५-६ तास चॅटिंग करत बसायचे.

पुढे कधीतरी याच्या भावाने स्वत:साठी एक मोबाईल घेतला. सोहमसुद्धा हाच मोबाईल वापरायचा. सोहमचे काम सोपे झाले होते. हाच नंबर याने त्या मुलीलासुद्धा दिला. ती सुद्धा याच्यासारखीच मानसिकदृष्ट्या एकटी असेल. कधी हा तिला फोन करायचा, कधी ती याला. दोघेही विनाकारणच फोनवर रडायचे. अधे मध्ये प्रेमाची उत्कटता वाढली की दोघे लग्न करायचा प्लॅन करू लागले. पण आता, ती बंगालमध्ये आणि हा पुण्यात. तिला पाहिलेही नव्हते. याला काही नोकरी नव्हती. पैसे कसे कमवायचे? याची अक्कलही नव्हती. पण दोघेही बिनडोक, कसे लग्न करणार होते कोणास ठाऊक? तर अधेमध्ये असेच चालू रहायचे.

दरम्यान, याचा आत्मविश्वास पुन्हा वाढला होता. हा विचारच करत होता "आपण पुढे इंजिनिअरिंगला प्रवेश घ्यावा". याला कळाले "कुणालसुद्धा पुढे इंजिनिअरिंगला प्रवेश घेणार आहे". थोडक्यात सांगायचे तर, डिप्लोमा म्हणजे अर्धा इंजिनिअर आणि डिग्री म्हणजे पूर्ण इंजिनिअर. काही दिवसांने सोहमने विचार केला "डिप्लोमा नंतर जर इंजिनिअरिंगला प्रवेश घेतला, तर थेट दुसऱ्या वर्षाला प्रवेश मिळतो. फक्त एकच गणित असते. डिप्लोमासारखेच, इंजिनिअरिंगचे गणितसुद्धा सोडवू आपण"

तर, कुणालच्या नादाने यानेसुद्धा इंजिनिअरिंगला प्रवेश मिळवला.

सोहम, दहावीनंतर ज्या मोठ्या कॉलेजमध्ये प्रवेश घेण्याचा विचार करत होता. त्यापैकीच एका मोठ्या कॉलेजमध्ये, कुणालसोबत सोहमलाही प्रवेश मिळाला. सोहमचे हे स्वप्नसुद्धा देवाने काही वर्षांने पूर्ण केले होते.

पुन्हा पहिली दोन वर्षे, डिप्लोमा सारखेच हा भरपूर विषयात नापास झाला. अजून एक वर्ष घरीच बसायला लागले. डिप्लोमाला सोबत, इंजिनिअरिंगला सोबत. कुणालची आणि सोहमची जोडी, जणू काही देवानेच जमवली असावी. कुणाल आणि सोहम, सोबतच नापास व्हायचे आणि सोबतच पास व्हायचे. यावेळेसही, सोहम आणि कुणाल, दोघेही नापास झाले. सोहमने ११वी-१२वीत कॉमर्स साईड घेतली. १२वी नंतर डिप्लोमाला प्रवेश घेतला.

सोहमची ११वी आणि १२वीची दोन वर्षं वाया गेलीच होती. म्हणजे, ११वी आणि १२वी ची दोन वर्षे, डिप्लोमाचे १ वर्ष आणि डिग्रीचे एक वर्ष, अशी याने एकूण चार वर्ष वाया घालवली होती.

हा आता जवळ जवळ २५ वर्षाचा झाला होता. मुले साधारणपणे २१-२२ व्या वर्षी इंजिनीअर होतात. पण, याचा हनिमून पिरीयड अजूनही संपला नव्हता. इथेही सोहम, सगळयात वयस्कर मुलगा होता वर्गातला. त्याचे वय जरी वाढत असले, तरी बुद्धी वाढतच नव्हती. याचा भाऊ मात्र, प्रगतीची एक एक शिखरे चढत चालला होता. कम्प्युटर इंजिनिअर होता होता, गणपतीची पूजा, गणपती स्थापना, सत्य-नारायणाची पूजा, वास्तू-शांती, अशा पूजा करून घराला चांगलाच हातभार लावत होता. तसेच, शेवटच्या वर्षी गणपतीच्या कृपेने त्याला मोठ्याश्या सोफ्टवेअर कंपनीमध्ये चांगली नोकरीसुद्धा मिळाली. नोकरी करता करता त्याने पुढच्या शिक्षणालासुद्धा प्रवेश मिळवला.

सोहम नापास झाल्यावर, त्याने सुद्धा एका कॉल-सेंटर मध्ये नोकरी मिळवली. तिथेही याचे अजून एक प्रेम-प्रकरण झाले. पण नेहमीप्रमाणे, दोनच भेटीत ते सुद्धा संपले. ३-४ महिने काम केल्यावर सोहमने ही सुद्धा नोकरी सोडून दिली. भाऊ, लहान असूनही २०-२५००० रुपये मिळवायचा आणि सोहम फक्त ३००० रुपये. आयुष्यात मोठे काहीतरी करावे, असे सोहमला वाटतच नव्हते.

कॉल-सेंटरमधल्या संस्कृतीचा मात्र याच्यावर चांगलाच पगडा पडला होता. कॅफे-कॉफी डे, मॉन्जीनीस, मॅक-डोनाल्डस, पिझ्झा हट, पाश्चिमात्य संस्कृती त्याला फार आवडू लागली होती. शेजारी राहणाऱ्या एका मुलाला, दर आठवड्याला सिनेमाची तिकिटे फुकटात मिळायची. तो दर आठवड्याला, सोहमलाच सोबत सिनेमा पहाण्यासाठी घेऊन जायचा. कोणताही सिनेमा रिलीज झाल्यापासून, एकाच आठवड्यात सोहमला तो पाहायला मिळू लागला होता आणि ते ही फुकटात.

"आता आपण, मोठ्या कॉल-सेंटरमध्ये काम करून अजून जास्त पगार मिळवू" असे त्याला वाटू लागले होते. पण, इंग्रजी फार काही चांगले नसल्यामुळे प्रत्येक इंटरव्यूमध्ये हा नापासच व्हायचा. "कॉल-सेंटरमध्ये नोकरी करण्यासाठी इंग्रजी चांगले जमावे लागते" हे तो दर वेळेस विसरत होता.

असेच दिवस जात होते. अधेमध्ये आलेल्या परीक्षांमध्ये, डिप्लोमा प्रमाणेच, नापास झालेले काही विषय याने सोडवले. पण, अजूनही ६ महिने हा कॉलेजला जाऊ शकणार नव्हता.

हा पुन्हा इंटरनेटवर जाऊ लागला. इथे पुन्हा एकदा त्याला, त्याच्यासारखीच दु:खी असणारी अजून एक मैत्रीण मिळाली. ती जवळच राहणारी होती. तिच्या कौटुंबिक दु:खांमुळे, ती सुद्धा मानसिक दृष्ट्या एकटी पडली होती. ही पुण्यात शिकायला होती. आई-बाबा जवळ रहात नव्हते. आई-बाबांची सुद्धा भांडणे होती. हिला वाटायचे "बाबा कधीही आपल्या आईचा खून करू शकतील." अश्यावेळी, सोहम तिला मानसिक आधार द्यायचा. एकदा तिने विचारले "सोहम, तू माझ्यासोबत लग्न करशील का रे?" सोहम सुद्धा हो म्हणाला.

गेले ३-४ महिने ती याच्याबरोबर फोन वर बोलत असायची. पण, भेटली कधीच नाही. नंतर, "सोहम बालिश आहे" समजून तिने नाते तोडून टाकले. सोहमसुद्धा पास होण्याच्या चिंतेत होता. त्याने काही मनावर घेतले नाही. पण, रोज तिच्याबरोबर बोलण्याची सवय होतीच ना. कधी कधी सोहम अस्वस्थ व्हायचा. पण, "तिला त्रास नको द्यायला" म्हणून फोन नाही करायचा.

सोहमने पुन्हा कसातरी शेवटच्या वर्षाला प्रवेश मिळवला. आता, हा कसातरी प्रवेश मिळवण्यामागे कारण होती "सोहमची आई आणि तिचा देव महादेव". तर झाले असे की, इंजिनिअरिंगचे गणित म्हणजे डिप्लोमाच्या गणितापेक्षा १०० पट अवघड. सोहमने घरी सांगितलेच होते "आई मला अजूनही कॅल्क्युलेटर वापरता येत नाही. तसे मला कॅल्क्युलेटर वापरण्याची आवश्यकता नाही. पण गणित कळत नाही. अजूनही एक विषय आहे, जो गणितासारखाच आहे. मी जर या दोन विषयात नापास झालो, तर अजून एक वर्ष वाया जाईल."

कोणी विश्वास ठेवेल का? सोहम गणित पाठ करायचा, सोडवायचा नाही. डिप्लोमाला असणारे, तीनही गणिताचे विषय त्याने गणिते पाठ करून सोडवले होते.

आईला चिंता पडली होती. पण एका रात्री, आईच्या स्वप्नात साक्षात महादेव आले. आईला म्हणाले "सांग तुला काय देऊ?". आई म्हणाली "माझ्या मुलाला शिक्षणाचे विषय फार अवघड जातात. तो सारखा नापास होतो. त्याला पास कर". ती आईच होती, म्हणून स्वत:साठी मुक्ती वगैरे काहीही न मागता, मुलाला पास कर म्हणाली.

महादेव म्हणाले "उद्या तू चमत्कार बघ" मी तिथेच चाललो आहे".

कदाचित, पूर्वी स्वर्गवासी झालेल्या पितरांने, सोहमच्या आईचे स्वप्न पूर्ण करण्यासाठी महादेवाला बेजार केले असावे.

तर असे, सोहम दुसऱ्या दिवशी गणिताच्या पेपरला गेला. इकडे घरी आई आणि मावशी, सोहमला पेपर सोपा जावा म्हणून गणपती अथर्वशीर्ष्याचे पाठ करत बसल्या.

सोहमने जेवढे जमते तेवढे लिहिले. पण, ते पास होण्यासाठी पुरेसे नाही. असे वाटून मग थेट पर्यवेक्षकांनाच विचारले "सर, एक दोन गणित पाहून सोडवू का?" आश्चर्य म्हणजे, पर्यवेक्षकांने त्याला तसे करायला होकार दिला. महादेवाने खरेच चमत्कार केला होता. याने इकडे तिकडे पहायला सुरुवात केली. शेजारच्या मुलाच्या पेपरमधील एक गणित, दुसऱ्या बाजूच्या मुलाच्या पेपरमधील एक गणित, पुढच्याच्या,

मागच्याच्या पेपर मधील एक एक गणित. असे करून त्याने थेट ४३ गुण मिळवले. असाच दुसराही अवघड विषय सुटला. आता जन्माची चिंता मिटली होती. यापेक्षा कोणताही अवघड विषय आता शिल्लक नव्हता. आता सोहम सहज इंजिनिअर होणार होता.

आधी सांगितल्याप्रमाणे, "सगळे देवाच्या इच्छेनेच कसे काय घडते?" असे मला नेहमीच वाटत होते. तर याचे उत्तम उदाहरण म्हणजे सोहम. सोहमची त्याच्या देवीसोबत भेट होण्याची वेळ जवळ आली होती. म्हणूनच हा पास झाला असावा आणि शेवटच्या वर्षाला पोचला.

दरम्यान सुट्ट्यांमध्ये, यांच्या घराबाहेर एक बोका बसला होता. तो बोका जखमी होता. सोहमच्या आईने त्याला घरात घेतले. दूध वगैरे पाजले. पुढे, हा बोका यांचा पाळीव बोका झाला. मांजरात, मोठा बोका नेहमी लहान बोक्याला खूप मारतो. असेच, सोहमच्या आईच्या बोक्यालासुद्धा एक मोठा बोका खूप मारायचा. मोठा बोका आला की सोहमचा बोका लपून बसायचा. "आपला बोका भित्रा आहे" म्हणून, सोहमने उपहासाने, बोक्याचे नाव "दारासिंग उर्फ दाऱ्या" असे ठेवले. सोहमच्या घरी कोणीही मांसाहारी नव्हते. पण, खास दाऱ्यासाठी, शेजारच्या मासेवाल्यांकडून, सोहम रोज मासे घेऊन यायचा.

आता, या दाऱ्याने एक मांजर पटवली. ती मांजर सुद्धा रोज मासे खाण्यासाठी घरी येऊ लागली. हळू हळू ती घरचीच झाली. ती काळी होती म्हणून सोहमने तिचे नाव "कल्लू आंटी" असे ठेवले. तर ही "कल्लू आंटी" गरोदर राहिली. तिला चार पिल्ले झाली. यापैकी दोन मांजरी आणि दोन बोके होते.

एका पिल्लाची शेपूट मुंगसासारखी असल्यामुळे, त्याचे नाव मुंगूस उर्फ मंगू महोदय. दुसऱ्या मांजराचे तोंड डॉल्फिन माश्या सारखे दिसत असल्यामुळे, त्याचे नाव डॉल्फिन पडले. तर, बोक्याचे नाव पापा, कारण तो एकदम रुबाबदार होता. चौथे पिल्लू लहानपणीच गेले.

३ महिन्याने कल्लू आंटी पुन्हा गरोदर. ८-९ महिन्यांने, डॉल्फिन आणि मुंगूस सुद्धा गरोदर राहिले. हळू हळू, फक्त एका बोक्याच्या पराक्रमामुळे, यांच्या घरी आता २४ मांजरी झाल्या होत्या. दाऱ्या बोका म्हणजे, सोहमच्या घरी असणाऱ्या मांजरांच्या कुळाचा मूळपुरुष झाला होता.

एकदा मांजर गरोदर राहिली, की ती बाळंतीण होऊन २ महिने झाल्याशिवाय कोणत्याही बोक्याला जवळपास फिरू देत नाही. आणि, मोठे बोके नेहमी लहान पिल्लांचा गळा घोटून त्यांना मारून टाकतात. यामुळे, प्रत्येक मांजर प्रत्येक पिल्लाची २ महिने व्यवस्थित निगा राखते. असेच काही सोहमच्या घरीसुद्धा घडत होते. ज्या दाऱ्याची ही सगळी पिल्ले होती, त्या दाऱ्यालाच आता घरात येणे दुरापास्त झाले

होते. तो घरी आला की सगळी लहान पिल्ले लपून बसायची. आणि त्यांच्या आया दाऱ्याला घरातून हाकलून लावायच्या.

प्रत्येक नवीन मांजराला सोहम नवीन नवीन नावे शोधत होता. कोणाचे नाव होते "दाऱ्याच कोंबड", कोणाच नाव होत "बब्बू भाई", कोणी होते "मॅन्गो मफलर" तर कोणी होते "जम्बो जग्लर" कोणी होते "बजरंगी". एक मांजर तर अगदी, पांढरीशुभ्र आणि कापसासारखी स्वच्छ - तिचे नाव होते "ऐश्वर्या" आणि "कापश्या". एक बोका, जो सगळ्यांना मारायचा, त्याचे नाव होते "बग्गा". तो बग्गा, बोक्यांताला गुंड होता. म्हणूनच याचे नाव "बग्गा" पडले. पुढे याच "बग्गा" आणि "पापाने" दाऱ्याचा वंश पुढे चालवण्याची जबाबदारी चोखपणे पार पाडली.

या सगळयांना, रोज मासे आणण्याचे काम सोहमचे होते.

एखाद मांजर सोफ्यावर, एखाद कपाटावर, एखाद पडद्यावर, एखाद स्वयंपाक घरात, एक-दोन आतल्या खोलीत, काही जण बाहेर. असं अगदी गोकुळासारख, घर मांजराने भरून गेलं होत. पण हळू हळू कॉलनीमध्ये, कोणाच्याही घरी, कोणत्याही मांजराने शी, घाण केली, की पुढे भांडणे वाढू लागली होती. सोहमला आईचा खूप राग यायचा. आई कोणत्याही मांजराला कधीच हाकलायची नाही. मांजरे वाढतच चालली होती. ती घरात घाण करायची. सोहम १०-११ वाजेपर्यंत झोपलेला असायचा. मांजरे अंगावरून पळायची. त्यांची नखे टोचली की सोहमची झोपमोड झाल्यामुळे त्याला खूप राग यायचा. मांजरांमुळे झोप मोडली की हा आई बरोबर भांडायचा.

आई कसेतरी सोहमला, देवाच्या, प्राण्यांवर प्रेम करण्याच्या गोष्टी सांगून सांगून, सोहमला प्राणीमित्र बनवण्याचा प्रयत्न करायची. सगळी मांजरे सोहमशी बोलायची. अगदी मांजरे, कुत्री सुद्धा सोहमशी बोलायची. कारण तो त्यांचे आवडते जेवण द्यायचा ना.

असो, एकदा सोहम, जवळच रेंज-हिल्स मध्ये रहात असणाऱ्या मित्राच्या घरी गेला. तिथे आधीपासूनच, पोलीस लाईनमध्ये राहणारा विराट उपस्थित होता. विराट आणि सोहमचे आधीपासूनच थोडेसे वाकडे होते. त्याचे झाले असे की, पोलीस लाईन सोहमच्या घराशेजारीच होती. तिथल्या बिल्डींगमध्ये विराटचे घर तळमजल्यावर होते. सोहमची मांजरं पोलीस लाईनमध्ये जायची. आणि, विराटच्या घराच्या बाल्कनीत जाऊन, मस्तपैकी शी, शू करून पळून यायची. तेव्हापासून, विराट आणि सोहममध्ये ३६चा आकडा झाला.

झाले, विनाकारण दोघांची भांडणे झाली. अगदी हाणामारी पर्यंत प्रकरण पोचले. विराटला सोहमबद्दल भरपूर माहिती होती. सोहम कोणत्या कॉलेजला शिकतो, सकाळ संध्याकाळ कुठे जातो, ही सर्व

माहितीसुद्धा त्याला होती. विराटने सोहमला धमकी दिली "तू या वर्षी पास कसा होतोस तेच बघतो." तुझी सगळी लफडीसुद्धा मला माहिती आहेत. आता तू बघ मी काय करतो". सोहमने फार काही मनावर घेतले नाही.

सुट्टी संपण्याअगोदर, होळीच्या दिवशी अक्षय सोहमच्या घरी आला. दोघांनेही खूप रंग खेळला. मग ते संकेतकडे गेले. तिथून एक एक करत, १४-१५ मित्रांच्या घरी जाऊन रंग खेळले. सगळे अगदी भिकाऱ्यासारखे दिसत होते. यांने ठरवले "आता कुठे तरी अंघोळ करायला हवी." सगळे जण विहिरीवर गेले. सोहम आता पट्टीचा पोहणारा झाला होता. सोहमने विहिरीत उडी मारली. पुन्हा पायरयांवर आल्यावर त्याच्या मनात आले "आता सूर मारावा".

सोहमने सूर मारला. नेमके त्याच वेळेस वरून एकाने उडी मारली. सोहमचे डोके खालच्या बाजूला असल्यामुळे त्याला काहीही माहिती नव्हते. पण, ज्याने उडी मारली होती त्याने पाहिले होते की "आपण कोणाच्यातरी अंगावर पडणार आहोत". एका सेकंदात दोघांची धडक झाली. उडी मारणारा मुलगा सोहमच्या डोक्यावरच पडला होता.

६० किलोचा मुलगा, २० फूट उंचीवरून, आणि तेही भर पाण्यात सोहमच्या डोक्यावर पडला होता.

सोहमच्या डोक्याला कसला तरी हादरा बसला. दोघेही पाण्यात १०-१५ फूट आतपर्यंत गेले. काय झाले ते सोहमला माहिती नव्हते. पण, डोक्याला हादरा बसल्यामुळे त्याने पटकन वर येण्याचा विचार केला. सोहम पाण्याच्या वर आला.

सगळी मुले ओरडत होती "त्याला वाचव, त्याला वाचव". सोहमला काही कळतच नव्हते, त्याला वाटले "आपण मेलो, शरीर पाण्यात खाली गेले आणि आपला आत्मा वर आला आहे."

सोहम बाजूला आला. दुसऱ्या एका मुलाने पाण्यात उडी मारली. जो मुलगा सोहमच्या डोक्यावर पडला होता त्याला बाहेर काढले. म्हणजे, ज्याच्या अंगावर तो मुलगा पडला, तो सोहम स्वत: परत वर आला. पण, जो अंगावर पडला तो खाली गेला होता. तसे दोघेही वाचले.

त्या दिवशी पौर्णिमेचा दिवस होता. सोहम आणि भूतांचा इथे दुसऱ्यांदा संबंध आला होता.

पुढे सोहम, २० मिनिटे अजून पाण्यात पोहला. बाहेर आल्यावर त्याला डोक्याला काहीतरी जाणवले. त्याने तपासले तेव्हा हाताला रक्त लागले. बोटभर लांब कोच पडली होती डोक्याला. पुढे अक्षय, सोहमला हॉस्पिटलमध्ये घेऊन गेला. पण, सोहमकडे पैसे नसल्यामुळे त्याने उपचार करून घेतले नाहीत.

२-३ वर्षांअगोदर, जेव्हा सोहम सिनेमे पहायला जायचा. सिनेमा पाहून बाहेर आला, की पुढचे काही दिवस तो त्यातल्या हिरोसारखा वागू लागायचा. जे लोक वास्तवात चोर असतात, त्यांना नेहमी पोलीस बनावे वाटते. असेच काही सोहमचे असावे बहुतेक. तर, असेच एकदा सिनेमा पाहून आल्यावर सोहम देवाला म्हणाला "देवा माझे आयुष्य एकदम फिल्मी करून टाक".

२० फुटांवरून, ६० किलोचा मुलगा, भर पाण्यात डोक्यावर पडूनही सोहम वाचला होता.

बहुतेक, सोहमने मागितलेले वरदान देवाला पूर्ण करायचे होते. म्हणूनच त्याने सोहमला वाचवले असावे. असेही ज्यांच्या इच्छा, कर्म पूर्ण होतात त्यांना देव मुक्ती देतो किंवा पुढचा जन्म देतो. कदाचित सोहमच्या इच्छा, कर्म शिल्लक असावीत. म्हणून तो पुन्हा एकदा वाचला.

वेळ आली होती जाण्याची.......
डोळ्यांने मरण पाहिले होते....
मृत्यू म्हणाला, "एक संधी अजून देतो"....
जणू, माझे काही स्वप्न बाकी राहिले होते...

सुट्टी संपली आणि सोहमचे कॉलेज पुन्हा सुरु झाले. वर्गात आल्याआल्याच त्याच्या हातून शिक्षकांचे मोठे काम झाले. त्यांच्या नजरेत हा चांगला विद्यार्थी झाला. त्याचे फिल्मी आयुष्य आता देव सुरु करणार होता.

वर्षाच्या सुरुवातीलाच सोहम वर्गातल्या एका मुलाला म्हणाला "या वेळेस मी, विशेष प्राविण्यासह शेवटच्या वर्षात पास होणार." मित्राला माहिती होते "सोहम लटकत लटकत पास झाला आहे. याला पास होणेच अवघड आहे. तिथे हा विशेष प्राविण्य काय मिळवणार?" मित्र सोहमला म्हणाला "तू जर असे गुण मिळवलेस तर हवी ती पार्टी माग".

सोहमने फेक मारली होती. लागली तर लागली आणि, नाही लागली तर नाही लागली.

प्रश्न नेहमीच पडत असतो,

फेका मारताना मला, लाज कशी वाटत नाही?
पण, चॅलेंज न देता करून दाखवणे,
मनाला सुद्धा पटत नाही....

दरम्यान, सोहमच्या कॉलेजमध्ये एक नवीन मुलगी आली होती. तसे ती जुनीच होती. पण, सोहम नापास झाल्यामुळे, तोच आता पुढच्या पिढीच्या मुलांबरोबर आला होता. आता सोहमच वर्गात नवीन होता. सगळे जुने मित्र पास होऊन पुढे गेले होते. फक्त कुणाल आणि सोहम मात्र नापास होऊन लटकले होते.

वयस्कर झालो असलो तरी,
मन मात्र तरुण आहे....
भारतात, नवऱ्याचे वय जास्तच (१०० पैकी ९० वेळा) असते...
नक्कीच मी हेरुन आहे....

तर, ती नवीन मुलगीसुद्धा सोहमला एकटीच वाटली. महत्वाचे म्हणजे, सोहमच्या आत्तापर्यंतच्या बहुतेक गर्ल-फ्रेंड्सना चष्मा होता. का कोण जाणे? पण त्याला चाश्मिष मुली आवडायच्या. ती सुद्धा चाश्मिष होती. ती नेहमी वर्गात एकटीच बसायची. जास्त काही कोणासोबत बोलायची नाही. गुपचूप कॉलेजला यायची आणि कधी निघून गेली हे कळायचे सुद्धा नाही. गोरी पान होती. फुलासारखे नाक होते. डोळयात चमक होती. चेहऱ्यावर हसू होते. हसू लागली, की गुलाबी होटांतून पांढरे शुभ्र दात हळूच दिसायचे. पण, का कोण जाणे? सोहमला तिच्या डोळयात दु:ख जाणवले. म्हणजे, एकट्याला एकटी भेटली होती तर. ती एकटीच यायची, एकटीच जायची. कोण होती माहिती नव्हते. पण एकटी वाटत होती.

त्याने ठरवले "हिला एकटे राहू द्यायचे नाही". तिच्याबद्दल विचार करता करता, याला ती आवडू लागली. तसे, आजपर्यंत याला भरपूर मुली आवडल्या होत्या म्हणा. याने ठरवले "हिच्याशीच लग्न करायचे". तसे, "प्रत्येक गर्ल-फ्रेंड बरोबर लग्न करावे" असे सोहमला वाटतच होते.

"पण, हिच्याशी बोलायचे कसे? दिसायला तर खूप श्रीमंत घरातली वाटते. आपण असे लटकत लटकत पास झालेलो. ती एकदम हुषार असणार, कारण ती गोरी आहे.

प्रेम आपले जमू शकेल?
तू श्रीमंत आणि मी गरीब असताना, दोघांत एवढी दरी असताना....
पार्वतीलासुद्धा महादेव आवडलाच की...
तो सावळा आणि ती गोरी असताना?

वा वा वा......

याने विचार केला "आपली इमेज हिच्या नजरेत एकदम वाईट असणार".

असेल मी वाईट, असेल मी असभ्य...
कारण, मी नर्क पाहिला आहे......
अनुभव फार असह्य होता....
प्रत्येक क्षण, मनात भरून राहिला आहे....

ती आपल्याशी बोलेल का?" जाउदे, बोलायची काय गरज? आपण चिठ्ठी लिहूया.

एके दिवशी याने, एकदम फिल्मी स्टाईलने एका कागदावर लिहिले "मला तू एकटे बसलेले आवडत नाही. मला तू कुठेही एकटे गेलेले आवडत नाही. मला तू तुझे दु:ख, एकटीनेच सहन केलेले आवडत नाही. मला तुला एकटे नाही राहू द्यायचे" (I dont want you to sit alone in the class, I dont like you to move alone in the porch, I dont want you to share your sorrows, your feelings lonely, I dont want you to be lonely). याने खाली नाव वगैरे नाही टाकले. ती चिठ्ठी त्याने तिच्या दुचाकीत टाकून दिली.

तिने वाचली की नाही, हे त्याला नाही समजले.

दुसऱ्या दिवशी याने तिच्या बाकावर लिहून ठेवले "माझ्याशी लग्न कर" आणि, एक बाणाचे चिन्ह काढून स्वत:च्या बाकाकडे दाखवले.

काही दिवसांने याने तिचा नंबर मिळवला. थेट तिला एस.एम.एस. करायला सुरुवात केली. पहिल्याच दिवशी याने तिला जवळ जवळ २० एस.एम.एस. करून टाकले. शेवटच्या एस.एम.एस. मध्ये लिहिले - "कुणाल, हा माझा नवीन नंबर आहे, नोंद करून ठेव." .... सोहम.

असे केल्यामुळे, प्रकरण वाढले तरी, सांगता येणार होते "मी कुणाल समजून तिला एस.एम.एस करत होतो."

पण, याने कधीही, काहीही लपवून केले नव्हते. त्यामुळे, दुसऱ्या दिवशी फळयावर तिच्यासमोरच

याने लिहून ठेवले "मला माफ कर". हे फक्त तिला आणि त्यालाच माहिती होते. बाकी कोणालाही न कळता, याने तिच्याशी विना बोलता आपल्या भावना सांगायला सुरुवात केली होती.

संध्याकाळी हा पार्किंगमध्ये जाऊन थांबला. तिला गाठून पुन्हा याने माफी मागितली.

ती इंग्रजीमध्ये बोलत होती, तर सोहम मराठी मध्ये. तिने चेहऱ्यावरचा स्कार्फ सुद्धा हटवला नाही. ती म्हणाली, "चुका होतच असतात?"

इथेतरी गप्प बसावे की नाही? पण, हा रोजच एक-दोन एस.एम.एस. करत राहिला. ती अधे मध्ये कॉलेजमध्ये आली नाही, की हा सबमिशनची, पेपरची, वेळा-पत्रकाची माहिती, तिला एस.एम.एस ने द्यायचा.

एकदा ती वर्गात खोकत असताना याने ओळखले "हीला कोरडा खोकला झाला आहे". याने संध्याकाळी पुन्हा एस.एम.एस. पाठवला "तुला कोरडा खोकला झाला आहे, गुळ आणि हळदीचे मिश्रण, गोळया बनवून खा."

जवळ जवळ दोन महिने हा एस.एम.एस पाठवत होता आणि ती सुद्धा काही बोलली नाही.

तर, असेच पहिले सत्र संपले. परीक्षा झाल्या. याला सगळे पेपर, परीक्षा सोप्या गेल्या. आता दुसरे सत्र सुरु होणार होते.

दुसरे सत्र म्हणजे, कॉलेजमध्ये सगळे "रोज डे, चॉकलेट डे, मिस-मॅच डे" वगैरे दिवस असायचे. तसेच, १४ फेब्रुवारी सुद्धा जवळच होता.

१४ फेब्रुवारी जवळ येत होता. १४ फेब्रुवारी म्हणजे, "प्रेमाचा दिवस". याला मनातून खूप वाटत होते "तीला सगळे सांगावे, बोलून टाकावे". ती भेटली की तिला काय बोलायचे? तिला काय सांगायचे? याचे तो रोज प्लॅनिंग करू लागला. पण, फक्त एस.एम.एस करण्यापलीकडे याच्यामध्ये हिंमत नव्हती. त्यातच, १४ फेब्रुवारी अलीकडचा पूर्ण एक आठवडा ही कॉलेजलासुद्धा आली नाही.

तू येत नसलीस तरी, मी मात्र रोज येत असतो....
तू भेटलीस की काय बोलायचे?, शंभर वेळा ठरवत असतो.....
फडतूस चारोळया करत असतो, पुन्हा खोडून टाकत असतो....

दर्द येतच नसतो शब्दांत ..... कसेतरी शब्द जोडून टाकत असतो... (पहा ना, जोडून आणि खोडून, जोडलेच आहे की नाही? थांब आता, कुठेतरी तोडून जोडतो...)

अचानकच कुठून तरी, चांगले शब्द सुचतात.. भावना कागदावर उतरतात.......आणि कविता तयार होते....

श्रावणाच्या सरी, जणू काही वैशाखातच बरंसतात.....
आता बास कर पकवणे म्हणून, ढग सुद्धा गरजतात.....
संदीप खरे व्हायचे असते, शब्दच फक्त सुचत नाहीत...
काय करू कल्पना माझ्या, त्या उंचीवर पोचत नाहीत..

पण,
भावनात्मक होत नसली तरी, विनोदी कविता तयार होते....
दु:खाच्या काही क्षणात, हसण्याचा बहाणा देऊन जाते.....
आज मला कळून आले... पुढे फार रडायचे आहे...
देवालाच फक्त माहिती असेल, अजून काय घडायचे आहे...

तर मग,

उद्या रडणार असलो तरी, आज थोडे हसून घेतो....
विषय बाजूलाच राहायला नको, पटकन आता विषयावर येतो....

हा रोज वाट पहायचा. "ती आज येईल, ती आज येईल" पण ती काही येतच नव्हती. रोज याचा हिरमोड व्हायचा. पण, पुन्हा दुसऱ्या दिवशी हा नवीन उत्साहाने रोज कॉलेजला जायचा. दोन-दोन महिने शाळा बुडवणारा मुलगा आता रोज कॉलेजला जाऊ लागला होता.

दरम्यान, अक्षय आता एकांकिका स्पर्धांमध्ये भाग घेऊ लागला होता. पुरुषोत्तम करंडक, व्यावसायिक नाटकांमध्ये अक्षय खूप पुढे गेला होता. अक्षयने सोहमसाठी पुरुषोत्तम करंडकाच्या एकांकिकेचा एक पास दिला. तसे अक्षय आता दुसऱ्याच कॉलेजमध्ये शिकत होता. पण संकेत, अक्षय आणि सोहमची मैत्री, अजूनही छान होती. नेमके, अक्षयची एकांकिका १४ फेब्रुवारीलाच होती. सोहमला, कोथरूडच्या एका मोठ्या

नाट्यगृहात जायचे होते.

१२ फेब्रुवारी गेली, १३ फेब्रुवारी गेली. पण ती काही कॉलेजला आली नाही. शेवटी याने ठरवले, "उद्याही ती येईल असे वाटत नाही". त्यापेक्षा, आपण अक्षयच्या एकांकिकेला जावे. आणि असेही, मानले तर रोजच १४ फेब्रुवारी असतो".

७ दिवस वाट पाहिली,
१च दिवस पहाणार नाही.....
आजच दुसऱ्याची होऊ नकोस..
नाहीतर मी, मी रहाणार नाही.....

दुसऱ्या दिवशी सोहम संकेतच्या घरी गेला. संकेतला घेऊन कोथरूडला गेला. एकांकिका पहात असताना याला जाणवले "कोणीतरी मुलगी, जी पहिल्या रांगेत बसली आहे, ती आपल्याकडे पाहत आहे". याने नीट पाहिले. "अरे, ही तर तीच मुलगी, जिला आपण रोज एस.एम.एस करतो." नेमका, हा दोन मुलींच्या मध्ये बसला होता. ती अगदी वैतागलेल्या नजरेने वळून वळून मागे पहात होती. याने आधी दोन्ही मुलींना दुसरीकडे बसायला सांगितले आणि स्वत: एका मित्राशेजारी बसला. कारण १४ फेब्रुवारी होती ना, आणि तिला असे नको वाटायला की "याचे आधीच प्रेम-प्रकरण चालू असताना, हा मला एस.एम.एस करत होता".

तिच्या चष्म्यामुळे याला समजतच नव्हते, की ती कुठे पहात आहे.

चष्म्यामागे लपलेल्या, तुझ्या नाजूक डोळयातल्या ...
भावना कोणत्या समजत नाही....
एकांताच्या भावनेशिवाय,
मनाला काहीच उमजत नाही.....

तू गर्दीत होतीस तरी, कोण जाणे एकटी वाटलीस.....
प्रत्येक माझ्या कवितेत पुढे, तूच आठवण होऊन दाटलीस...
दु:ख मनात साठवले होतेस, हसरा मुखवटा ओढला होतास...
अस्तित्वच संपवले होतेस स्वत:चे .. दु:खाशी संबंध जोडला होतास?

याने मनातच विचार केला. "मी सुद्धा इथेच आहे, देवानेच आपली प्रेम-कहाणी लिहिली आहे" गेले

७ दिवस मी तुझी वाट पहात होतो. पण तू कॉलेजला आली नाहीस." नेमके दैवाने, आज १४ फेब्रुवारीच्या दिवशीच, तुझी आणि माझी भेट तिसऱ्याच ठिकाणी घडली."

सपना म्हणाली "अरे, घाबरतोस काय? जा जाऊन बोल तिच्याशी, ती तुझ्या वर्गात आहे ना?" सोहम निघाला, तो तिच्या बाजूने चालत गेला. पण त्याची बोलायची हिंमत झाली नाही. एकांकिका संपल्यावर, ती निघेपर्यंत हा लांबूनच पहात राहिला.

हिंमत झाली नाही ग, जवळ येऊन बसण्याची.....
दोन क्षण बोलण्याची...भावना तुला सांगण्याची.....
बायको माझी होशील का, साथ मला देशील का?
हिंमत झाली नाही ग................हात तुझा मागण्याची...

सुट्टीमध्ये जेव्हा हा इंटरनेट वर जायचा, तेव्हा त्याला एक नवीनच मित्र मिळाला होता. हा मित्र, थोडासा मुलींसारखा होता. मुलींसारखा वागायचा. घरातल्या लोकांनीसुद्धा याला, मुलीसारखा असल्यामुळे सोडून दिले होते. कळत असल्यापासून हा एकटाच रहायचा. याचे कोणाकडे येणे-जाणे नव्हते, की कोणाचे याच्याकडे येणे जाणे नव्हते. सोहमला वाटायचे "गरीब मुलांना सगळेच वाळीत टाकतात, कोणीच यांच्याशी व्यवस्थित बोलत नाही." एखाद्या व्यक्तीला थोडीशी खुषी दिली म्हणून काय बिघडले?" म्हणून हा अधे-मध्ये त्याला भेटायला जायचा. तसेच, आधी सांगितल्याप्रमाणे, कोणी एकटे दिसले की सोहमला पहावयाचे नाही. अश्या एकट्या व्यक्तींना सोहम सोबत करायचा.

तर, सोहमचा हा मित्र मानसिकदृष्ट्या एकटा पडला होता. त्याला मनोरंजनाचे, फक्त इंटरनेट हेच एक साधन होते. हा पठ्ठ्या इंटरनेटवर टॅरो-कार्ड शिकला होता. हीच विद्या वापरून तो भविष्यसुद्धा सांगायचा. खरेतर लोकांशी बोलता यावे म्हणून, कोणीतरी बोलण्यासाठी मिळावे म्हणून, कोणीतरी मित्र मिळावा म्हणून, आपला एकटेपणा दूर व्हावा म्हणून त्याने भविष्य सांगायचा बुरखा ओढलेला असावा.

तर, जेव्हा एकांकिका संपली. सोहमची आवडती मुलगी निघाली. सोहम थेट त्याच्या या मित्राकडे गेला, त्याचे भविष्य जाणून घेण्यासाठी.

मित्राने सोहम् समोर काही पत्ते ठेवले. त्यापैकी पाच निवडायला सांगितले.

सोहमने पत्ते उचलले. सोहमने पहिले कार्ड काढले. पहिल्याच कार्डावर दोन प्रेमिकांची चिन्ह होती. दुसरे कार्ड होते राणीचे, तिसरे होते मूर्ख माणसाचे, चौथे होते, रस्त्यावर पडलेल्या काठ्यांचे, पाचवे होते सूर्य

प्रकाशाचे.

सोहमने उचललेले पत्ते पाहून मित्र म्हणाला

१. दोन प्रेमिकांच्या कार्डाचा अर्थ आहे की "तिला तू आवडतोस.
२. राणीच्या कार्डाचा अर्थ होतो की "तुमची जोडी जमू शकते"
३. मूर्ख माणसाच्या कार्डाचा अर्थ होतो की "पुढे काय करायचे, कसे वागायचे हे तुला कळत नाही आणि कळणार नाही.
४. रस्त्यावर पडलेल्या काट्यांच्या कार्डाचा अर्थ होतो की "तुमच्या प्रेमात खूप अडथळे असणार आहेत".
५. सूर्यप्रकाशाच्या कार्डाचा अर्थ होतो की "तुमच्या दोघांचीही मित्र किंवा मैत्रिण असणारी व्यक्ती, तुम्हाला मदत करेल.

आता सोहम विचार करू लागला. "तिच्या ओळखीचे कोणीही माझे मित्र नाही. तिचा सगळा ग्रुप श्रीमंत वाटतो. आपण असे मध्यमवर्गीय. आपल्याशी कोणीतरी बोलेल का?". मग असे कोण असेल, जे मला मदत करेल?

एव्हाना "आपणही तिला आवडतो. देवानेच आपली प्रेम कहाणी लिहिली आहे. म्हणूनच, आज १४ फेब्रुवारीच्या दिवशीच ती आपल्याला दिसली. ती आपल्याकडेच पहात होती." असे समजून त्याने भीत भीत ठरवले "तिला प्रपोज करायचाच". पण, दोन महिने एस.एम.एस. करत असल्यामुळे आणि, लहानपणापासून सोहम कमी बोलत असल्यामुळे, त्याला बोलण्याची अडचण वाटू लागली. इथे पुन्हा खरा सोहम बाहेर पडला होता.

मग हिला सांगायचे कसे की "तू मला आवडतेस?" याने पुन्हा एस.एम.एसच करायचे ठरवले. रात्री याने मस्तपैकी दोन तीन इंग्रजी सिनेमांमधले डायलॉग पाठ करून लिहून टाकले. हेच डायलॉग त्याने तिला एस.एम.एस केले.

त्यापैकी एक म्हणजे "जर तुला वाटत असेल, की मी हैवान आहे. तर असेलही कदाचित. पण, कारण मी नर्क पाहिलेला आहे. तू हात पुढे कर, या नरकातून मला काढण्यासाठी. मी तुझे आयुष्य स्वर्ग बनवेन.". (If you think I am a devil, may be I am but, because I have lived in a hell. Take me out of it and I will make your life not less than heaven). (हा डायलॉग troy सिनेमामधला

आहे.)

पुढच्या एस.एम.एस मध्ये, याने तिला परवानगी मागितली "मी तुला फोन केला तर चालेल का?". पहिल्यांदा तिचा मेसेज आला "मुला, मला काहीही रस नाही. आणि यापुढे मला मेसेज करणे थांबव."

ऐन १४ फेब्रुवारीच्या दिवशीच याचे प्रेम विफल झाले होते. हा एकदम दु:खी झाला. रात्रभर झोपला सुद्धा नाही. पण याने ठरवले. "जर तिला आवडत नसेल, तर मेसेज नाही करायचा". पुढे, दुसऱ्या आणि शेवटच्या सत्रासाठी कॉलेज सुरु झाले. पण हा १४-१५ दिवस कॉलेजलाच गेला नाही.

तू नसशील आयुष्यात, तर नुसतं पाहून काय करू?
झालीस उद्या कोणाची, तर मी काय नुसता झुरू?

शेवटी कुणालने याला फोन केला "अरे उद्या निकाल आहे". आता, निकाल घ्यायला तर कॉलेजमध्ये जायलाच लागणार होते. हा कॉलेजला गेला. याने निकाल घेतला. पैज लावल्याप्रमाणे, याला खरेच विशेष प्राविण्य मिळाले होते. पण हा खुष नव्हता. सगळी मुले याला विचारू लागली होती "तुला कसे काय एवढे गुण मिळाले?" पण याचा सांगण्यात काहीच रस उरला नव्हता.

हा खाली कट्ट्यावर येऊन बसला. पहातो तर, ती समोरच उभी होती. बहुदा तिलासुद्धा चांगले गुण मिळाले असणार, म्हणून आईस-क्रीम खात होती. आईस-क्रीम खाता खाता, ती इकडे तिकडे आनंदात पहात होती. अधे मध्ये त्यांची नजरा नजर होत होती. पण, तिने पाहिले की सोहम नजर चोरू लागला. याला वाटले "ती आपल्याकडेच हसून हसून पहात आहे".

पण याने निश्चय केला. "कदाचित गेल्यावेळेस प्रमाणेच, यावेळीसुद्धा हा आपल्या मनाचा खेळ असेल. सुंदर मुलीने पाहिले की आपण लगेच विरघळतो, हे काही नवीन नाही." त्यामुळे आपण, आता गुपचूप अभ्यास करून पास व्हायचे. आई-बाबांची स्वप्ने पूर्ण करायची. वाईट मार्गावर जाण्याचा आपण नेहमी कच्चून प्रयत्न केला आहे. पण, आई-बाबांच्या आणि देवाच्या आशीर्वादानेच, देवाने आपल्याला ओढून इथपर्यंत आणले आहे. हाता तोंडाशी आलेला घास नको घालवायला."

तुझ्या गोऱ्या रंगाला, आता मी भुलणार नाही....
तुझ्या मोहक हसण्यासाठी, आता मी झुलणार नाही...

मी नसताना तुझ्यावर सुद्धा,
रंग कोणताच खुलणार नाही....

आता हा प्रथमच शिक्षणासाठी कॉलेजला जाऊ लागला. १०-१५ दिवस झाले. हा व्यवस्थित शिकत होता. पण चोरून चोरून तिच्याकडे पहायचा. तिने पाहिले की नजर वळवायचा.

नजर आपोआप खाली जाते, नजर तुझ्याशी मिळताना.....
हृदय धडकण्याची गती, एकाच वेळी जुळताना...
तुला कल्पनाच नसेल ग, कसे वाटते जळताना......
भ्रामक मनीच्या कल्पना घेऊन, तुझ्यामागे पळताना.....

एकदा याला वाटले की, ती तिच्या बाकावर काहीतरी लिहिते आहे. वर्ग संपल्यावर याने जाऊन पाहिले. तिथे भरपूर काय काय लिहिले होते. जसे की "आदित्य", चेतन, अशी कोणाकोणाची नावे लिहिली होती. तसेच, "मला काही कळत नाही." इंजिनिअरिंग फार वाईट आहे." वगैरे वगैरे. अजूनही एक वाक्य याला बाकावर लिहिलेले आढळले, ते म्हणजे "फार घाई केलीस.".

याने नेमके कामाचे वाक्य लक्षात ठेवले. आता हे तिने लिहिले होते का? ते माहिती नाही. पण सोहमचा आता गोंधळ उडू लागला होता. हा विचार करू लागला "फार घाई केलीस चा अर्थ काय असेल?" हे तिनेच लिहिलंय का पण?"

"ती असे कशाला लिहील?" पण तिनेच लिहिले असेल तर?" पण असे कशासाठी लिहिले तिने?" एव्हाना यानेच याच्या मनाची खात्री करून टाकली होती की "हे तिनेच लिहिले आहे". आता याच्या उडणाऱ्या गोंधळाचा विनोदी सिनेमा सुरु होणार होता.

आधी सांगितल्याप्रमाणे, सोहम बोलायचा कमी आणि मनातच गोष्टी रंगवायचा. याच्या मनातल्या गोष्टी म्हणजे अगदी अजब असायच्या. छत्री घेऊन बिल्डींगवरून पॅराशुट सारखी उडी मारली, तर आपण जगुत की मरुत? उन जास्त झाले की सगळया पृथ्वीलाच पत्र्याने झाकून टाकले, तर काय होईल? पृथ्वी स्वत:भोवती फिरते, पृथ्वी अंड्यासारखी आहे. मग, पृथ्वीचा कोणता ना कोणता भाग प्रत्येक वेळेस खालच्या बाजूला असणारच की? मग जरी, गुरुत्वाकर्षणामुळे आपण पृथ्वीवर चिटकून असलो. तरी, खालच्या भागावर उभी असलेली माणसे उलटी का दिसत नाहीत? पिंपळाचे झाड सगळयात जास्त ऑक्सिजन देते. मग लोक, आंब्याची, इतर फळांची झाडे लावायचे सोडून पिंपळाची झाडे का लावत नाहीत? असे प्रश्न वयाच्या २५व्या

वर्षीसुद्धा सोहमला पडायचे.

तो पुन्हा विचार करू लागला "फार घाई केलीस याचा अर्थ काय असेल बरे?" याने मनातूनच एक सिनेमा रंगवायला सुरुवात केली.

जे वाक्य तिने लिहिले की नाही? हे माहिती नाही. त्याचा याने अर्थसुद्धा काढला. "बहुतेक प्रेमात तिला कोणीतरी धोका दिला असणार. कदाचित यामुळेच ती एकटी रहात असेल." आणि ती सावरतच असेल, की मी तिचा मित्र झालो आणि तिला मेसेज करू लागलो." मी सुद्धा एकदम घाई करून, ती १४ फेब्रुवारीला दिसताच तिला प्रपोज करून टाकले".

पहायला गेले तर, तिच्या आयुष्यात ती खुष असावी. पण, सोहमच्या कल्पनेत ती एकटी होती.

तर, याने कल्पनेनेच तिचा ब्रेक-अप सुद्धा करून टाकला. आता सोहमच्या दृष्टीने, तोच एकटा तिचा मित्र होता आणि बाकी सगळे असेच.

"अरे, म्हणजे ती आपल्याला चांगला मित्र समजत होती. हळू हळू तिला आपण आवडणार होतो पण आपण घाई केली" असे त्याला वाटू लागले.

पुढे सोहम चांगलाच गोत्यात येणार होता. ही तर फक्त सुरुवात होती.

"ही दु:खी आहे" असे समजून त्याने ठरवले "पुढे काहीतरी केले पाहिजे". कॉलेज सुटल्यावर आणि सगळे गेल्यावर, याने पुन्हा तिच्या बाकावर जाऊन लिहून ठेवले "कोणीतरी, प्रचंड मोठ्ठे दु:ख डोळयात लपवून कसे काय इतरांना माफ करू शकते.?" यासाठी देवाचेच मन हवे." (how can someone hide huge pain in those eyes and still forgive others? it has to be god's heart).

याचा म्हणण्याचा अर्थ होता की, "तू स्वत: फार दु:खी असताना मला माफ केलेस आणि तुझे मन देवासारखे आहे". याने तिला देवच बनवून टाकले होते.

घरी गेल्यावर याने पुन्हा तिला मेसेज केला "मला माहिती नाही, की तू मला काय समजतेस. मला माहिती नाही, की तू माझे मेसेज वाचतेस तरी की नाही. पण मी नेहमी तुझ्यासोबत आहे."

दुसऱ्या दिवशी सकाळीच हा घाबरत घाबरत कॉलेजला गेला. ती सुद्धा आली आणि नेमकी त्याच

बाकावर बसली. आज तिने गुलाबी रंगाचा टी-शर्ट घातला होता. याच्या मनाचे खेळ पुन्हा सुरु झाले. याने विचार केला "मुली कपड्यांच्या भाषेत बोलतात, रंगांच्या भाषेत बोलतात. गुलाबी रंगाचा अर्थ म्हणजे "अर्धे प्रेम, किंवा प्रेम करत असण्याची सुरुवात" असा त्याने अर्थ लावला.

"ती बाकावर लिहिलेले वाचेल आणि पुढे काय करेल?" हा विचार करून सोहम तिच्याकडे बारीक लक्ष देऊ लागला. याला नेमकी ती रडताना दिसली. याला वाटले "आपण बाकावर जे लिहिले आहे, ते वाचून ती रडत आहे".

झाले, हा सुद्धा भर वर्गात रडू लागला. याला वाटले "आपण उगाचच तिच्या दु:खावर बोट ठेवले, आणि तिला रडवले". खरेतर ती रडत नसावी, चष्मा काढून डोळे पुसत असावी. (खरे खोटे तिलाच माहित).

नेमके, मॅडम शिकवत असताना, मुले मागून खडूने मारामारी करत होती. सोहमचे, शेवटच्या बाकावर बसून स्वत:च्याच धुंदीत रडणे चालू होते. मॅडमने सोहमला पुढे येऊन एक गणित सोडवण्यासाठी सांगितले. सोहम म्हणाला "मॅडम, मला नाही येत या प्रश्नाचे उत्तर. मी खडू नव्हतो मारत." मला शिक्षा नका करू". पण मॅडमने ऐकले नाही.

सोहम जसा पुढे आला, तशी मुले याला उत्तर सांगू लागली. पण सोहमला काहीच कळले नाही. आणि २-३ प्रयत्न करूनही त्याला गणित सोडवता आले नाही. शेवटी कंटाळून मॅडमने याला परत पाठवले.

हा परत बाकावर आला. नेमकी ती मुलगी खोकायला लागली. जवळ जवळ १५-२० मिनिटे ती जोरजोरात खोकत होती. याची स्वप्नांची दुनिया अजूनच मोठी झाली. याने अजून एक ग्रह करून करून घेतला "आपण काल तिला विचारले होते, तू माझे मेसेज वाचतेस की नाही? हे मला माहिती नाही".

तर आपल्याला, ती आपण पाठवलेले मेसेज वाचते, हे दाखवण्यासाठीच तिने खोकून इशारा केला असावा." असेही आपण मागे तिला मेसेज केलाच होता "तूला कोरडा खोकला झाला आहे, हळद आणि गुळाच्या गोळ्या बनवून खा".

तर आता विना काही बोलता, सोहमने आपल्या भावना तिच्यापर्यंत पोचवल्याच होत्या. संवादाला भाषेची गरज नसते. सोहमने, मनातल्या मनात तिच्याशी लग्नसुद्धा केले असावे.

त्या दिवशी हा तिचा बाक तपासायला विसरला. मध्ये शनिवार आणि रविवार होता, यांना सुट्टी होती. पण, दुसऱ्या वर्गाचे क्लास चालूच होते. सोमवारी हा पुन्हा तिच्या बाकापाशी आला. "काही इशारा

मिळतो का?" ते पाहायला लागला.

याने जे लिहिले होते "कोणीतरी, प्रचंड मोठ्ठे दु:ख डोळ्यात लपवून कसे काय इतरांना माफ करू शकते.?" यासाठी देवाचेच मन हवे." (how can someone hide huge pain in those eyes and still forgive others? it has to be god's heart).

त्या पुढे कोणीतरी लिहिले होते **"किंवा खरे प्रेमी".**

म्हणजे, याने बाकावर जे लिहिले होते, ते पुढीलप्रमाणे झाले "कोणीतरी, प्रचंड मोठ्ठे दु:ख डोळ्यात लपवून कसे काय इतरांना माफ करू शकते.?" यासाठी देवाचेच मन हवे **किंवा खरे प्रेमी**." (how can someone hide huge pain in those eyes and still forgive others? it has to be god's heart **or a true lover**).

आता नवीन वाक्य कोणी जोडले होते? ते याला समजेनासे झाले. पण याची कल्पना पुन्हा सुरु झाली. याच्या मनाची खात्रीच झाली "हे तिनेच लिहिले आहे. पण, तिच्या लिहिण्याचा अर्थ काय? "आता देव कोण आणि खरे प्रेमी कोण?". ती मला देव म्हणाली? की मी तिला देव म्हणालो?" मी तर तिलाच देव म्हणालो होतो." मग हा खरा प्रेमी कोण?"

"मी खरा प्रेमी, का ती खरी प्रेमी?" जर मी खरा प्रेमी असेल, तर मी कशाबद्दल तिला माफ केले? तिने तर काहीच चूक केली नव्हती. आणि, जर ती खरी प्रेमी असेल, तर तिचे प्रेम कोणावर आहे? अजूनपर्यंत आम्ही एकदाही बोललो नाही. मग तिचे माझ्यावर खरे प्रेम एवढ्यातच कसे काय बसले? मग या **"किंवा खरे प्रेमी"** या शब्दाचा अर्थ काय?"

पुढे याच **"किंवा खरे प्रेमी"** या शब्दाने फार मोठा गोंधळ उडवून दिला होता.

शेवटी याने अर्थ काढला "कोणीतरी, प्रचंड मोठे दु:ख डोळ्यात लपवून, कसे काय इतरांना माफ करू शकते? या साठी देवाचेच मन हवे, **किंवा खरे प्रेमी".**

याचा अर्थ असा काढला गेला की "तिचे इतर कोणावर तरी खरे प्रेम होते, ते तुटले. मग मी आयुष्यात आलो". "पण, तिने मला माफ का केले?" मी तर धोका दिला नव्हता.". माफी कशाबद्दल?.

ज्या अर्थाने याने तिच्या बाकावर संदेश लिहिला होता, त्याचा मूळ अर्थच हा बाबा विसरून गेला.

पुन्हा मनाचे खेळ सुरु झाले "ती मला मित्र समजते. आणि तिला मी लग्नाच्या दृष्टीने योग्य नाही

वाटत."

याने मनानेच स्वत:च्या प्रेम कहाणीचा अंत करून घेतला.

म्हणजे आता, हा कुछ कुछ होता है मधला सलमान खान झाला होता. स्वत:च्या प्रेमाचा त्याग करून, याने मनातल्या मनातच तिचे तुटलेले प्रेमप्रकरण पुन्हा जुळवून दिले. पुढे काही दिवस त्याच्या मनाचे खेळ चालूच राहणार होते.

पण, जो अर्थ याने काढला होता, त्या अर्थावर याचे मन ठाम नसायचे. कधी वाटायचे, "तिचे आपल्यावरच प्रेम आहे". कधी वाटायचे, "तिचे आपल्यावर प्रेम नाही". आता याला मनातून तिच्याशी खूप बोलावेसे वाटायचे. पण हिंमत साथ देत नव्हती. दोन-चार मुलांशी हा सहज भांडला असता. पण तिच्याशी बोलायचे म्हणजे अशक्यच.

याने पुन्हा घाबरत घाबरत, रोज एक मेसेज पाठवायला सुरुवात केली. बहुदा ती सुद्धा, लहानपणीसारख्या सोहमसारखीच असावी. ती काही सात सात-आठ आठ दिवस कॉलेजलाच यायची नाही.

सोहमचे तत्व होते "कोणाही मुलीच्या मागे मागे जायचे नाही". तिच्या घराजवळ जायचे नाही, कोणालाही छेडायचे नाही". (सोहमसारख्या मुलाची सुद्धा तत्वे असतात तर. डायरेक्ट नंबर घेऊन, ओळख पाळख नसताना मेसेज करणे याच्या तत्वात कसे बसले कोणास ठाऊक? हे त्यानेच लिहायला सांगितले आहे मला).

असो, तर याला रोज तिची खूप आठवण यायची. पण याच्या तत्त्वांनुसार, हा कधीही तिच्या घराच्या आजूबाजूला चुकूनही फिरकायचा नाही. रोज कॉलेजमध्ये, एकाच जागी थांबून तिची वाट पहायचा. प्रत्येक तासाच्या मध्ये हा, ती आली का नाही हे सारखा तपासायचा. पण रोजच त्याचा हिरमोड व्हायचा. अधे मध्ये, ७-८ दिवसांने ती कॉलेजला यायची. फक्त प्रात्यक्षिक (प्रॅक्टिकल) ला येऊन थेट घरी निघून जायची. ज्या दिवशी ती येईल, तो दिवस सोहमसाठी दिवाळी असायचा. पण सोहम, रोज न कंटाळता तिची वाट पहायचा.

तिला पाहून आता १५ दिवस झाले होते. पण ती आली नाही. "समोरून काहीही प्रतिसाद मिळत नाही म्हणल्यावर, आपण तरी मेसेज करून काय फायदा? असेही, आपली मैत्रीसुद्धा नसताना आपण तिला मेसेज करतो. ती आपल्या करिअरचे नुकसान करू शकली असती. पण अजून तरी, तिने तसे काहीच केले

नाही". हे मात्र त्याला समजत होते. एकीकडे, मनामध्ये तिच्याविषयी प्रेम होते. तर दुसरीकडे, "आपण तिचे मित्र नसतानाही तिला मेसेज करतो" ही अपराधीपणाची भावना सुद्धा होती. असा एकाच वेळेस, दोन वेगळया वेगळया भावनांशी सोहम भांडत होता.

"तिने घरी सांगितले नाही किंवा पोलीस कम्प्लेंट सुद्धा केली नाही. ती खरेच देवी आहे. आपण लहानपणापासूनच वेडे आहोत. सगळयांना खूप त्रास दिलाय आपण. आता हिला त्रास नको द्यायला" असे समजून त्याने मेसेज करणे बंद करण्याचे ठरवले.

पण तिच्याशिवाय कॉलेजमध्ये करमत सुद्धा नव्हते. हा रोज २-३ वाजेपर्यंत तिची वाट पहायचा. पण ३ वाजले, आणि तरीही ती नाही आली की हा रडवेला व्हायचा. वर्गात, शिक्षणात पुन्हा लक्ष लागेनासे झाले होते. पहिल्या सहामाहीमध्ये तर चांगले गुण मिळाले होते. पण, दुसरी सहामाही सुटेल की नाही? हे सांगता येत नव्हते. "ती आज येईल, उद्या येईल, कोणत्याही बाकावर बसेल" असे समजून तो रोज प्रत्येक बाकावर काहीतरी लिहून ठेवू लागला. मेसेज करता येत नव्हता म्हणून, हा बाकावर लिहून ठेऊ लागला.

(सोहमच्या आयुष्याची आता दु:खद कहाणी सुरु आहे. पण, सारखे दु:खच नको, थोडासा विनोद नको का? तर, थोडेसे गोष्टी बाहेरचे, स्वत:च्या मनाचे काही ऐकवतो...गोष्ट थोडी विनोदी नको का करायला? )

मागे सोहमने, असेच कोणत्यातरी एकटी राहणाऱ्या मुलीसाठी कविता केली होती. आयुष्यात येणाऱ्या प्रत्येक नवीन मुलीला, हा तीच एकमेव कविता चिटकवून देत होता. यावेळीसुद्धा त्याने तिच्या बाकावर, ही भली मोठी कविता तिलासुद्धा चिटकवून दिलीच. बाबाने कवितासुद्धा अशी केली होती, जी कोणालाही दिली तर त्या व्यक्तीला वाटणारच "ती आपल्या दु:खावरच लिहिली आहे".

तर, त्याची कविता पुढील प्रमाणे.......

फुलासारखे डोळे तुझे, एवढे का कठोर झाले?
नजर सारखी चोरताना, तुझेच ते चोर झाले?
तुला विसरून सगळे जण, आपल्या आपल्या जगात रमले...
नवा खेळ मांडायचे, फक्त तुलाच कसे नाही जमले?

एवढे दु:ख झेलताना, एवढ्या जखमा सोसताना
हृदयाचे किती हाल झाले असतील?
पण,

चादर घेऊन रडताना, दाबून हुंदके भरताना,
ते अश्रू कोणालाही दिसले नसतील?

____ तुझ्या मनावर कोणी एवढे आघात केले?
(आता या ____ च्या जागी, कोणत्याही मुलीचे नाव टाकले, की काम फत्ते.)
तर,
मानसी तुझ्या मनावर, कोणी एवढे आघात केले?
जणू काही,
आनंदाने धडकणारे हृदय,
अचानकच कोणीतरी फाडून नेले.
(हे वाचून कोणतीही मुलगी खल्लास).

पिल्लू, समोर मरताना, नराधमाने त्याला मारताना,
आईला किती दु:ख होत असेल?
चल, जरा प्रकाशाकडे जाऊ, थोडासा उजेड पाहू, स्वप्नांची दुनिया सजवू,
तुला म्हणणारे, कोणीच नसेल?

पण, काळजी करू नकोस,

हाताची पाच बोटे, म्हणे की सारखी नसतात.
ज्यांने राक्षस पाहिले आहेत, त्यांनाच पुढे देव दिसतात.......

तुझाच प्रिय,
सोहम....

याचे तिच्यावर असणारे आकर्षण म्हणा, किंवा प्रेम म्हणा, ते इतके वाढू लागले होते, की हा जवळ जवळ वेडाच झाला होता. वर्गातला प्रत्येक बाक हा तपासू लागला. प्रत्येक बाक तपासताना, प्रत्येक बाकावर जे काही लिहिले असेल, ते हा वाचू लागला. आणि याच्या मनातला गोंधळ अजूनच वाढू लागला. हा वर्गात कोणीही नसताना बाक तपासायचा. पण कोणी आलेच, तर ते आता सोहमला वेडा समजू लागले होते.

इतक्यात वेडा समजू नका, थोडी समज बाकी आहे......
मी नसल्याचे दु:ख, आजही तिच्या नाकी आहे.

ती तर कॉलेजला येत नव्हती. पण, प्रत्येक बाकावर याला आवडतील अश्या गोष्टी लिहिलेल्या त्याला आढळू लागल्या. या गोष्टी वाचून त्याचा गोंधळ अजूनच वाढू लागला. महत्वाचे म्हणजे, तिच्याच बाकावर लिहिले होते "सोहम द डॉन." त्याच्याच पुढे कोणीतरी, "डॉन" या शब्दातले "न" हे अक्षर खोडून, तिथे "ग" हे अक्षर टाकले होते. म्हणजेच, "सोहम द डॉग" करून टाकले होते.

त्यात एक गोष्ट अजून आढळली. नेमके तिच्याच बाकावर, मोठ्या अक्षरात लिहिले होते "१३ ब".

जेव्हा याने पाहिले "१३ ब". याला आठवले "एक नवीन सिनेमा आला आहे, "१३ ब" नावाचा".

१३ हा आकडा भरपूर संस्कृतींमध्ये अशुभ मानला जातो. इंग्लंडमध्ये, अमेरिकेत, फ्रान्समध्ये, इटलीमध्ये, १३ हा आकडा अशुभ मानला जातो. १३ तारखेला जर शुक्रवार असेल तर, त्याला friday the १३th असे म्हणले जाते.

अमेरिकेत, 'friday the १३th' नावाचे कमीत कमी ३-४ सिनेमे तरी निघाले आहेत. आता १३ हा आकडा अशुभ मानण्याचे कारण म्हणजे, गेल्या काही शतकांमध्ये, अमेरिकेत, इंग्लंडमध्ये, फ्रान्समध्ये, इटलीमध्ये, १३ तारखेलाच अश्या काही घटना घडल्या, ज्यांमध्ये सामूहिकरीत्या एकाच वेळी अनेक लोकांचे मृत्यू झाले होते.

काही संस्कृतीमध्ये मानले जाते की, येशू ख्रीस्तांना सुळावर चढवण्याच्या आदल्या दिवशी १३ लोकांची एक सभा भरली होती. दुसऱ्या दिवशी म्हणजेच 'friday the १३th' ला, येशू ख्रिस्तांना सुळावर चढवले गेले. म्हणूनच 'friday the १३th' ला वाईट मानले जाते.

महत्वाचे म्हणजे, सोहमच्या भावाच्या, सहलीला गेलेल्या शाळेच्या बसचा अपघातसुद्धा त्रयोदशिलाच झाला होता (त्रयोदशी म्हणजे १३वा दिवस). तारीख होती ११ डिसेंबर १९९३. या अपघातात, शाळेतली फक्त ५-६ वर्षाची ३८ मुले, आणि दोन शिक्षक स्वर्गवासी झाले होते.

म्हणजेच, ३८ (मुले) + २ (शिक्षक) = ३ + ८ + २ = १३.

एकूण ९ ग्रहांपैकी, सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनी हे मुख्य ग्रह. आणि राहू - केतू हे छाया ग्रह आहेत. तर ज्या दिवशी ७ मुख्य ग्रह तीन राशींमध्ये असतात, त्या दिवशी शूळ हा योग निर्माण होतो.

त्या दिवशी ५ ग्रह एकाच (मंगळाच्या वृश्चिक) राशीत होते. वृश्चिक रास ही राशिचाक्रातली ८वी

रास. ८ या आकड्याचा आणि जीवन-मृत्यूचा संबंध आहे. नेमके, ११ डिसेंबर १९९३ या दिवशी, शूळ योगाबरोबरच अतिगंड योग होता. कदाचित यामूळेच, तो अपघात घडून ३८ मुले मृत्युमुखी पडली होती.

(हे सगळे विश्लेषण आम्ही नंतर केले आहे. सोहमला त्या काळी हे माहिती नव्हते).

याने ठरवले "तो १३ ब नावाचा सिनेमा पहायचाच". कदाचित यातून काहीतरी क्लू मिळणार होता. दोन तीन दिवसातच, सोहम हा "१३ ब" सिनेमा पहायला गेला.

या सिनेमामध्ये, हिरोच्या घराचा नंबर असतो "१३ ब".

या सिनेमामध्ये, हिरोच्या घरातसुद्धा आजकाल सारख्या दैनंदिन मालिका (daily soaps) पाहिल्या जात असतात (क्यो की सास भी कभी बहु थी, कहानी घर घर की, या गोजिरवाण्या घरात, चार दिवस सासूचे वगैरे वगैरे सारख्या). आणि, मालिकेमध्ये रोज जे घडत असते, तेच हिरोच्या घरात, हिरोच्या आयुष्यात सुद्धा घडत असते. म्हणजेच, हिरोच्या आयुष्याची गोष्टच, टी.व्ही वर रोज संध्याकाळी दिसत असते.

आज जे काही हिरोच्या आयुष्यात घडले होते, ते संध्याकाळी टी.व्ही वर लागणाऱ्या मालिकेत दिसत असते. महत्वाचे म्हणजे, ही सिरीयल फक्त हिरोच्याच घरी दिसत असते. शेवटी हिरोला समजते की, काही आत्मे टी.व्ही च्या माध्यमातून हिरोशी संपर्क साधत असतात. आयुष्यात पुढे येणाऱ्या संकटांना, हिरो तीच दैनंदिन मालिका पाहून सोडवतो.

सोहमला सिनेमा खूप आवडला. आजपर्यंत पाहिलेल्या सिनेमांमध्ये, हा "१३ ब" पाहून मात्र सोहम घाबरला होता. "सिरिअल्समध्ये (दैनंदिन मालिकांमध्ये) घडणाऱ्या गोष्टी, पुढे आपल्या सुद्धा आयुष्यात घडणार आहेत" असे त्याला वाटू लागले.

संध्याकाळी सोहम घरी आला. याच्या घरीसुद्धा, टी.व्ही वर अशीच एक मालिका सुरु होती. नेमके, त्यातला एक मुलगा सोहमसारखाच प्रेमात पडलेला असतो. पुढे तो मुलगा वेडा होतो.

आता सोहम एकदम घाबरला होता. त्याला वाटू लागले "आता आपण सुद्धा वेडे होणार." अगदी १३ ब सिनेमाप्रमाणे, सोहमच्या आयुष्यात सुद्धा तसेच घडू लागले होते. सोहम रोज दिवसभरात जे काही करायचा, तेच संध्याकाळी टी.व्ही वर दिसणाऱ्या मालीकेमधलें एखाद पात्रसुद्धा करत असायचे.

त्याने पुन्हा विचार केला आणि मनाची समजूत घातली "असे कुठे, मालिकांमध्ये जे काही दाखवतात, ते खरेच आपल्या आयुष्यात थोडीच घडणार असते?" काहीतरी योगायोग होत असेल.

पण आता सोहमला संशय येऊ लागला होता "आपल्याला आवडणारी मुलगी तर कॉलेजमध्ये येत

नाही. मग असे बाकावर कोण लिहित असेल?". सोहमला थोडासा संशय आला "आपल्यावर कोणीतरी नजर ठेऊन आहे." पण त्याने फार काही मनावर घेतले नाही.

पुन्हा सोहम कॉलेजमध्ये जाऊ लागला. रोज तिची वाट पाहू लागला. वर्ष संपायला फक्त दीड महिना शिल्लक होता. एकदा सबमिशन संपले की पुन्हा कॉलेजला येणे होणार नव्हते. थेट परीक्षेलाच ती दिसणार होती. सोहमची तिला भेटण्याची, तिच्याशी समोरासमोर बोलण्याची व्याकुळता वाढू लागली होती. पण ती काही अजूनही येत नव्हती. असेच २-३ दिवस गेले.

तुझी वाट पाहताना, एक एक दिवस मावळत होता,
तू दिसावीस म्हणून सूर्यसुद्धा, हळू हळू ढळत होता....
सेकंदाचा काटा मात्र, वाऱ्यासारखा पळत होता...
क्षण हातून निसटताना......जीव अग्गदी जळत होता.

सोहमने ठरवले "आता पुन्हा मेसेज करण्याशिवाय पर्याय नाही." याने पुन्हा मेसेज केला. तिला पुन्हा फोन करण्याची परवानगी मागितली. उत्तर आले "मुला, मी शेवटचे सांगत आहे, मेसेज करणे थांबव".

याने सगळ्यांप्रमाणेच ऐकले होते "मुली नेहमी इशाऱ्यातच बोलतात. काय म्हणायचे आहे, ते थेट सांगत नाहीत". याने आपल्या सोयीप्रमाणे, तिच्या मेसेजचा अर्थ लावला "मेसेज करणे थांबव, म्हणजे फोन कर".

प्रेम म्हणजे प्रेम असते," मेसेज करू नकोस" याचा अर्थ "फोन कर" असा कसा काय होऊ शकेल?

एव्हाना सोहम माझ्यासुद्धा चेष्टेचा विषय झाला होता.

तू मला थांबवण्यासाठी, प्रयत्न चोख केले होतेस....
मला तिथेच थांबवून माझे, मन मात्र नेले होतेस.....

अर्धे मन माझ्याकडे, दीड मन  तुझ्याकडे, (तुझे एक आणि माझे अर्धे)
अर्धे मन माझ्याकडे, दीड मन तुझ्याकडे....
कसा जगत असेल मी?, जरा थोडे समजून घे......
माझे मन नको मला, तुझे अर्धे पाठवून दे........
पण, हा आत्तापर्यंत मेसेजमध्येच बोलत होता. याला बोलण्याची सवयच राहिली नव्हती. काय

बोलायचे? ते सुद्धा माहिती नव्हते. तसेच हिंमत सुद्धा होत नव्हती. असेच दोन-तीन दिवस अजून गेले.

तुझ्याशी बोलण्यासाठी, तुझा सहवास मिळवण्यासाठी....
जीवाचा आकांत करून पडलो होतो......
खरच सांगतो, कित्येक रात्री,
हुंदके दाबून रडलो होतो......

शेवटी याने ठरवले "आता पुन्हा मेसेज करायचाच". याने पुन्हा मेसेज केला. यावेळेस फोन करण्याची परवानगी मागितली. पलीकडून काहीही प्रतिसाद आला नाही. शेवटी कंटाळून हा घरी आला. मांजरांना मासे टाकत असताना याला फोन आला. फोन तिच्याच नंबरवरून आला होता. एकदम याच्या डोक्यात विचार आला "हिने बहुतेक घरी सांगितले असावे."

तसेच झाले होते. फोन तिच्या वडिलांने केला होता. फोनवरून पुरुषाचा आवाज ऐकून याची विकेटच पडली. फक्त बेशुद्ध व्हायचेच राहिले होते.

तिचे वडील म्हणाले "का रे हिला सारखा त्रास देतोस?" कॉलेजमध्ये शिकायचे आहे ना? का कॉलेजमध्ये येऊन सांगू शिक्षकांना? शिकायला येतोस की असले धंदे करायला?"

सोहमला रडूच कोसळणार होते. पण त्याला माहिती होते "चूक आपलीच आहे", माफी मागितलीच पाहिजे".

सोहम म्हणाला "सर, (सोहम त्यांना सर म्हणाला. काका, मामा, नाही म्हणाला. कारण, काका मामा म्हणाला असता, तर ती याची बहीण ठरली असती ना. सोहम बाबाने इथेही चालाखी केलीच होती.) तर सोहम म्हणाला - "सर, मला माफ करा, माझ्यामुळे तुम्हाला खूप त्रास झाला. माझ्यामुळे खूप ताप झाला असेल तुम्हाला, तुमच्या मुलीला. "मी पुन्हा असे करणार नाही" मला माहिती आहे, तुम्ही खूप प्रतिष्ठित व्यक्ती आहात. तुम्ही कधीही माझे करियर बरंबाद करू शकला असता, पण तुम्ही तसे नाही केले."

सोहमला मनातून वाटत होते "द्यावे सगळे सांगून, की मला तुमची मुलगी किती आवडते" पण त्याची हिंमत नाही झाली. तिचे बाबा सोहमला २०-२५ मिनिटे झापत होते. आणि सोहम एवढा वेळ माफी मागत राहिला. शेवटी कसे तरी याने त्यांना पटवले. आणि सोहमचे फार मोठे नुकसान होण्यापासून वाचले.

सर, कसे सांगू तुम्हाला.....जावई तुमचा बनायचे होते.....
लग्न करशील का माझ्या मुलीशी? तुम्ही तरी म्हणायचे होते...

तसे तिचे वडील, एका मोठ्या प्रतिथयश कंपनीचे मालक होते. "कहा राजा भोज, कहा गंगू तेली?" त्यांने ठरवले असते, तर खरंच सोहमचा काही पत्ता सुद्धा नसता लागला. पण, सोहम आज जीवघेण्या संकटातून वाचला होता.

आता सोहमने ठरवले "आजपासून कानाला खडा. अभ्यास एके अभ्यास. ती दिसली तर दुसरीकडे निघून जायचे. नजरेला नजर द्यायची नाही.". आधीच आपण २५ वर्षाचे झालो आहोत. कमावण्याच्या नावाने बोंब आहे." वय वाढत आहे.". त्यापेक्षा आता गप्प बसायचे.".

बास, आता पुन्हा नाही.....आज वाचलो मरता मरता
हसणारा मी रडू लागलो, तुझ्यावर प्रेम करता करता
१० किलो वजन घटलंय, तुझ्यामागे फिरता फिरता...
अजूनच विद्रूप दिसू लागलोय, तुझ्यासाठी झुरता झुरता.....

केस गळू लागले आहेत, लगेच टकला होणार नाही...
खरंच टकला झालो तर, तुलाही ओळखू येणार नाही...
तू तर जाशील आनंदात, तुला कोणी नाकारणार नाही....
माझं अवघड होत चाललय, माझं लग्न ठरणार नाही......

दुसऱ्या दिवशी सोहम घाबरत घाबरतच कॉलेजला गेला. "कोण जाणे, तिच्या वडिलांची शिक्षकांसोबत ओळख असली तर? गेलोच आपण".

वर्गात येऊन याने आधी अंदाज घेतला. पण सगळे व्यवस्थित होते. वर्गात कोणालाही, काहीही समजले नव्हते. पण याची नजर तिला शोधतच होती. ती आली होती वर्गात. हा गुपचूप शेवटच्या बाकावर जाऊन बसला. आता, शेवटी बसण्याचे कारण म्हणजे, मागून पुढे पहाता पहाता ती दिसणार होती. आणि कोणालाही कळणार नव्हते. याने गुपचूप वही-पेन काढले. लिहायचे नाटक करू लागला. पण, पुन्हा अभ्यासात लक्ष लागत नव्हते.

लिहिण्याचे नाटक करता करता....
आयुष्यच नाटक झाले होते...
प्रेमाचे ते सुरेख क्षण......
५व्या-६व्या वेळेस जीवनात आले होते...

आज तिने हिरव्या रंगाचा टी-शर्ट घातला होता. हिरवा रंग पाहून सोहमने पुन्हा अर्थ लावला "हिरवे म्हणजे प्रसन्न, फ्रेश, आनंदित, वगैरे वगैरे. म्हणजे "आज ती खूप खुष असावी." कदाचित, माझ्यापासून पिच्छा सुटल्यामुळे तिला आनंद झाला असावा. म्हणून तिने तिचा आनंद, कपड्यांच्या रंगाने दाखवून दिला".

काही वेळाने, ती तिच्या मित्राबरोबर बोलताना दिसली. ती मित्राशी बोलताना इथे तिथे पाहून हसत असावी. सोहमला पुन्हा वाटले "ही आपल्याकडेच पाहून हसत आहे". याचे हृदय चौपट वेगाने धडकू लागले. बटाट्यासारखे डोळे अजूनच मोठे झाले. याच्या डोळयातून, भीती आणि निरागसपण टप टप वाहत होते. त्याची घाबरलेली नजर, सारखी तिच्याकडे आणि जमिनीकडे वळत होती, नजर चोरण्यासाठी.

पुन्हा याचा समज झाला "ती आपल्याकडेच पाहून हसत आहे". पण कालच्या प्रकारामुळे हिंमत गुंडाळली गेली होती. पुन्हा एकाच मुलीच्या प्रेमात पडावे वाटत होते. पण, हिंमत होत नव्हती. शेवटी, ती दिसू नये म्हणून सोहम बाजूला होऊन उलट थांबला.

रात्री झोप येत नव्हती. एकटाच पांघरूण घेऊन रडत बसायचा. कधी कधी हुंदके बाहेर ऐकू आल्यावर आई-बाबा-भाऊ विचारायचे "सोहम रडतोयस का रे? बरे नाही का वाटत?".

हा मोठ्या चालाखीने, काहीच झाले नाही असे दाखवून द्यायचा.

पण, तिचे आकर्षण काही गप्प बसू देत नव्हते. दुसऱ्या दिवशी कॉलेजवरून येताना याने ठरवले "कोणातरी अश्या मुलाची मदत घ्यायची, जो सहजपणे मुलींशी बोलू शकतो. ज्याची भरपूर प्रेम-प्रकरणे झाली आहेत". म्हणजे, तो लव्ह-गुरूच्या शोधात होता. हा तोच मित्र होता, ज्याला हा भेटायला गेला तेव्हा त्याची विराटसोबत भांडणे झाली होती.

आता याच्या मित्राचे नाव होते विश्वास. तर, सोहम जेव्हा विश्वासला भेटायला गेला, तेव्हा विराटसुद्धा तिथेच होता. विराट सोहमशी एकदम गोड बोलू लागला होता. सोहमला विश्वासच बसत नव्हता.

तर असो, विश्वासला सोहमने सगळी गोष्ट सांगितली. विश्वास सुद्धा सोहमसारखाच होता. नसलेल्या गर्ल-फ्रेंडचे किस्से अगदी रंगवून रंगवून सांगायचा. असे कित्येक किस्से, सोहमनेसुद्धा भरपूर मित्रांना सांगितले होते. काही मुलांच्या नजरेत सोहमच लव्ह-गुरु होता. पण, फक्त सोहमलाच माहिती होते, की ते खोटे किस्से आहेत.

तर, विश्वास जो सोहमचा लव्ह-गुरु झाला होता. त्याने सोहमच्या मनात नवीन गोंधळ उडवून दिला. विश्वास म्हणाला "अरे तिच्या वडिलांने फोन नसेल केला. तिचा कोणीतरी मित्र असेल. ती तुझी हिंमत किती आहे ते पहात असेल." तू सांगायला हवे होतेस "मला तुमच्या मुलीशी लग्न करायचे आहे." तुझी हिंमत पाहून, तिने आणि तिच्या नकली वडिलांने तुला होकार दिला असता." सोहमला हेच ऐकायचे होते.

सोहम आता हिंमत गोळा करायच्या कामाला लागला होता. असे अजून ७-८ दिवस झाले. पण हिंमत काही येत नव्हती. सबमिशन आणि परीक्षा फक्त २०-२५ दिवसांवर आल्या होत्या. शेवटी सोहमने ठरवले. "हे इथेच थांबवावे, तिला शेवटचा मेसेज करून सांगावे "मी या पुढे तुला कधीही मेसेज करणार नाही. माझ्यामुळे झालेल्या त्रासाबद्दल मला माफ कर."

सोहमने पुन्हा मेसेज केला "मी या पुढे तुला कधीही मेसेज करणार नाही. माझ्यामुळे झालेल्या त्रासाबद्दल मला माफ कर."

सोहमने आता हे प्रकरण इथेच थांबवले होते. संध्याकाळी घरात पुन्हा दैनंदिन मालिका पाहत बसला. त्याला दोन वेगळया वेगळया मालिकांमध्ये, दोन वेगळी वेगळी मुले स्वत:सारखीच वाटली. त्यातला एक हिरो होता आणि दुसरा व्हिलन होता. सोहमचा अजूनच गोंधळ उडू लागला. "जर १३ ब सिनेमाप्रमाणे, माझ्याही आयुष्यात दैनंदिन मालिकेसारखेच घडत असेल, तर मी नक्की कोणता?".

नेमका, टी.व्ही वर दिसणाऱ्या मालिकेमधला मुलगा सुद्धा, त्याला आवडणाऱ्या मुलीला "मला माफ कर" असाच मेसेज पाठवतो.

पुन्हा विचार करता करता डोके फुटण्याची वेळ आली. तेवढ्यात, रात्री १० वाजता याला फोन आला. फोन तिच्याच नंबरवरून आला होता. सोहमने जरी हे प्रकरण संपवले असले, तरी तिने नव्हते संपवले बहुतेक.

सोहमला दरदरून घाम फुटला. "फोन उचलायलाच नको" असे वाटले. "पण तिचे वडील थेट कॉलेजमध्ये आले तर खूप अपमान होईल" असे वाटून त्याने शेवटी फोन उचलला.

पुन्हा तिचे वडिलच बोलत होते. या वेळेस, जवळ जवळ १ तास सोहमने शब्दांचा मार खाल्ला. कित्येक वेळेस माफी मागितली. कसेतरी तिच्या वडिलांना शांत करून हा झोपायला गेला. पण, पुन्हा झोपेने दगा दिला. रात्रभर हा देवासमोर बसून रडत राहिला.

दुसऱ्या दिवशी कॉलेजलाच गेला नाही. तिसऱ्या दिवशी गेला. पुन्हा अंदाज घेतला. अजूनही सगळे व्यवस्थित होते. पण, ती आली नव्हती.

दरम्यान, याने ऑर्कुटवर नवीन अकाऊंट उघडले होते. आजकाल जसे फेसबुक, ट्विटर, whats-up, आहे. तसे त्या काळी ऑर्कुट होते. याने ठरवले "जर मेसेज नसेल करता येत, तर ऑर्कुटवरून मैत्री करू." सोहम तिला ऑर्कुटवर शोधू लागला. तिच्या सगळ्या मैत्रिणींचे ऑर्कुटचे अकाऊंट याने तपासले. पण, हिचा इथेही काहीच पत्ता लागत नव्हता. पुन्हा निराशाच पदरी पडली होती. याने पुन्हा विचार केला "हुषार मुले असे ऑर्कुट वगैरे वर अकाऊंट उघडत नसतील." बहुतेक तिला करियर कडे लक्ष द्यायचे असेल.".

कॉलेजमध्ये सबमिशन सुरु झाले होते. ५-६ दिवसच बाकी होते. सबमिशन संपले की निरोप समारंभ आणि मग थेट परीक्षा. म्हणजे, फक्त ७-८ दिवसच शिल्लक होते कॉलेज संपायला. पुन्हा याचे भावनिक होणे सुरु झाले. रोज, ती दिसली नाही की रडणे सुरु झाले. सकाळी १० ते संध्याकाळी ५, असे रोज तो वाट पहात होता. पण, ५-६ दिवस झाले तरी ती दिसली नाही. मेसेज करता येत नव्हता, फोन करणे तर लांबच होते, ऑर्कुटवर सुद्धा ती दिसत नव्हती, कॉलेजला सुद्धा येत नव्हती.

आशा अंधुक होत चालली होती. सगळयांचे सबमिशन पूर्ण झाले होते. शेवटी सबमिशन संपले. ती फक्त शेवटच्या दिवशी आली. आणि सबमिशन करून घरी गेली.

शेवटी निरोप समारंभाचा दिवस आला. सकाळी ९ वाजताच सोहम कॉलेजला पोचला. ती आली, शिक्षकांना भेटली, परत निघून गेली. सोहमला वाटले "निरोप समारंभ संध्याकाळी आहे, ती आवरून परत येईल." संधाकाळी ६.३० पर्यंत सोहमने तिची वाट पाहिली. कोण जाणे? पुन्हा कधी दिसणार होती ती. "पुन्हा कधी भेट होईल का?" ते माहिती नव्हते. ती ऑर्कुटवर सुद्धा नव्हती. थेट तोंडी आणि प्रात्यक्षिक

परीक्षेला दिसणार होती. पण, हे ही नक्की नव्हते की, दोघांचीही परीक्षा एकाच दिवशी असेल. म्हणजे, थेट शेवटच्या लेखी परीक्षेलाच ती दिसणार होती.

याने ठरवले "शेवटचे तिला डोळे भरून पाहून घ्यायचे." डोळे दगा देतील, पाणी येईल डोळयात, रडू कोसळेल, तिच्या बोलक्या डोळयात पाहवले जाणार नाही, तिची नजर सहन होणार नाही, ती बोलली तर बोलता येणार नाही, दुःख सहन होणार नाही. पण सहन करायचे. इतके दिवस वेडे ठरलोच आहोत. तर अजून एक दिवसाने काय फरक पडणार आहे? या पुढे ती एकटीच असेल, मी दिसणार नाही. पण शेवटचे तिला पाहून घ्यायचे."

पुन्हा तू दिसणार नाहीस... आजच तुला पाहून घेतो....
अश्रूभरल्या डोळयांमध्ये, आजच तुला साठवून घेतो.....
मनामधल्या कल्लोळाशी, आधीच थोडे भांडून घेतो......
ऐन वेळी रडायला नको, आधीच थोडे रडून घेतो......

पाहिलेस तू माझ्याकडे तर, मला पहावले जाणार नाही.....
नजर तुझी करारी असते, मला सहन होणार नाही.....
तू बोललीस येऊन तर, मला बोलता येणार नाही....
बोललो काही चुकीचे तर, ते ही मला कळणार नाही...

तुझ्यापासून दूर जाण्याचे, दुःख सहन होणार नाही.....
तू सुद्धा एकटीच असशील, मी ही परत दिसणार नाही....

सगळी मुले वर्गात निघून गेली. ती येतच नव्हती. फक्त, तिच्या प्रोजेक्ट ग्रुप मधली ३-४ मुले शिल्लक होती खाली. सोहमसुद्धा खालीच थांबला. तेवढ्यात ती येताना दिसली. अगदी लोकल सारखीच याची गोष्ट पुढे घडत होती. पण ही मुलगी होती, लोकल नव्हे. ती आली, पार्किंगमध्ये गाडी लावली. सोहम जवळच उभा होता. तिचे सगळे मित्र, हळू हळू वरच्या मजल्यावर असणाऱ्या वर्गाकडे जाऊ लागले. जणू काही, तिला आणि सोहमला एकांत देण्यासाठीच त्यांने काढता पाय घेतला होता.

ती जवळ येत होती. हृदय धडकण्याची गती वाढत होती. ती शेजारी पोचली, पुढे गेली, मजला चढू लागली. सोहम तिच्याकडे पहातच राहिला. त्याला वाटले "ही आत्ता जवळ येईल, बोलेल, मिठी मारेल." पण

तसे काही होणार नव्हते. तीने पहिला मजला ओलांडला आणि नजरेआड झाली. अगदी लोकलप्रमाणेच, दोन-तीन मिनिटात ती नजरेआड झाली होती.

मी पूर्वी लिहिलेले, गोष्टीत माझ्या सांगितलेले....
सगळे आज खरे झाले......
फक्त ती लोकल नव्हती.....मुलगी होती...
हे मात्र समजून आले...

तिला शेवटचे पाहून सोहमला रडू कोसळत होते. पण, याने निश्चय केला होता न रडण्याचा. याने ठरवले "आपण निरोप समारंभाला जायचेच नाही. कोण जाणे, जर स्वत:वर नियंत्रण नाही राहिले तर अवघड होईल." असेही मी इतके दिवस, इतके तास वाट पाहिली आहे. जर तिला मी आवडत असेल, तर तिलाही कळेल की तिची वाट पहाणे किती अवघड होते".

खरे तर, इथे पुन्हा एकदा खरा सोहम बाहेर पडला असावा. ज्याच्यात हिंमत नव्हती तिच्याशी बोलायची.

सोहम खालूनच परत निघाला. गाडी काढली, किक मारली आणि घराकडे निघाला होता सोहम. पुन्हा देवानेच ठरवले असते, तरच ती भेटणार होती. पण, याची प्रेम-कहाणी अधुरी राहिली होती.

घरी आल्यावर याच्या मनात पुन्हा सकारात्मक विचार सुरु झाले. पुन्हा वाटले "तिला मी आवडत असेल. पण, नसेल आवडत तर काय? कमीत कमी प्रपोज तर करायला हवा होता आपण. जास्तीत जास्त नाही म्हणाली असती ती." पण, आता वेळ निघून गेली आहे." आपण काही तिच्या घराजवळ जायचे नाही." ऑर्कुटवर दिसली तरच काहीतरी होईल."

तेवढ्यात कुणालचा फोन आला. कुणाल म्हणाला "सोहम, लायब्ररीची पुस्तकं परत करण्याचा उद्या शेवटचा दिवस आहे. उद्या कॉलेजला ये आणि पुस्तकं परत दे. आणि, जोशी सरांने उद्या जादाचा ताससुद्धा ठेवला आहे".

जणू काही, वाळवंटात मृगजळ सापडले होते सोहमला. "उद्या जोशी सरांचा जादाचा तास आहे. तसेच, सगळे लायब्ररीची पुस्तके परत करायला येतील. ती सुद्धा येईल. आपण तिला प्रपोज करू. आणि पाहू काय म्हणते ते."

पुन्हा, सकाळी उठून सोहम कॉलेजला गेला. हा रोज जिथे थांबून तिची वाट पाहायचा, तिथेच आज ती थांबलेली होती. आज तिने पांढरा टी-शर्ट घातला होता. याने पांढरा रंग पाहून अर्थ काढला. पांढऱ्या रंगाचा अर्थ म्हणजे "शांत". सोहम शांतच राहिला. सोहम वर गेला. लायब्ररीमध्ये जाऊन पुस्तके परत केली. ती जिथे होती तिथेच थांबली होती. तिच्या जवळून जाताना अंगावर शहारे आले. वाटले, तिच्या खांद्यावर हात ठेऊन दिलासा द्यावा. खूप रडावे. पण हिंमत?

ती जिथे जाईल, तिथे हा मागे मागे जात राहिला. शेवटी ठरवले "प्रपोज करायचेच". पण तिला बॉयफ्रेंड असेल तर?" लई मारेल आपल्याला." आपण एक काम करू, तिच्या ग्रुप मधल्या मुलाला विचारु "तिला बॉयफ्रेंड आहे का?"

हा तिच्या मित्राजवळ गेला. त्याला विचारले "काय रे? मानसीला बॉयफ्रेंड आहे का? तो मुलगा म्हणाला "हो आहे, पण का?." सोहम म्हणाला "मी तिला प्रपोज करणार होतो.". तिचा मित्र म्हणाला "मग आता?". सोहम म्हणाला "आता कशाला करू?"

"जर तिला बॉय-फ्रेंड आहे, तर हा खरा प्रेमी नक्की कोण होता? मी कसा काय खरा प्रेमी? मी तिला कशासाठी माफ केले होते?"

सोहम घरी निघाला. पण, तिने सोहमला तिच्या मित्राशी बोलताना पाहिले होते. सोहमने सुद्धा तिला पाहिले. तिची नजर रागीट वाटत होती. सोहम घाबरला. आणि थेट पार्किंगमध्ये जाऊ लागला. ती मागेच येत होती. मागेच तिचा मित्र सुद्धा पळत पळत आला. मित्र तिला काहीतरी सांगत होता. सोहम अजूनच घाबरून पळत पळत गाडीपाशी गेला. गाडी काढली, गेटच्या बाहेर जाऊन लपून बसला. मागे तिने गाडी काढली. ती सुद्धा घरी चालली होती. सोहम रस्त्याजवळ जाऊन थांबला. ती जाताना हात जोडले आणि मनातच माफी मागितली "तू देवी आहेस, तू तुझ्या बॉयफ्रेंडला सांगितले असतेस, तर माझे काही खरे नव्हते. तुझ्या वडिलांने, माझ्या आयुष्याची वाट नाही लावली. मला माफ कर."

कुणालला भेटण्यासाठी सोहम पुन्हा कॉलेजमध्ये आला. दोन चार मिनिट झाले असतील, तोच ती सुद्धा आली. सोहमची घाबरून बोबडीच वळाली. ती रागाने सोहमकडे पहात होती. ती लायब्ररीमध्ये गेली. काहीतरी करून पुन्हा बाहेर आली. सोहम पुन्हा मागे मागे जात राहिला. तिने पुन्हा गाडी काढली. घरी निघून गेली. नंतर, सोहम महाराजसुद्धा घरी निघून आले.

सोहम कोलमडला होता. पण, पास व्हायचे होते म्हणून अभ्यास करू लागला. संध्याकाळ झाली, की तिची खूप आठवण येऊ लागायची. याने पुन्हा ठरवले. "तिच्या घराजवळ जाता येत नाही. पण, ४ किलोमीटर लांब तर थांबता येईल की." आपण तिच्या घरापासून ४ किलोमीटर लांब थांबू. ती दिसली तर चांगलेच. नाही तर पुन्हा घरी येऊ."

तर हा अभ्यास करायचा सोडून, रोज तिच्या घरापासून ४ किलोमीटर लांब थांबून तिला शोधू लागला. ती कधीही दिसली नाही. पाउस असो, थंडी असो, हा रोज तिला शोधण्यासाठी जात राहिला. पण रोजच रिकाम्या हाताने परत यावे लागत होते.

१५-२० दिवस झाले, ती काही दिसत नव्हती. शेवटी याने ठरवले "आपण कोणत्यातरी मुलीची मदत घ्यायची. आपण संकेतच्या गर्लफ्रेंडची मदत घेऊ. एका मुलीच्या भावना, दुसरी मुलगीच समजू शकते. ती आपल्याला मार्गदर्शन करेल."

तिने कोणत्या दिवशी कोणत्या रंगाचे कपडे घातले होते. यावरून सोहम, त्यादिवशी तिच्या मनात काय चालू होते? याचा अभ्यास करू लागला. प्रत्येक लव्ह-गुरु, प्रत्येक रंगाचा वेगळाच अर्थ सांगू लागला होता. तसेच, याचे रंगांचे किस्से ऐकवून ऐकवून, याने नाही म्हणले तरी मला, सोहम पार्ट टू ला, अक्षयला, संकेत आणि त्याच्या गर्ल-फ्रेंडला, आणि अशाच अजूनही १५-२० जणांना, पकवून पकवून बोर केले होते.

शेवटी वैतागून संकेतची गर्लफ्रेंड म्हणाली "अरे मित्रा, असा किती दिवस, तिने कोणत्या रंगाचे कपडे घातले याचा अभ्यास करत बसणार आहेस? हिंमत कर आणि तिला एकदा फोन करून टाक. नाही म्हणाली तर, विषय सोडून दे".

शेवटी सोहमने फोन करायचे ठरवले. एस.टी.डी बूथवरून तिला फोन लावला. कारण, याने स्वत:च्या मोबाईलवरून फोन लावला असता तर तिने उचलला नसता.

तिने फोन उचलला.

सोहम - हेलो,

ती - येस, व्हू इज इट? (कोण आहे?).

इंग्रजी ऐकून हा गारच झाला.

सोहम - "आय एम सोहम. (पुढचे इंग्रजी येत नव्हते आणि स्वत:ची स्टाईल सोडायची नव्हती म्हणून, मराठीतूनच) मी तुझ्या कॉलेजमध्ये शिकतो. मीच तुला मेसेज पाठवत होतो. मला तुझ्याशी दोन मिनिटे बोलायचे आहे. बोलू का?"

ती - "ओके."

सोहम - (सोहमने थेट विषयालाच हात घातला. ताकाला जाऊन भांडे कशाला लपवायचे?) "मी तुला माझी बायको म्हणून पाहतो. तुला माझ्याशी मैत्री करायला आवडेल का?".

ती - "आय डोंट इवन नो यु. एंड इफ यु डोंट नो, आय एम कमिटेड टू सम वन." (मी तुला ओळखतही नाही आणि माझा साखरपुडा झाला आहे किंवा माझे लग्न ठरले आहे किंवा मला बॉय-फ्रेंड आहे).

सोहम - "तू खरेच एंगेज आहेस?"

ती - येस, आय एम. (हो)

सोहम (भोळेपणाने) - "ही कोणती टेस्ट आहे का? (सोहमला वाटले "मुली प्रेमाला होकार देण्याअगोदर प्रेमाची परीक्षा घेतात आणि, ती आपल्या प्रेमाची परीक्षा घेत आहे.")

ती - स्टॉप ऑल धिस बुल-शीट, डू नॉट कॉल मी अगेन (हा सगळा मूर्खपणा थांबव. आणि पुन्हा मला फोन करू नकोस).

('बुल शीट' वगैरे शब्द ऐकून सोहम सुद्धा चिडलाच होता. भलेही त्याला अर्थ कळला नव्हता, पण आवाजाचा प्रकार तर कळतच होता).

सोहम (तरीही शांतपणे) - म्हणजे तू खरेच एंगेज आहेस?

ती - येस, आय एम.

सोहम - ठीक आहे, मी तुझे तोंडही पहाणार नाही

ती - एनिथिंग एल्स?

सोहम - नाही. (मनात - आता काय भाऊ बनवतेस?)

फोन कट झाला. एका मिनिटाच्या आत सोहमचे मन दुखावले होते, पुन्हा कधीही न भरून येण्यासाठी.

सोहमने ठरवले "आता काहीही होऊ दे, मनाचे ऐकायचे नाही. तिच्याकडे बघायचे नाही." इन मीन तोंडी परीक्षेचे ४ आणि लेखी परीक्षेचे ४ दिवस ती दिसेल. फक्त ८ दिवस कंट्रोल करायचे. (स्वत:लाच फिल्मी डायलॉग मारला - कंट्रोल उदय शेट्टी कंट्रोल).

"पण, नक्की काय घोळ आहे ते शोधायलाच हवे. जर हिला बॉयफ्रेंड आहे, तर तसे कधीच वाटले नाही. कदाचित लग्न ठरले असेल, किंवा साखरपुडा झाला असेल."

आता याने सगळीकडे माहिती मिळवायला सुरुवात केली. खरेतर, कॉलेजमध्ये भरपूर मुलांना मानसी आवडत होती. या सगळ्यांनी सुद्धा काही ना काही माहिती गोळा केली होती.

याला अजून एक गोष्ट कळाली. ती म्हणजे, सबमिशनच्या शेवटच्या दिवशी ज्या मुलाला याने तिच्याबद्दल विचारले "काय रे मानसीला बॉय-फ्रेंड आहे का?" त्याने सुद्धा हिला निरोप समारंभाच्या दिवशीच प्रपोज केले होते.

ज्या ज्या मुलांवर याला संशय होता, त्या सगळ्यांना याने विचारले "मानसी तुझी गर्लफ्रेंड आहे का?"

सगळे जण "नाहीच" म्हणाले.

शेवटी याने निष्कर्ष काढला "तिचे लग्नच ठरले असेल".

पण याला अजूनही वाटत होते "तिला आपण आवडतो". (प्रेम म्हणजे प्रेम असते).

पण आता काहीही करता येणार नव्हते. शेवटी याने अभ्यास सुरु केला. पण, रोज सकाळी कॉलेज आणि संध्याकाळी तिच्या घरापासून ४ किलोमीटर लांब. अश्या दोन दोन वाऱ्या सुरूच ठेवल्या.

टी. व्ही. वर दिसणाऱ्या मालिकांमध्ये याचीच गोष्ट चालू होती. (१३ ब सिनेमाप्रमाणे).

शेवटी तोंडी परीक्षेचा दिवस उजाडला. ४ पैकी २ परीक्षा झाल्या. पण हिचा चेहरा दिसला नाही. शेवटी तिसऱ्या परीक्षेला, तिची परीक्षा कधी असते ते कळले. दोघांचीही तिसरी परीक्षा एकाच दिवशी होती.

बाकी तिची परीक्षा, याच्या परीक्षेच्या अगोदरच्या दिवशी असायची.

तिसरी तोंडी परीक्षा होती. हा कॉलेजला गेला. याने ठरवले होते "तिचे तोंडही पहायचे नाही." पहिले दोन तास हा वर्गाबाहेरच बसून राहिला. मनातून वाटत होते "ती येईल, बोलेल" पण असे काही होणार नव्हते.

पण "आपलीही परीक्षा आहे. परीक्षक कसे आहेत? प्रश्न काय विचारतात? हे कळायलाच हवे" म्हणून हा शेवटी वर्गात गेला. तिच्याकडे पाठ करून बसला. पण चोरून चोरून तिला पहातच होता. तिच्याही नजरेतून हे सुटले नसावे. ती मित्र-मैत्रिणींच्या घोळक्यात बसली होती. तिने स्वत:चा चेहरा सोहमकडे वळवला. ती एकदम याच्याकडे तोंडच करून बसली. हसून हसून पाहायला लागली.

**इतके दिवस गायब असणारा, मी सुद्धा आज तिथेच होतो.**

खरेच, ती यावेळी त्याच्याकडेच पहात होती. कदाचित, तिच्या हसण्याचा अर्थ असावा की, "हे मित्रत्वाच्या नात्याने, खेळकर वृत्तीने घे. माझे लग्न ठरले आहे आणि तूला मी मित्र मानते."

पण, सोहम सहाव्यांदा त्याच मुलीच्या प्रेमात पुन्हा पडला होता. त्यालाही हसावेसे वाटू लागले होते. पुन्हा आयुष्यात प्रेम आले होते. अभ्यास सोडून तो गाणे गात बसला "आज फिर तुम पे प्यार आय है. तो ही तिच्याकडे अगदी खळखळून हसून पाहू लागला.

तिची परीक्षा अगोदर होती. ती परीक्षेला निघाली. चालत चालत दरवाज्यापर्यंत पोचली. "दिलवाले दुल्हनिया ले जाएंगे" प्रमाणे, सोहम मनातच विचार करू लागला "हिचे प्रेम असेल तर वळून पाहील."

खरेच तिने वळून पाहिले. पण ती नजर प्रेमाची नव्हती, रागाची होती. सोहमला तो एक सेकंद, जगण्यासाठी अशक्य वाटला. डोळे इतके विस्फारले गेले की "बाहेर पडतात की काय?" असे वाटले.

परीक्षा देऊन ती निघून सुद्धा गेली. सोहमनेही परीक्षा दिली आणि घरी गेला. पण, तिच्या पुढच्या परीक्षेपर्यंत, तिचे हसणे आठवून, तिचे डोळे आठवून, प्रेमाचा माठ भरून वाहू लागला होता.

शेवटी, तिच्या शेवटच्या तोंडी परीक्षेचा दिवस उजाडला. सोहमची परीक्षा पुढच्या दिवशी होती.

पण, अभ्यास सोडून हा तिला पहाण्यासाठी कॉलेजला गेला. तिची परीक्षा होईपर्यंत थांबून राहिला. पुढे फक्त लेखी परीक्षेलाच ती दिसणार होती. फक्त ४ पेपर, म्हणजेच चार दिवसच ती दिसणार होती. पुढे माफी मागायला सुद्धा संधी मिळेल की नाही? हे माहिती नव्हते.

त्याने पुन्हा एक चिठ्ठी लिहिली "जर मी कधीही, तुला जाणते-अजाणते पणे दुखावले असेल, तर माफ कर" (Please forgive, If I have ever hurt you, knowingly or unknowingly). पुन्हा ही चिठ्ठी तिच्या गाडीत टाकून दिली. पार्किंगमधेच स्वत:च्या गाडीवर बसून राहिला.

ती पार्किंगमध्ये आली. चिठ्ठी उचलली, वाचली. तेवढ्यात तिचा मित्र आला. त्याने पाहिले होते तिला चिठ्ठी वाचताना. तिने मित्रालासुद्धा दाखवली. पुढे कदाचित, मित्राला जायला सांगितले असावे. मित्र गेला. आणि ती हळू हळू स्वत: निघायची तयारी करू लागली. स्कार्फ बांधला, चावी शोधली. गाडीवर बसली. किक मारणार, तेवढ्यात सोहम तिच्यापाशी पोचला.

काहीच बोलू शकत नव्हता. पण, हिंमत करून म्हणाला "माफ कर मला".

ती - (इंग्रजीमधून) फॉर व्हॉट? (कशासाठी?)

तो - मी तुला मेसेज केले, खूप त्रास दिला म्हणून.

ती - इट्स फाईन (ठीक आहे)

१० सेकंद कोणी काहीच बोलले नाही. ती पुन्हा निघायची तयारी करू लागली. सोहमने मनात विचार केला "अरे परत दिसणार नाही ती, काहीतरी बोल".

सोहम - (डोळयात पाणी आणून) "मग, तुला माझ्याशी मैत्री करायला आवडेल?"

ती - आय डोंट नो यु. सो प्लीज..... (मी तुला ओळखत नाही, तर कृपया .....)

ती निघूनसुद्धा गेली.

आणि, शेवटच्या भेटीची आठवण आणि सहाव्यांदा तुटलेले मन घेऊन, सोहमसुद्धा.

एव्हाना, "आपल्यावर कोणीतरी पाळत ठेऊन आहे" हे सोहमला मनापासून जाणवत होते. तसेच,

आज स्वत:बरोबर घडलेली घटनासुद्धा टी.व्ही वरच्या मालिकेत पाहायला मिळाली (१३ ब सिनेमाप्रमाणे). पण काहीच कळत नव्हते. बुद्धीने काम करणेच बंद करून टाकले होते.

आता तिला मेसेज करता येत नव्हता. फोनही करता येत नव्हता. दिसणार तर ती नव्हतीच.

सोहमने ठरवले - "५ नवीन विषय आणि २ जुने सोडवायचे आहेत. आता अभ्यास करायला हवा."

सोहमने अभ्यास सुरु केला. त्याने विचार केला "पुढे मागे जर हिला आपल्याबद्दल प्रेम वाटले आणि लग्नाचा विषय निघाला, तर कमीत कमी आपल्याला नोकरी तरी हवीच की." नोकरी मिळवण्यासाठी आधी पास व्हायला हवे".

आत्तापर्यंत याने पाच-सहा लव्ह-गुरूंकडून सल्ले घेतले होते. त्यात संकेतची गर्लफ्रेंड योग्य सल्ला देत होती.

ती म्हणाली "मुलीला प्रपोज करताना कधीही, थेट लग्नाचा विषय काढायचा नसतो"

सोहम - पण लग्नाच्या वेळेस, अरेंज मॅरेज मध्ये तर थेट लग्नाचा विषयच काढला जातो की. मग माझे काय चुकले? आणि जे मनात आहे तेच तर सांगितले. खोटे तर नाही बोललो ना?

(सोहमला समजावणे अवघड होते, त्याची विचारक्षमता अफलातून असावी).

संकेतची गर्लफ्रेंड - (कदाचित, ती कंटाळली असेल याचे किस्से ऐकून). अरे तुझी आणि तिची ओळखही नाही. वर्गात असूनही तू कधी तिच्याशी बोलला नाहीस. तिला काय माहिती की, तू टाईमपास करतोस की खरेच. असेही, आम्ही मुली मेसेजवर जास्त विश्वास ठेवत नाही. तू परीक्षेला तिच्याशी बोलण्याचा वर्गातच प्रयत्न कर. जमले तर ठीक, नाही तर विसरून जा.

सोहम - ठीक आहे.

शेवटी, शेवटच्या परीक्षेचा पहिला दिवस उजाडला. सोहमने ठरवले "तिला परीक्षेसाठी शुभेच्छा देण्याच्या बहाण्याने बोलायचे." ती पुस्तकात डोकं घालून अभ्यास करत होती. शेजारी सोहमचा मित्र सुद्धा उभा होता. पण, "पुन्हा चान्स मिळणार नाही" म्हणून सोहम थेट दोघांच्या मधेच जाऊन उभा राहिला. सोहमने तिच्याकडे पाहिले आणि म्हणाला "बेस्ट ऑफ लक".

ती दोन पावले मागेच सरकली आणि पुस्तकात डोके घालून अभ्यास करू लागली. सोहमच्या मित्राने हा सगळा प्रकार पाहिला होता. तो सोहमकडे आ वासून पहातच राहिला.

सोहमचा खूप मोठा पोपट आणि अपमान झाला होता.

सोहम गुपचूप वर्गात जाऊन बसला. ती दिसावी म्हणून खिडकी उघडली. गुपचूप अभ्यास करू लागला.

परीक्षा सुरु झाली. पण, लिहिण्यात काहीच रस वाटत नव्हता. रडू कोसळत होते. डोळ्यातून अश्रू ओघळल्यामुळे, ते थेट पेपरवरच पडत होते. पेपरसुद्धा ओला झाला होता. कशीबशी परीक्षा दिली आणि बाहेर आला. ती येतच होती. याला दु:ख अनावर झाले. खूप राग आला, नाकपुड्या फुगू लागल्या. मनातून आवाज आला (कंट्रोल उदय शेट्टी कंट्रोल, हा पक्का फिल्मी होता).

रागातच हा निघाला. थेट पार्किंगमध्ये पोचला. गाडी काढली. तोपर्यंत, ती आणि तिचा ग्रुप पोचलाच होता. याने रागाने पाहिले आणि गाडी काढून निघून गेला. परीक्षा अवघड गेल्याचा राग याने तिच्यावर काढला होता.

पहिला पेपर आणि दुसऱ्या पेपर मध्ये ४ दिवस होते. कधी तिचा राग येत होता, कधी प्रेम येत होते. कसेतरी चार दिवस झाले. या वेळेस याने गुपचूप वर्गात जाऊन बसायचे ठरवले. स्वत:चा नंबर असणारा बाक हा शोधतच होता. तेवढ्यात, वर्गात शिकणाऱ्या एका मुलीने येऊन याला विचारले "वर्ग क्रमांक १५ कुठे आहे?" याने सांगितले "शेजारचा आहे".

ही मुलगी मानसीची वर्ग मैत्रीण होती. दोघींचा परीक्षेचा क्रमांकसुद्धा मागे पुढेच होता. "आज तिची मैत्रीण आपल्याशी बोलली" असे समजून सोहम आज खुष होता. याला त्याच्या मित्राने सांगितलेले भविष्य आठवले. "तुमच्या प्रेम कहाणी मध्ये अडथळे आहेत. कोणीतरी कॉमन ओळखीची व्यक्ती तुम्हाला मदत करेल."

आता या मुलीला सोहम, मदत करणारी व्यक्तीच समजला होता. तिचे नाव होते मिताली.

"आता मिताली आपल्याला मदत करेल" असे वाटून सोहमने नवीन आयडिया लडवायला सुरुवात केली.

दुसरा पेपरही संपला. मिताली आणि मानसी कधी निघून गेल्या, ते कळाले सुद्धा नाही सोहमला.

आता फक्त शेवटचे २ पेपर शिल्लक होते.

तिसऱ्या पेपरला, मानसी मस्त पैकी परफ्युम लावून आली. त्या वासाने सोहम एकदम खुष झाला.

परीक्षा झाली. पुन्हा या दोघी कधी निघून गेल्या? ते कळलेसुद्धा नाही.

आता शेवटचा चान्स होता. तो म्हणजे शेवटचा पेपर. सोहमने ठरवले "काहीही होऊ दे, मितालीला (मानसीच्या मैत्रिणीला) सगळे सांगायचे. तिच्याकडून काही सेटिंग होते का? ते पहायचे".

मस्त परफ्युम वगैरे मारून, व्यवस्थित तयार होऊन, सोहम २ तास लवकरच कॉलेजला पोचला.

काही वेळाने मिताली आली. सोहमने तिला लायब्ररी पाशी गाठले. आणि थेट सुरूच झाला (एक तर शेवटचा दिवस. ती दिसते दोन-तीन मिनिटे. त्याच्यातही बाकीच्या गप्पांमध्ये वेळ कशाला घालवायचा? आणि, आजची संधी गेली तर सगळे प्रयत्न पाण्यात गेले असते.)

सोहम - "हे बघ मिताली, मला मानसी खूप आवडते. तू माझी तिच्याबरोबर ओळख करून देऊ शकतेस का?"

मिताली - "अरे ती आधीपासूनच कमिटेड आहे. फक्त तुलाच माहिती नव्हते". (आता या 'कमिटेड' शब्दाचा अर्थ सोहमला अजूनही कळत नव्हता).

ज्या अर्थी मिताली म्हणाली "अरे ती आधीपासूनच कमिटेड आहे. फक्त तुलाच माहिती नव्हते". याचा अर्थ असा की, पूर्ण कॉलेजमध्ये माहिती होते की मानसी कमिटेड आहे. तसेच, हे फक्त मलाच माहिती नव्हते. याचा अर्थ असा की, मी मानसीच्या मागे आहे हे आख्ख्या कॉलेजला माहिती आहे".

सोहम - (मनातच - "म्हणजे सगळया कॉलेजला माहिती असावे, की मी मानसीच्या मागे लागलो आहे. म्हणजे आपला सॉलिड पोपट झालेला आहे").

सोहम - ("काहीतरी गैरसमज होतोय, तिला बहुतेक मीच आवडतो" असे समजून). पण बघ ना, काहीतरी कर. जमल्यास ओळख् तरी करून दे".

मिताली - ठीक आहे, मी विचारते.

सोहम - धन्यवाद.

सोहम पुन्हा खाली आला. वर्गापाशी येऊन अभ्यास करू लागला. काही वेळाने मानसी सुद्धा आली. मानसी, मिताली बसते तिथे जाऊ लागली.

सोहम खाली अश्या ठिकाणी उभा राहिला, जिथे याला मानसी दिसू शकेल. मिताली आणि मानसीचे काहीतरी बोलणे झाले. मानसीचा चेहरा चिंतीत वाटत होता. तेवढ्यात तिची नजर सोहमवर पडली. ती हसू लागली (बहुतेक, तिने सोहमचे म्हणणे मनावर घेतले नसावे).

पण, सोहम तिच्याकडे पाहून, हात जोडून निघून गेला. तिचा सुद्धा चेहरा पडला.

सोहम निघून गेला. पण, मनात राग फार होता. वर्गात, कंपास पेटी, कॅल्क्युलेटर, अश्या वस्तूंवर त्याने राग काढायला सुरुवात केली. आदळून आदळून त्या वस्तू बाकावर ठेऊ लागला. बहुतेक, त्याचा राग पाहून दोघीही घाबरल्या असाव्यात.

सोहमला वाटले "संध्याकाळी परीक्षा संपल्यावर मिताली मानसीसोबत आपली ओळख करून देईल". फक्त ३ तासाचा प्रश्न होता. पेपर द्यायचा आणि मानसीसोबत ओळख होणार होती.

प्रश्न कळत नव्हते. उत्तर येत असूनही आठवत नव्हते. पुन्हा अश्रुंने उत्तरपत्रिका ओळी केली. कसे बसे, पास होईल एवढे लिहिले आणि पेपर संपला.

पेपर देऊन बाहेर येताना हा बाथरूमला गेला. बाहेर येऊन खाली पाहिले तर, मानसी आणि मिताली घाईघाईने गाडी काढून निघून चालल्या होत्या.

स्वप्न तुटले होते. पुन्हा कधीही ती दिसणार नव्हती. आभाळच फाटले होते. मन, डोके, डोळे, कान, सुन्न झाले होते. काय करायचे ते कळत नव्हते. त्यांचा पाठलाग तर करायचा नव्हता. तिच्या घरापाशी तर जायचे नव्हते.

रडू येत होते. पण, कॉलेजमध्ये रडणे शोभले नसते. गाडी काढली आणि सोहम घरी आला.

त्याच दिवशी भेटलो असतो, दोन क्षण बोललो असतो...
खरेच बरे झाले असते....

देवानेच लिहिले होते आपले प्रेम ...
हे खरेच, खरे झाले असते......

संध्याकाळी विचार केला "आपल्यामुळे, कॉलेजमध्ये तिचे सुद्धा नाव उडवले गेले असेल." आपण तिच्या मित्राला फोन करून माफीचा निरोप देऊ".

पुढे ती दिसणार नव्हती. पण शेवट गोड करायचा होता.

तिच्या ग्रुपमधल्या एकाला फोन लावून सोहमने स्वत;ची चूक पुन्हा मान्य केली. माफी मागितली आणि विषय संपवून टाकला.

माफी सुद्धा मला म्हणाली,
अरे, किती वेळा मला मागशील?
आज म्हणशील, मी चुकलो
आणि उद्या पुन्हा चुकशील...

भविष्य सांगणाऱ्या मित्राला सुद्धा फोन करून सांगितले. "आज शेवटचा दिवस होता. तुझे भविष्य खोटे ठरले. कोणाचीही मदत नाही मिळाली रे."

सोहमने विचार केला "मानसीने कधीही असे काही केले नाही, ज्याने आपण तिच्या प्रेमात पडू. हे सगळे आपल्याच मनाचे खेळ होते. आपणच वहावत गेलो होतो".

तुझे सुद्धा प्रेम आहे....
मला उगाच वाटत होते....
मन मात्र मनामध्ये....
संसार आपला थाटत होते.....

अर्थ चुकीचा काढत बसलो.... तुझ्या गोड हसण्याचा.....
स्वप्न मीच दाखवल्यावर ...दोष काय मनाचा?...
बर झालं, तुझ्याजवळ नाही येऊन बसलो.... (१४ फेब्रुवारीला)
नाहीतर, खेळ झाला असता क्षणाचा... (कानफाटात लगावली असतीस तर? नको रे बाबा)

पण, बाकावर लिहिलेल्या गोष्टी कोणी लिहिल्या होत्या?" संध्याकाळच्या मालिकांमध्ये घडणाऱ्या गोष्टी, आपल्यासोबत सुद्धा कश्या काय घडत होत्या?. १३ ब सिनेमासारखेच आपल्याही आयुष्यात कसे काय घडत होते?"

विचारचक्र पुन्हा सुरु झाले. "असे कोण आहे, ज्याला हे सगळे माहिती आहे?" असे कोण आहे, ज्याला मी काय करेल ते माहिती असते?" "असे कोण आहे, ज्याला मी आज कसा वागणार आहे हे समजते?" मालिकांमध्ये तर शूटिंग आधीच झालेले असते, आणि नंतर प्रक्षेपण होते. मग, मी काही काळाने असाच वागणार आहे, हे कोणाला कसे काय समजू शकते? आणि नेमके, मी जसा वागेल, त्याप्रमाणेच, मालीकेमधले पात्र त्याच दिवशीच्या एपिसोड मध्ये कसे काय वागते?

"म्हणजे ज्योतिषी मालिका लिहितात का काय?"

याच धुंदीत "ती ऑर्कुटवर दिसते का?" हे शोधण्यासाठी सोहम इंटरनेटवर गेला. ऑर्कुटवर त्याला, एका खोट्या/डुप्लिकेट अकाऊंट वरून मैत्रीची मागणी आली होती. अर्थातच, ती मुलगी होती. अशिता नावाने ती प्रोफाईल बनवली गेली होती. सोहमने विचार केला "साले हे कोण आहे? जे खोट्या अकाऊंट वरून मैत्रीची रिक्वेस्ट (फ्रेंड रिक्वेस्ट) टाकत आहे. "नक्कीच मुलेच असले उद्योग करतात".

तसा सोहम इंटरनेट वापरण्यात अजून कच्चा होता. त्याला वाटले "कदाचित ही तीच व्यक्ती आहे, जी आपल्यावर पाळत ठेऊन आहे." ती व्यक्ती कोणीतरी महाराष्ट्रीच असणार. कारण, ज्या मालिकांमध्ये, संध्याकाळी मी काय करणार आहे? ते दिसते (१३ ब सिनेमाप्रमाणे). त्या मालिका मराठीच आहेत. एव्हाना, १३ ब सिनेमा, मराठी मालिका, झालेला प्रेमभंग, झालेला पोपट, दूर गेलेले मित्र, या सगळयामुळे सोहमची बुद्धीच चालत नव्हती.

तू असताना, मस्त झालो होतो....
तू न दिसताना, अस्वस्थ झालो होतो......
तुझा शोध घेताना, त्रस्त झालो होतो.....
तू गेल्यावर मात्र, उध्वस्त झालो होतो......

नेहमीप्रमाणे सोहमने, मला आणि सोहम पार्ट टूला पकवायाला सुरुवात केली. सोहम पार्ट टू तर सोहमला शिव्याच देऊ लागला. माझे शांत रहाणे पाहून, दोघेही मलाच टोमणे आणि शिव्यांची लाखोली वाहू लागले.

सोहमने स्वत:च या गोष्टीचा छडा लावायचा निर्णय घेतला. याने त्या खोट्या अकाऊन्टची मैत्रीची रिक्वेस्ट स्वीकार केली. थेट शिव्याच देऊ लागला. शिव्यांमध्ये याने अजून एक शिवी वापरली. ती म्हणजे "कॅरेक्टर लेस" (चारित्र्यहीन). याला या शब्दाचा अर्थही माहिती नव्हता. पण, "मला इंग्रजी येते" हे दाखवण्यासाठी त्याने असा शब्द शोधून काढला असावा. आता जो मुलगा "इरेजरला" "खोडरबर" म्हणायचा. "शार्पनरला" "टोकयंत्र" म्हणायचा. "पार्टीला" मेजवानी म्हणायचा. त्याला कसे काय इतक्या मोठ्या ("कॅरेक्टर लेस") या शब्दाचा अर्थ माहिती असेल?

कुठेतरी पाणी नक्कीच मुरत होते.

राग शांत झाल्यावर याने पुन्हा विचार केला "आपण अश्या शिव्या देणे योग्य नाही. कदाचित, कोणीतरी, काहीतरी चांगल्या उद्देशानेच ही नकली प्रोफाईल बनवली असू शकते." किंवा कोणी मस्करी करत असले, तरीही नंतर समोर येईलच की. पण आपण माफी मागायला हवी." (आजकाल "सकारात्मक विचार", "नकारात्मक विचार" असले शब्द ठिकठिकाणी ऐकू येतात. हा आमचा सोहम म्हणजे, नाही त्या ठिकाणी सकारात्मक विचार करणाऱ्यांपैकी एक).

दुसऱ्या दिवशी पुन्हा माफी मागितली.

असे कित्येक दिवस, सोहम या खोट्या अकाऊंटशीच, त्या अस्तित्वात नसणाऱ्या व्यक्तीशीच बोलत राहिला. पण, समोरून काहीही उत्तर येत नव्हते. बोलून बोलून सोहम कंटाळला, की पुन्हा वाटायचे "कोणीतरी भयंकर मस्करी करत आहे". हा पुन्हा काहीतरी शिव्या द्यायचा. पुन्हा वाईट वाटले की माफी मागायचा. बोलायला कोणी नव्हते, सांगायला कोणी नव्हते. बुद्धी भ्रमिष्ट झाली होती. समोरून काहीही उत्तर येत नव्हते. राग अजूनच वाढत चालला होता.

जवळ जवळ वेडच लागले होते. मनात विचारसुद्धा येऊ लागला "आपण मानसिक उपचार करून घ्यावे. असेही, लहानपणापासूनच आपण वेडेच आहोत." १३ ब या सिनेमाप्रमाणेच, सोहमचे आयुष्य घडू लागले होते. सिरियल्समध्ये दाखवल्याप्रमाणे, खरंच आता सोहम वेडा होऊ लागला होता.

अश्यातच प्रोजेक्टची परीक्षा जवळ आली. प्रोजेक्टचा दिवस उजाडला. हा कॉलेजमध्ये, याचा नंबर कधी येतो? याची वाटच पहात होता. तेवढ्यात खाली मानसी आली. जीना चढून ती वर पोचली. ती जवळ आली, सोहमची हृदयगती वाढू लागली. तिची चालण्याची गती पाहूनच भीती वाटू लागली. तिला समोरून येताना पाहून हा बाजूला झाला. ती पुढे गेली, पण तिने त्याच्याकडे असे काही पाहिले, की काळजाचा थरकाप

उडाला.

परीक्षा संपल्यावर हा विचार करू लागला "तिने असे का पाहिले असावे?" मी तर विषय संपवला होता. माफीही मागितली होती. अगदी, तिच्या मित्राकडे सुद्धा माफी मागितली होती. आणि, ना मी आता मेसेज पाठवत होतो, ना फोन केला होता."

"बहुतेक, तिचे आपल्यावर प्रेम असेल. म्हणूनच, ती आपल्यासाठी, आपल्याला परीक्षेला शुभेच्छा देण्यासाठी आली असावी".

पण "आता कितीही प्रेम असले, तरी मी मेसेज करणार नाही." तुलाच करावा लागेल". तुलाच माझ्याशी बोलावे लागेल येऊन". असा दृढनिश्चय सोहमने केला.

भरपूर विचार केल्यावर याच्या मनात विचार आला. "अरे, ती ऑर्कुटवरची खोटी प्रोफाईल मानसीची तर नसेल? पण मग, अशी खोटी प्रोफाईल का बनवली तिने?" आता विचार करून करून डोके फुटायची वेळ आली होती. हिचे नाव तर मानसी. पण, अशिता नावाने ती कशासाठी प्रोफाईल बनवेल?

"नाही, ही प्रोफाईल नक्कीच तिने नाही बनवली. कोणत्यातरी मुलानेच बनवली असेल. मग तिने, प्रोजेक्टच्या तोंडी परीक्षेच्या दिवशी माझ्याकडे रागाने का पाहिले?"

डोकं बधीर झालं होतं. आता त्या खोट्या प्रोफाईलला हा मानसी समजू लागला होता. तिला कॅरेक्टर लेस म्हणाल्याचे दु:ख वाटू लागले होते.

हा, रोज ऑर्कुटवर काही ना काही मेसेज लिहून यायचा. कधी कधी शिव्या द्यायचा, कधी कधी माफी मागायचा. पण त्यातही सोहम, कोड वर्ड (सांकेतिक भाषा) मधेच बोलायचा. सोहम तिला "गॉड" नावाने संबोधायचा. "ती प्रोफाईल खोटी आहे" असा याचा अंदाज होता. आणि, जरी ही प्रोफाईल खोटी असली, तरी मानसीचे त्या प्रोफाईलवर बारीक लक्ष होते, हे मात्र नक्की.

म्हणूनच, "ही प्रोफाईल खोटी असली तरी, आपला निरोप नक्की तिच्यापर्यंत पोचेल. आणि बाकी कोणालाही कळणार नाही". असे समजून सोहम तिला "गॉड" नावाने बोलायचा.

आता तुम्हाला प्रश्न पडला असेल की, सोहम तिला "गॉड" का म्हणायचा? तर, पूर्वीचा बाकावरच किस्सा आठवला तर सगळे कळेल "कोणी तरी, एवढे दु:ख डोळयात साठवून, इतरांना कसे काय माफ करू

शकते? त्यासाठी देवाचेच हृदय हवे (how can someone hide huge pain in those eyes, and still forgive others? it has to be **god's** heart). हा किस्सा फक्त सोहम आणि मानसीलाच माहिती होता, बाकी कोणालाही नाही.

त्या खोट्या प्रोफाईलला 'गॉड' म्हणल्यामुळे, जरी ती प्रोफाईल कोणीही मुलाने तयार केली असली, तरी त्यालासुद्धा समजणार नव्हते की "हा आपल्याला 'गॉड' का म्हणतो आहे?" आणि याच्यामुळे मानसीचे नाव कुठेही झळकणार नव्हते.

सोहम आता रोज ऑर्कुटवर काहीतरी मेसेज लिहायचा. रोज उत्तराची वाट पाहायचा. रोज तिच्या घरापासून ४ किलोमीटर दूर थांबून, आसपास फिरून तिला शोधायचा. रोज थकून रात्री १०-११ वाजता घरी यायचा. रोज रडायचा.

कधी कधी स्वत:लाच समजावायचा "मुलीचा नाद भयानक असतो". कधी ही प्रेमात पडू नये".

हळू हळू त्याला अजून एक गोष्ट कळू लागली. "ज्या रस्त्याने आपण गाडीवरून कॉलेजला जातो, तो कधी कधी आपण विनाकारण बदलतो. आणि दुसऱ्याच रस्त्याने जातो. नेमके त्या रस्त्यावर, तिचे नाव असणारे दुकान तरी दिसतेच". किंवा, कुठेतरी गाडीवर तिचे नाव तरी दिसते. किंवा, कोणीतरी तिच्या नावाने हाक मारताना तरी ऐकू येते."

"आपण तर वेगळ्या रस्त्याने जाणार असतो. पण, आपण अचानक रस्ता का बदलतो".? आपल्याला कोणी तरी संमोहित (hipnotize) करत असावे." पण, असे संमोहित करून रस्ता बदलून घेणे शक्य आहे? असेलही, लोकांना कसल्या कसल्या विद्या येत असतात. टीव्ही वर आपण संमोहनाचे भरपूर प्रकार पाहिलेच आहेत. म्हणजे, गेले कित्येक दिवस आपण संमोहित होत आहोत. पण, नक्की कधीपासून? काहीच आठवत नाही. दिवसांपासून, महिन्यांपासून, वर्षांपासून? आपण संमोहित तर होत आहोत. कोण आपल्याला संमोहित करत असेल?" (लोकांना कोणत्या कोणत्या विद्या येतात? हे तर खरे पुढेच आहे).

अजूनही एक गोष्ट म्हणजे "आपण या खोट्या ऑर्कुटवरच्या प्रोफाईलला काहीही लिहिले, की त्या संबंधित काहीतरी उत्तर, आपल्या मित्रांच्या किंवा मैत्रिणींच्या एस.एम.एस ने मिळते.

वेगळे वेगळे संशय मनात येऊ लागले होते. "मी तर, मोजक्या विश्वासू लोकांव्यतिरिक्त कोणालाही मानसी बद्दल सांगितले नाही". कोणालाही माझी गोष्ट माहिती नाही. मग माझेच इतर मित्र-मैत्रिणी, या

संबंधित गोष्टीशी जुळणारे एस.एम.एस का पाठवतात?"

(थोडक्यात काय तर, समजा सोहमने मानसीला निरोप पाठवला आहे "माझे तुझ्यावर खूप प्रेम आहे.

तर सोहमच्या मित्राच्या मोबाईलवरून मेसेज येतो "मला विश्वास नाही").

हे काय चालले आहे? मी मानसीला मेसेज पाठवतो आणि उत्तर माझ्या मित्राच्या मोबाईलवरून मिळते?

"जर असे असेल, तर माझा मोबाईल सुद्धा हॅक झाला असणार. म्हणजे, मी जे फोन करतो, मी जे मेसेज पाठवतो, त्याच्यावरसुद्धा कोणाचेतरी लक्ष असणार."

"१३ ब सिनेमाप्रमाणे, आणि दैनंदिन मालिकांमध्ये सुद्धा आपल्याच आयुष्याची गोष्ट टीव्ही वर दाखवली जाते. "या मागे कोण असेल?"

"काहीतरी फार भयानक प्रकार आहे". सोहमला, भूत, तांत्रिक-मांत्रिक, अश्या गोष्टी खरंया वाटू लागल्या". "कोणीतरी आपल्यावर करणी, जादू, केली असावी. किंवा आपल्याला भुताने झपाटलेले असावे" असे वाटू लागले.

पण, मानसीची आठवण काही जात नव्हती. सोहम गेले दीड-दोन महिने, ऑर्कुटवर तिला काही ना काही मेसेज लिहीतच होता. निकाल सुद्धा जवळ आला होता. निकालाच्या दिवशी ती अगदी शेवटची दिसणार होती. पुन्हा काही दिसणार सुद्धा नव्हती.

दरम्यान, सोहम लव्ह-गुरुंकडून टिप्स घेत होता. विश्वास म्हणाला "हे बघ, मुलींना रडकी मुले आवडत नाहीत. असेही, तिने तुझा भरपूर अपमान केला आहे. तू जेव्हा निकाल घ्यायला जाशील, तेव्हा जुने कपडे नको घालूस. मस्त पैकी आवरून, दाढी वगैरे करून, चकाचक होऊन जा. तिच्याकडे पाहू सुद्धा नकोस. निकाल घे आणि घरी निघून ये." तिला प्रेम असेल, तर तीच काहीही करून तुझ्याशी बोलण्याचा किंवा काहीही प्रयत्न करेल. पण मी सांगतो तसेच वाग."

पण, सोहम काही ऐकणाऱ्यातला नव्हता.

निकाल यायला दोन तीन दिवसच बाकी होते. शेवटचा प्रयत्न म्हणून, सोहमने तिला फोन

करण्याचा प्रयत्न केला. सोहमचे नाव ऐकताच तिने फोन कट केला.

शेवटी सोहमने पुन्हा एक मेसेज केला "एकदा तरी माझ्याशी बोल."

पलीकडून मेसेज आला "shut the f... up and dare you messege o call me ever again (तुझा ...... पणा बंद कर. आणि पुन्हा कधीही, तू प्रयत्न तर करून दाखव, मला मेसेज किंवा फोन करण्याचा). सोहमला खूप भीती वाटली आणि रागसुद्धा आला.

आता सोहमचा आत्मसन्मान जागृत झाला होता. त्याने ठरवले "आता खड्ड्यात गेले सगळे. सगळे विसरून जायचे".

२ दिवस गेले. सोहमने ठरवले "ती निकाल घेऊन गेली, की मगच आपण कॉलेजला जायचे. तिला पहायचे सुद्धा नाही."

निकाल लागला होता. २ वाजले तरी सोहम कॉलेजला गेलाच नाही. दिनेशचा फोन आला. "अरे मानसी आली आहे. तू पण ये".

सोहमने त्याला पहिला प्रश्न काय विचारला असेल? माहितीये?

सोहम - तिने कोणत्या रंगाचे कपडे घातले आहेत?

दिनेश - काळा टी-शर्ट आणि काळी जीन्स.

काळा हा शब्द ऐकून सोहमने अजूनच दृढनिश्चय केला. "ती गेल्याशिवाय कॉलेजला जायचेच नाही". सोहम काही निघालाच नाही घरून.

शेवटी "कॉलेज बंद होऊन निकाल मिळणार नाही" या भीतीने, ३ वाजता सोहम कॉलेजला निघाला. साधारणपणे, ३.३० वाजता सोहम कॉलेजला पोचला. आत्तापर्यंत चांगले २-३ तास झाले होते दिनेशचा फोन येऊन. "आत्तापर्यंत मानसी निघून गेली असेल" असे समजून, मनात राग घेऊन सोहम निकाल घ्यायला गेला.

डोळ्यात आग होती....चेहरा मात्र शांत होता....
आज तो वेगळाच वाटला... राखेतून उठून आल्यासारखा...
नवीन आयुष्यात जाणार होता... सगळे जुने विसरून...
बदलला होता भोळा तो... नव्हता राहिला पहिल्यासारखा ...

निकाल पाहिला, (९७७/१५००), १५०० पैकी ९७७ गुण मिळाले होते. ६५.१३ टक्के मिळाले होते. फक्त १३ गुणांनेच, विशेष प्रावीण्याचा शेरा हुकला होता.



| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 060. | ENERGY MANAGEMENT | PP | 100 | 40 | 61 | P |
| 070. | SWITCHGEAR & PROTECTION | PP | 100 | 40 | 43 | P |
| 070. | SWITCHGEAR & PROTECTION | TW | 50 | 20 | 40 | P |
| 070. | SWITCHGEAR & PROTECTION | OR | 50 | 20 | 40 | P |
| 080. | DIGITAL CONTROL SYSTEM | PP | 100 | 40 | 49 | P |
| 080. | DIGITAL CONTROL SYSTEM | OR | 50 | 20 | 30 | P |
| 09B. | HIGH VOLTAGE ENGG (ELE-II) | PP | 100 | 40 | 50 | P |
| 09B. | HIGH VOLTAGE ENGG (ELE-II) | PR | 50 | 20 | 38 | P |
| 100. | PROJECT WORK | TW | 100 | 40 | 89 | P |
| 100. | PROJECT WORK | OR | 50 | 20 | 42 | P |

GRAND TOTAL = 977/1500 .RESULT: FIRST CLASS

१२ वी मध्ये ६४.१३% मिळाले होते.

डिप्लोमामध्ये ७४.१३% मिळाले होते.



| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| EE526 | PROJECT & SEMINAR(INHOUSE/INDUSTRY) | - - | - | 50 | 43 | - | 50/20 | 42 | - | - | - | 50/20 | 41 | P | 8 |
| EE721 | INSTRUMENTATION SYSTEMS | 80/28 | 50 | 20 | 18 | 68 | 25/10 | 20 | - | - | - | 25/10 | 19 | P | 6 |
| EE722 | ENERGY AUDIT AND CONSERVATION | 80/28 | 63 | 20 | 14 | 77 | 25/10 | 22 | - | - | - | 25/10 | 22 | P | 6 |
| EE724 | UTILISATION OF ELECTRICAL ENGG. | 80/28 | 63 | 20 | 14 | 77 | 25/10 | 16 | - | - | - | 25/10 | 17 | P | 6 |
| EE726 | INDUSTRIAL CONTROL | 80/28 | 46 | 20 | 16 | 62 | 25/10 | 19 | - | - | - | 25/10 | 20 | P | 6 |

Max Total Marks : [1500]
Total Credits Earned : 180
Total Marks Obtained : [1112 ]
Result : FIRST CLASS WITH DISTINCTION
Percentage : 074.13

इंजिनिअरिंगला ६५.१३% मिळाले होते आणि,

फक्त १३ गुणांनेच विशेष प्राविण्य हुकले होते.

एवढेच नाही तर, सोहमच्या भावाच्या, शाळेच्या सहलीच्या बसचा अपघातसुद्धा त्रयोदशिच्याच (१३व्याच) दिवशी झाला होता.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सोहमचा जन्म झाला तेव्हा हस्त नक्षत्र चालू होते. एकूण २७/२८ नक्षत्रांपैकी हस्त नक्षत्राचा नंबर कितवा आहे? माहिती आहे? हो, हस्त नक्षत्र १३वेच आहे.

१३ चा आकडा हात धुवून घेऊन मागे लागला होता.

निकाल घेऊन सोहम बाहेर आला. तोच मानसी समोर उभी होती. तिचा चेहरा हसरा जाणवला. कदाचित, सोहमकडेच पाहून हसत असावी. कदाचित, हवे तेवढे गुण तिला मिळाले असावेत.

पण, आज अंतिम दिवशी सोहमच्या चेहऱ्यावर राग होता. attitude होता. तिच्याकडे पाहिले, ती हसून पहात होती. काळ्या रंगाचे जर्किन आणि आत लाल रंगाची ओढणी होती. जणू काही ती रंगामधूनच इशारा करत होती "बाहेरून जरी मी तुझा तिरस्कार करत असले, तरी आतमधून तुझ्यावर प्रेम करते".

पण, सोहमचा राग अजूनच वाढला होता. तो काही समजण्याच्या मन:स्थितीतच नव्हता. सोहम निघून गेला होता.

खाली पार्किंगमध्ये पोचला. पण, रागाच्या भरात अंग थरथरत होते. काहीच लक्षात येत नव्हते. गाडी दिसतच नव्हती. चक्कर येत होती. रागामुळे डोळे मोठे झाले होते. जवळ जवळ, डोळयातले पाणी कधीही ओघळणार होते.

लक्षात आले "तीला कळू नये म्हणून, आपण गाडी गेटच्या बाहेरच लावली होती". बाहेर आला, गाडी काढली. रागात गाडीला किक मारून सोहम घराकडे रवाना झालासुद्धा होता."

"जी प्रेम कहाणी देवानेच लिहिली आहे" असे समजून सोहम आत्तापर्यंत विचार करत होता. तीच प्रेम कहाणी अगदी क्रूरपणे संपवून सोहम पुढच्या आयुष्यात पाय ठेवणार होता.

पण, याला इंजिनिअरिंगमध्ये मठ्ठ समजणाऱ्या शिक्षकांचा सुद्धा हा अगदी आदर्श विद्यार्थी झाला होता. पुन्हा हे शिक्षक सुद्धा पुढच्या मुलांना सोहमचे उदाहरण देऊ लागले होते. "आपल्या कॉलेजमध्ये एक मुलगा होता... नापास होत होत पास झाला......

(आदितीचा भाऊ, याच्या पाठोपाठ याच कॉलेजमध्ये शिकायला आला होता. तो नेहमी हे सांगत असायचा.) (आदिती म्हणजे, ती मुलगी, जिच्यासाठी सोहम ७-८ मुलांशी भांडला होता).

दहावीसुद्धा पास होणार नाही असे वाटणारा मुलगा, जवळ जवळ विशेष प्राविण्यासह इंजिनिअर झाला होता.

तर अशा प्रकारे गोष्टीचा तिसरा भाग संपला.

पण, अजूनही त्याला देवाचे विश्वरूप आणि विश्वाचे खरे रूप पहायचे बाकी होते. याला दुर्गामातेचा आशीर्वाद होता. त्याच नवदुर्गा भेटायच्या होत्या. अजूनही याची राधा, सीता भेटायच्या होत्या. १३ चा आकडा काय आहे? हे समजायचे होते. आपल्यावर कोण लक्ष ठेऊन आहे? हे समजायचे होते, मालिकेमध्ये घडणारे आपल्या आयुष्यात कसे घडते? हे समजायचे होते, सलमान खान (हो सलमान खान), याच्या आयुष्यात यायचा होता, सोहमचा अर्थ समजायचा होता. आयुष्यात घडणाऱ्या घटना, मालीकेप्रमाणेच कशा घडतात? हे शोधायचे होते.

## १५. मांजरांचे मृत्यू, मांजरांना राम-दऱ्याला सोडून येणे, पहिली नोकरी, कॅरेक्टर प्रकरणाची वाढ, मोठ्या, श्रीमंत लोकांशी पंगा, जीवनमरणाच्या रेषेवर पोचणे

आता सोहम चांगला इंजिनिअर झाला होता, ते सुद्धा पुणे युनिवर्सिटी मधून. आश्चर्य म्हणजे, त्यांच्या देशमुख कुटुंबातला पहिला इंजिनिअर होता सोहम. अजूनही त्याला कॅल्क्युलेटर वापरता येत नव्हते. उणीव म्हणजे, सोहम साधारणपणे सव्व्हीस वर्षाचा होणार होता. लहान भाऊसुद्धा कामाला लागला होता. पण, सोहमला आता काम शोधायचे होते.

हृदय तुटले होते. आत्तापर्यंत झालेल्या अपमानाचा राग सुद्धा येत होता. टीव्ही सिरियल्स मध्ये घडते, तसेच आयुष्यात सुद्धा घडत होते. जेव्हा सोहमचे स्वत:चे मन मोडले तेव्हा "आत्तापर्यंत किती मुलींची मने आपल्या मुर्खपणामुळे मोडली आहेत" हे याला आठवू लागले होते.

तसेच, जसे मानसी आयुष्यातून गेली, तसे याची मांजरं एक एक करून मरू लागली. झाले असे की, यांच्याकडे २४ मांजरं होती. गेल्या काही दिवसात, कॉलनीमध्ये कोणाच्याही घरी मांजराने घाण केली, की ते सगळे सोहमच्या आईशी भांडायला येऊ लागले होते. दिवसातून कमीत कमी १०-१५ वेळा, आईला मांजरांची घाण साफ करावी लागत होती. मांजरे आपापसाथ भांडणे करायची. दिवसात ५०-६० वेळा तरी, सोहमच्या आईला ही भांडणे सोडवण्यासाठी पळावे लागायचे.

अशातच, कॉलनीमधल्या लोकांनी यांच्या मांजरांना नॉन-व्हेज मध्ये विष घालून खाऊ घालायला सुरुवात केली. मांजरे पटापटा मरू लागली होती.

२४ पैकी ५ मांजरे अशीच विष-प्रयोगामुळे मेली होती. "लोकांनी मांजरे मारण्यापेक्षा आपण त्यांना युनिवर्सिटीच्या जंगलात सोडून येऊ" असे सोहमच्या आईला वाटू लागले होते. झाऽले, सोहम, आई, बाबा आणि भाऊ, ५-१० मांजरे पोत्यात घालायचे. आणि थेट युनिवर्सिटीच्या जंगलात सोडून यायचे.

पुन्हा सगळे घरी आल्यावर रडण्यात २-३ तास घालवायचे. पुन्हा "होईल ते बघता येईल" असे म्हणून, सगळी मांजरे परत घेऊन यायचे. सोहम मासे देतो म्हणून सगळी मांजरे सोहमकडे यायची. सोहम परत त्यांना पोत्यात भरून घरी घेऊन यायचा. गेले पाच सहा महिने हाच प्रकार सुरु होता.

भांडण झाल की मांजरे सोडायची आणि वाईट वाटले की परत घेऊन यायची. असा प्रकार गेले कित्येक महिने चालू होता. बहुतेक मांजरांना सुद्धा वाटत असेल "आपल्याला सहलीला घेऊन जात आहेत."

मानसीचा विचार काही मनातून जात नव्हता. "आपले मन खोटे बोलणार नाही. तिला आपण आवडत होतो" असे वारंवार वाटत होते.

"तिचे लग्न होईपर्यंत आपण प्रयत्न करतच राहायचा" असे सोहमने ठरवले. सोहम रोज काहीतरी प्रयत्न करायचा. ऑर्कुटवर जाऊन, त्या खोट्या/नसणाऱ्या व्यक्तीला रोज काहीना काही मेसेज लिहून यायचा. कधी प्रेम दाखवत होता. कधी शिव्या देत होता. पुन्हा वाईट वाटले की माफी मागत होता. २-३ महिने असेच चालू होते.

दरम्यान, अक्षय, संकेत आणि सोहमची मैत्री पुन्हा जुळली होती. तिघेही इंजिनिअर झाले होते. अक्षय नेहमी सहली, मित्रांना भेटणे, अश्या गोष्टी ठरवत होता. असेच एका सहलीला गेले असताना सोहमची ओळख शायनाशी झाली. ती सुद्धा, अशीच सोहमसारखी, तुटलेले मन आणि तुटलेले प्रेम जोडायचा प्रयत्न करत होती.

सोहम आणि शायनाचे ट्युनिंग मस्त जमले होते. दोघे रात्री १२ वाजेपर्यंत कुठे कुठे भटकत बसायचे. वाकड, हिंजवडी, बाणेर, सिंहगड रस्ता, अश्या ठिकाणी दोघे रात्री अपरात्री जाऊ लागले होते. पहिल्यांदाच सोहम, कोणातरी मुलीबरोबर एक महिन्यापेक्षा जास्त काळ बोलत होता. सोहम तिला आणि ती सोहमला, आपली दर्द-भरी प्रेम कहाणी सांगून रोज बोर करायचे, रडायचे. निखळ मैत्री यालाच म्हणत असावे.

पण, मानसीची आठवण काही पिच्छा सोडत नव्हती. सुट्टीत सोहमचा कार्यक्रम ठरलेला होता. सगळे मित्र-मैत्रिणी दिवसा ऑफिसला जायचे. तेव्हा सोहम ऑर्कुटवर जायचा. त्या खोट्या प्रोफाईलला मानसी समजून पटवायचा प्रयत्न करायचा. संध्याकाळी मित्र-मैत्रिणींना भेटायला जायचा. असेच एकदा, सोहमने ऑर्कुटवर तिच्यासाठी मेसेज लिहून ठेवला. खरेतर, कुठेतरी वाचलेलीच गोष्ट होती ती -

"एकदा एका राज्यात एक लाकुडतोड्या असतो. तो राजवाड्यात जातो तेव्हा राजकुमारीला पाहतो. त्याला राजकुमारी खूप आवडते. तो सगळ्या भावना तिला सांगतो. तिला म्हणतो "मी, जंगलात असणाऱ्या गुलमोहराच्या झाडाखाली पुढचे १०० दिवस तुझी वाट पाहीन. तू आलीस तर लग्न करीन आणि नाही आलीस, तर पुन्हा कधीही दिसणार नाही".

लाकुडतोड्या ९९ दिवस वाट पहातो पण राजकुमारी काही येत नाही. उद्या १०० वा दिवस

असतो. लाकुडतोड्या रात्रीच निघून जातो. १००वा दिवस उजाडण्याअगोदरच लाकुडतोड्या निघून गेलेला असतो. कारण, त्याला स्वत:च्या प्रेमावरच विश्वास मरू द्यायचा नसतो. निघून गेल्यावर कळणार नसते, की ती आली की नाही. मनाला समजावता येणार असते "ती आली होती, पण मीच नव्हतो तिला घ्यायला." अर्थातच, सोहम लाकुडतोड्या होता. आणि मानसी म्हणजे राजकुमारी.

संध्याकाळी, पायल नावाच्या मैत्रिणीचा सोहमला एस.एम.एस आला (नेहमीप्रमाणे, सोहमने मानसीला पाठवलेल्या मेसेजचे उत्तर इतर कोणाच्यातरी मोबाईलवरून आले) -"राधा आणि कृष्ण कधीही भेटले नाहीत. पण कधीच वेगळे सुद्धा झाले नाहीत." आता ही पायल म्हणजे, डिप्लोमाला सोहमसोबत शिकत होती.

दोन तीन दिवस असेच चालू होते. सोहम, मानसीला ऑर्कुटवर काहीतरी मेसेज लिहून यायचा. त्याचे उत्तर पायलच्या एस.एम.एस मधून येऊ लागले होते. "जेव्हा तो हसायचा, मला वाटायचे स्वर्ग मिळाला. त्याचे हसणे पाहून सगळे दु:ख विसरले जायचे" असेच काहीतरी.

आता हा विचार करू लागला. "यार, पायल डिप्लोमाला सोबत शिकत होती आणि मानसी डिग्रीला. या दोघींचा काहीही संबंध नाही. मग, पायल मला मानसीशी संबंधित एस.एम.एस कसे काय पाठवते?

याला वाटले "कदाचित जसे माझे झाले आहे, माझ्यावर कोणाचेतरी दिवस रात्र लक्ष आहे, कोणीतरी माझ्यावर पाळत ठेऊन आहे. कदाचित तसेच, मानसीवर सुद्धा कोणीतरी पाळत ठेवलेली असू शकते." तिचाही मोबाईल कोणीतरी हॅक केला असू शकतो". म्हणूनच ती मैत्रिणीच्या मोबाईलवरून मला मेसेज करत असेल." (हो, आजकाल भरपूर मोबाईल हॅक झालेले आहेत.)

तर सोहमने ठरवले "या गोष्टीचा छडा लावायचा". किंवा पायललाच मदत मागायची". सोहमने पायलला कॉलेजमध्ये भेटायला बोलावले. पायल तिच्या एका मैत्रिणीला सोबत घेऊन आली. या मैत्रिणीला, डिप्लोमाला असताना सोहम आवडत होता. तिचे नाव प्रीती. तर, प्रीती आणि पायल कॉलेजमध्ये सोहमला भेटायला आल्या.

सोहमनेच डिप्लोमाला असताना पायल आणि सतीशचे प्रेम प्रकरण जुळवून दिले होते.

इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर, महत्वाच्या गप्पा सुरु झाल्या.

सोहम - कसे चालले आहे सतीश बरोबर?

पायल - डिप्लोमा संपल्यावर एका वर्षाने आमचे ब्रेक-अप झाले होते. ते जाऊदे, तुझे काही प्रेम बीम?

सोहम - (एकदम दुखती नस पकडली गेल्यासारखा, डोळयात पाणी आणून) होते ग, पण ती आधीच एंगेज होती.

पायल - म्हणूनच असा वेड्यासारखा अवतार झाला असेल तुझा. आणि, तू स्वत: एकटाच बडबड करतोस असे वाटते. जाऊदे, आपण दुसरा विषय काढू. (बहुतेक सोहमचे दु:ख तिला सहन झाले नसावे).

पायल - तुला माहिती आहे का? तू कॉलेजमध्ये आलास की नाही? हे आम्ही तुझी पिवळी गाडी पाहून ओळखायचो. तू आलास की आम्ही गाणे म्हणायचो "वो ही अलबेला मद नैनो वाला". तू दोन-तीन मुलींसाठी भांडला होतास. म्हणून तू 'किस्ना' म्हणून प्रसिद्ध होतास मुलींमध्ये. (सगळ्यांनाच कृष्ण बनायला फार आवडते. कृष्ण म्हणून घ्यायला फार आवडते. आज सोहमला सुद्धा कोणीतरी कृष्ण म्हणाले होते. पण कृष्ण बनणे सोप्पे नाही. सोहमसाठी तर नाहीच नाही).

पायल - (अचानक तिसऱ्यांदा विषय बदलून) पण लग्नाला बोलावशील ना?

सोहम - (मनातच - म्हणजे, पायलच ती मैत्रीण आहे काय मला मदत करणारी? तीच बहुतेक, माझे आणि मानसीचे लग्न ठरवणार आहे की काय?) असेही त्याला 'किस्ना' म्हणाल्यामुळे, सोहम खूष झाला होता).

सोहम - (सावरून) हो बोलावेल की.

पायल - चला निघू आता. ७.३० वाजले आहेत.

संध्याकाळी सोहमचे विचार चक्र पुन्हा सुरु झाले. "एकीकडे मानसी आहे, जी आत्तापर्यंत इंग्रजी शिवाय आपल्याशी बोललीसुद्धा नाही. आपल्याशी बोलताना, कधीही चेहऱ्यावरचा स्कार्फ सुद्धा हटवला नाही. दुसरीकडे पायल आहे, जी आपल्याला मदत करत आहे. असेही पायलसुद्धा ब्राम्हण आहे. आपले लग्न जमू शकते. आपण पायललाच विचारू लग्नासाठी."

झाले, सोहमने थेट मेसेजच लिहून ठेवला. रात्रीचे १०.३० - ११ वाजले होते. सोहमने एस.एम.एस टाईप करून ठेवला "मला तू खूप आवडतेस". सोहम एस.एम.एस पाठवणार, तोच त्याच्या पायावर पाल पडली. (पंच-महाभूतेसुद्धा सोहमला मदत करत होती. पाल पायावर पडण्याचा अर्थ होता "अरे असे करू नकोस, अपशकून होईल).

पण सोहम देवाचे सुद्धा ऐकायच्या मन:स्थितीत नव्हता. झालेला अपमान वारंवार आठवत होता. शेवटी, सोहमने तो एस.एम.एस पायलला पाठवलाच. पुढे खरंच अपशकून होणार होता.

पुढे सोहम आणि पायल एकदा डेटवर सुद्धा गेले. डेटवर म्हणजे, कॉफी प्यायला हॉटेलमध्ये. पण, पायल काही सोहमच्या प्रपोजलचे उत्तर देतच नव्हती. ना ती फोन उचलत होती. ना एस.एम.एस चे उत्तर देत होती. शेवटी सोहमने समजून घेतले. असेही, पूर्वी हसण्याने घायाळ करणारा सोहम आता रडका झाला होता. आणि अशा रडक्या मुलासोबत कोण लग्न करणार?

३ महिन्यात दोन प्रेमभंग मिळवले सोहमने. हा विषय सुद्धा बंद झाला होता.

दरम्यान, शायनाने सोहमसाठी एक नोकरी शोधली. ज्या कंपनीमध्ये डिप्लोमानंतर सोहमला नोकरी मिळू नाही शकली. तिथेच, देवाने याला नोकरी मिळवून दिली होती. आणि, अजून एक स्वप्न पूर्ण केले सोहमचे. पण, पगार होता फक्त ८५००/- रुपये. "डिग्री नंतर सुद्धा एवढा कमी पगार मिळतोय" हे पाहून सोहमचे मनच उडाले नोकरीवरून. दोन दिवसातच सोहमने नोकरी सोडून सुद्धा दिली.

आता सोहम स्वत: दुसरी नोकरी शोधण्यासाठी फिरू लागला. "आपण तसे बोलके आहोत. आपण मार्केटिंग करू" असे वाटून, सोहमने एका इंजिनिअरिंग कंपनीमध्ये मार्केटिंग इंजिनिअरची नोकरी मिळवली. (आपण बोलके आहोत हे याला कसे काय वाटले? तोच जाणे).

स्पर्धेचे जग कसे असते? ते आता कळणार होते.

घरी मांजरांचा उपद्व्याप फार वाढला होता. वडील आता निवृत्त होणार होते. कॉलनीमधले घर सोडून स्वत:च्या घरी जायचे होते. तिथे काही जवळ जंगल नव्हते, मांजरांना खेळायला जागा नव्हती. माणूस हा एकच इतका हरामखोर प्राणी आहे, ज्याने सगळ्या प्राण्यांचे जगणे हराम करून ठेवले आहे. कॉलनीमध्ये मांजरे ठेवली असती, तर लोकांनी त्यांना मारून टाकले असते.

एकदा तर कॉलनीमधल्या एका माणसाने, शेजारीच खेळत असणारे एक १०-१५ दिवसांचे

मांजराचे पिल्लू, थेट लाथेने फूट-बॉल सारखेच उडवून लावले. पिल्लू मेले नाही. पण, थोडे जखमी झालेच. नेमका, सोहम त्यावेळीच मांजरांसाठी मासे घेऊन येतच होता. त्या दिवशी पहिल्यांदाच सोहमने, वयाने मोठ्या असणाऱ्या व्यक्तीला आई-माईवरून शिव्या दिल्या होत्या. खूप भांडण झाली त्या दिवशी.

शेवटी, मनावर दगड ठेऊन मांजरे राम-दऱ्याला सोडण्याचा निर्णय घेण्यात आला.

एक चार चाकी भाड्याने घेतली. सकाळीच सगळी मांजरे - कोणी झोपले होते, कोणी खेळत होते, कोणी खात होते, कोणी कालच बाळन्तीण झाले होते, कोणाची पिल्ले फक्त १०-१२ दिवसांची होती, कोणी लंगडत होते, कोणी आजारी होते.. तर सोहमने, होती त्या अवस्थेत १०-१२ मांजरे पकडली आणि पोत्यात घातली.

मिळाली तेवढी मांजरे पोत्यात भरली गेली होती. गाडी निघाली, आणि थेट राम-दऱ्याला पोचल्यावरच पोत्याचे तोंड उघडले गेले होते.

कोणाची आई राम-दऱ्याला सोडली होती. कोणाची पिल्ले राम-दऱ्याला सोडली होती.

"एकदमच, आपण नवीन जागी आलो आहोत. आपल्या मालकाने आपल्याला सोडून दिले आहे" हे कळून सगळी मांजरे सैरावैरा धावत सुटली. सगळी घाबरली होती. कोणी झाडावर चढले. कोणी जंगलात पळून गेले. कोणी कुठे लपून बसले होते. पण नजरा, सोहम आणि आईकडेच होत्या. सगळयांच्या नजरा विचारत होत्या "आम्ही काय गुन्हा केला तुमचा, म्हणून तुम्ही आम्हाला अनोळखी लोकांत, अनोळखी ठिकाणी आणून सोडलेत?. "आम्हाला घरी घेऊन चला, आम्ही त्रास देणार नाही".

सगळ्या मांजरांची ताटातूट झाली होती. गाडीतच सोहम आणि आई रडू लागले. पण काय करता येणार होते? आई आणि पिल्लांची ताटातूट केल्याचे पाप लागणार होते. पण, सोहम आणि आई रामाला रडून रडून म्हणत होते - "रामा, तूच दिलीस सगळी पिल्ले. जमेल तेवढे सांभाळले. आता तुझ्याच दारात सोडत आहोत. आता तूच सांभाळून घे".

घरी आल्यावर पाहिले तर, ज्यांची आई राम-दऱ्याला सोडली होती, तिची पिल्ले "आई आई" करून रडत होती. जिची पिल्ले राम-दऱ्याला सोडली होती, त्या मांजरीची नजर सोहमला मूकपणे विचारत होती "कुठे आहेत माझी पिल्ले? का सोडलेस त्यांना? कुठे नेलेस त्यांना? का ताटातूट केलीस आमची?"

घरी असणार कोणतही मांजर, आज दुधाला, माश्यांना तोंडसुद्धा लावत नव्हतं. "आपल्या नातेवाईकांना लांब कुठेतरी सोडून आले आहेत" हे त्यांना समजलं होत. आज घरी कोणीही जेवलं सुद्धा नाही. आईने तर रडून रडून डोळे सुजवून घेतले होते. सोहमच्याही डोळयातले पाणी थांबायचे नाव घेत नव्हते.

ज्या पिल्लांच्या आईला राम-दऱ्याला सोडले होते, ती पिल्ले तर जवळ जवळ अर्धमेलीच झाली होती. एक मांजर, जी कालच बाळन्तीण झाली होती. तिला तिच्या एक दिवसाच्या पिल्लांसोबत सोडण्यात आले होते. पिल्ले तर मंदिरात सुरक्षित होती. पण, मांजर मात्र घाबरून जंगलात पळून गेली होती. नवीन ठिकाण असल्यामुळे, ती पिल्लांजवळ जाईल याची शक्यताही खूप कमी होती. "ती एक दिवसाची पिल्ले मरून जातील" असे वाटू लागले.

सोहमची आई म्हणाली "बहुतेक आपल्याला खूप पाप लागेल, आई आणि पिल्लांना दूर करण्याचे."

सोहम - आई, आपण काय करू शकणार होतो? इथे लोकांनी मारण्यापेक्षा, त्यांना आपण रामाच्या दारात सोडून आलो आहोत.

आई - पण ती (तिचे नाव वकील मामा होते, कारण तिचा रंग वकिलांच्या ड्रेस सारखा होता) वकील मामा पिल्लांजवळ जाणार नाही. पिल्ले एक दिवसाचीच आहेत, मरून जातील आईविना. मुंगसाची पिल्ले इकडे आहेत आणि मुंगसाला आपण तिकडे सोडले. आपले चुकले.

सोहम - आई, मी जाऊ का राम-दऱ्याला?. मुंगसाची पिल्ले घेऊन जातो. वकील मामा आणि तिची पिल्ले घेऊन येतो.

आई - तुला कसे जमणार आहे, दुचाकीवर एवढे सगळे करायला?

सोहम - आई तू काळजी करू नकोस. मी करतो बरोबर सगळे.

आई - मी पण येते बरोबर.

सोहम - नको, तू असलीस तर गाडी व्यवस्थित चालवता येणार नाही. मी निघतो.

सोहमने कॉलेजची बॅग घेतली. त्यामध्ये मुंगसाची पिल्ले ठेवली. वकील मामाची पिल्ले ठेवण्यासाठी अजून एक पिशवी सोबत घेतली. सोहम आता, मुंगसाच्या पिल्लांना तिच्याजवळ सोडायला.

आणि वकील मामाला तिच्या पिल्लांसोबत परत आणायला निघाला होता.

गाडीला किक मारून सोहम निघालासुद्धा होता. पाठीवर कॉलेजची बॅग होती, बॅगेत दोन पिल्ले होती. खडकी स्टेशन, शिवाजी नगर, पुणे स्टेशन, हडपसर, लोणी काळभोर, असे करत सोहम, ५.३० वाजता परत राम-दऱ्याला पोचला सुद्धा. अधे मध्ये तो, पिल्ले व्यवस्थित आहेत की नाही? हे तपासत होता. पिल्ले व्यवस्थित होती. पण, घाबरून बॅगमध्ये सारखी शी करत होती.

शेवटी सोहम राम-दऱ्याला पोचला. मुंगूस झाडावर चढून बसले होते. सोहमने त्याची पिल्ले झाडाखाली ठेवली आणि निघून गेला.

आता सगळयात अवघड काम बाकी होते. ते म्हणजे, वकील मामाची चार पिल्ले आणि वकील मामा स्वत:, अशी पाच मांजरे एकाच वेळी घरी परत आणायची होती. रामदरा ते खडकी हे अंतर असेल ३०-४० किलोमीटर. एवढे सगळे अंतर त्याला दुचाकीवरून आणि पाच मांजरे सोबत घेऊन पार करायचे होते.

वकील मामा जंगलात पळून गेली होती. पिल्ले कालच जन्मली असल्यामुळे ठेवली तिथेच होती.

सोहमने आधी बॅग साफ करून घेतली. त्याने ठरवले "पिल्लांना जवळच्या पिशवीत ठेवायचे, आणि वकील मामाला कॉलेजच्या बॅगमध्ये. पिल्ले काही हालचाल करणार नाहीत. पिल्ले ठेवलेली पिशवी गाडीच्या हॅन्डलला लटकवायची. वकील मामाला ठेवलेली कॉलेजची बॅग, पोटाच्या बाजूने पुढच्या बाजूला घ्यायची. म्हणजे, वकील मामाने गाडीवरून उडी मारण्याचा प्रयत्न केला तर चेन आवळता येईल."

पण सगळयात अवघड होते, ते म्हणजे वकील मामाला शोधून पकडणे. सोहम शेजारच्या जंगलात गेला "वकील मामा" वकील मामा" असा आवाज देऊ लागला. संध्याकाळ होत होती. अजून २० मिनिटांने काहीच दिसले नसते. अंधार पडू लागला होता. पण तेवढ्यात वकील मामा दिसली. वकील मामाला सोहमच्या जवळ यायचे होते. पण, सकाळच्या प्रकारामुळे ती फार घाबरून गेली होती. जवळच येत नव्हती.

सोहमलासुद्धा मांजरांचा चांगलाच अनुभव होता. शेवटी सोहम जागेवरच बसून राहिला. हळू हळू वकील मामा जवळ आली. सोहमने एका झटक्यात तिला पकडून बॅगमध्ये ठेवले. चेन लावून घेतली. तिला श्वास घेता यावा म्हणून चेन थोडीशी उघडी ठेवली. साक्षात राम पाठीशी उभा होता.

पण, वकील मामा बाहेर पडण्यासाठी थोडीशी धडपड करू लागली होती. जेव्हा जेव्हा बॅगेत

हालचाल व्हायची, तेव्हा सोहम म्हणायचा "वकील मामा, तुला घरी नेणार आहे. तू काळजी नको करूस. फक्त अर्धा तास, फक्त अर्धा तास."

सोहमचा आवाज ऐकून, पुढच्या १० मिनिटांसाठी वकील मामा शांत व्हायची.

सोहमने जवळच्या पिशवीत दोन तीन मोठी कापड टाकली. वकील मामाची पिल्ले त्यावर ठेवली. पिल्लांची पिशवी गाडीच्या हॅन्डलला अडकवली. वकील मामाला ठेवलेली बॅग, पोटाच्या बाजूने खांद्याला अडकवली. टाकीवर आधार मिळेल अशी लावली. निघता निघता झाडापाशी नजर टाकली. आत्तापर्यंत मुंगूस, झाडावरून उतरून पिल्लांना चाटू लागली होती. गाडीला किक मारून सर्कस करत, सोहम पुन्हा घराकडे निघाला होता.

गाडी ५०-६० च्या वेगाने घरी निघाली होती. अधे मध्ये वकील मामाचा बाहेर पडण्याचा प्रयत्न चालूच होता. पण सोहम, कधी तिच्याशी बोलून, कधी बॅगवर हात फिरवून, कधी चेन घट्ट लावून वकील मामाला आधार देत राहिला. हडपसर गेले आणि रेस कोर्स जवळ, एका बसला ओवरटेक करण्याच्या नादात गाडी खड्ड्यात घुसली. शेजारच्या भिंतीवरच आदळली असती. कदाचित सोहम वाचला असता. पण, पाच किंवा चार जीव तर नक्कीच गेले असते. सोहमला गाडी कंट्रोलच होत नव्हती. अशा वेळी देवच हवा होता वाचवण्यासाठी. कशी गाडी रस्त्यावर पुन्हा आली? ते सोहमलासुद्धा सुद्धा समजले नाही.

"फक्त १० मिनिटे, फक्त ५ मिनिटे, फक्त २ मिनटे, आलंच आपले घर" असे करून, सोहमने वकील मामाला शांत ठेवले आणि शेवटी एकदाचे घर आलेच.

घरी आल्यावर, आई तर सोहमला चमत्कारी पुरूषच समजू लागली. भावाने सुद्धा विचारले? "दादा, कशी काय एवढी चार पिल्ले, आणि २ वर्षाची मांजर तू गाडीवर घेऊन आलास?" (सोहम मनातच म्हणाला "इरादे तेरे नेक, तो खुदा तेरे साथ होता है बंदे").

तर अश्या तऱ्हेने देवाने, सोहमला आणि त्याच्या कुटुंबाला, आई आणि पिल्लांना दूर करण्याचे पाप लागण्यापासून वाचवले होते.

आता सोहम नोकरीला लागला होता. पहिले चार महिने ११ हजार रुपये पगार आणि चार महिन्यांने, सोहमचे काम आवडले तर नोकरीत कायम होणार होता. नंतर १४००० रुपये मिळणार होते. पण

ऑफिसमध्ये पहिले काही दिवस, मार्केटिंग कसे करायचे? काहीच कळत नव्हते.

१ महिन्याने वडील सेवा निवृत्त झाले. यांना कॉलनीमधली सरकारी जागा सोडायला लागली. आता सोहमचे कुटुंब स्वत:च्या घरी राहायला आले होते. ८-९ मांजरे खडकीलाच राहू दिली होती. त्यांना नवीन घरी घेऊन जाणे शक्य नव्हते.

पण, सोहम भोसरीला कामाला होता. नवीन घर पुणे स्टेशनच्या जवळ होते. जाताना रस्त्यात खडकी लागते. आईने सोहमला नवीन ड्युटी दिली होती. संध्याकाळी ऑफिस सुटले, की खडकीला जाऊन तिथल्या मांजरांना मासे टाकून मग घरी यायची. सोहम रोज खडकीच्या मांजरांना मासे टाकायला जाऊ लागला होता.

ऑफिस मध्ये मात्र काहीच समजत नव्हते. पण तिथले काही साहेब सांभाळून घेत होते. आधी प्रोडक्शन, मग टेस्टिंग, मग ई-मेल बघणे, असे करत करत, हळू हळू सोहमला ट्रेनिंग दिली जात होती. ई-मेल पाहायला आला, की सोहम ऑर्कुटवर जाऊन त्या नकली मानसीला काही तरी मेसेज, निरोप टाकतच होता.

नविन घराजवळच चुलत मामा-मामी रहात होते. मामाला दोन मुली होत्या. नोकरी सुरु झाल्यापासून सगळे मित्र आता तुटू लागले होते. मित्र स्वत:च्या कामात बिझी आणि सोहम त्याच्या, असे होऊ लागले होते. ऑफिसमध्ये सगळे नवीन आणि सोहमपेक्षा जास्त अनुभवी होते. कोणी मित्रही झाला नव्हता अजून. सोहम पुन्हा एकटा पडू लागला होता. अजूनही, मानसीचे दु:ख विसरू नव्हता शकला सोहम.

नेहमी वाटत होते, "ती कधीतरी येईल. कधीतरी, काहीतरी मेसेज पाठवेल" कुठेतरी दिसेल" पण असे काहीच होत नव्हते.

"काही दिवसांनी आपले लग्नाचे वय होईल, आणि मानसी परत भेटू शकणार नाही". सोहमचा संयम अजूनच तुटू लागला होता. पण काहीच करता येत नव्हते. रोज, कणाकणाने निराशाच हाती येत होती.

आपण तिलाच "कॅरेक्टरलेस" (चारित्र्यहीन) म्हणालो" असे वाटून आता त्याचेच मन त्याला खायला लागले होते. पुन्हा वाटायचे "आपल्याला तर माहितीसुद्धा नव्हते, ती खोटी प्रोफाईल कोणाची आहे ते? कोणीतरी आपल्याला संमोहितसुद्धा करते आहे." विचार करून करून, डोके अगदी सुन्न पडू लागले होते.

दोन तीन महिने झाले असतील कामाला लागून. सोहमच्या लांबच्या दोन बहिणी, या काळातच

पुण्यात शिकण्यासाठी आल्या होत्या. संध्याकाळी सोहम घरी पोचला, की कधी कधी त्या घरीच असायच्या.

सोहमला वाटले, "या आपल्याच वयाच्या आहेत. आपण आपल्या भावना यांच्यासमोर मांडू शकतो." या वयाने मोठ्या आहेत. आणि मुलीसुद्धा आहेत. मुलींना कॉमन सेन्स चांगला असतो. या आपल्याला काहीतरी मदत करतील."

असेच एकदा, एक बहीण घरी आलेली असताना सोहमला वाटले "आपण मनातल्या भावना हिच्याबरोबर शेअर करू शकतो, हिला सांगू शकतो".

बोलता बोलता सोहमने मानसीचा विषय काढला. आपली प्रेम कहाणी तिला सांगू लागला. सोहम म्हणाला "मी तिला "कॅरेक्टर लेस" म्हणायला नको होते". मनात असणारी  सल, त्याने शेवटी कोणालातरी सांगितलीच होती.

इथे खरी सुरुवात झाली होती, सोहमच्या अधोगतीची.

दुसऱ्या दिवशी सकाळी सोहम ऑफिसला गेला. ऑफिसमधला सिनियर म्हणाला "मित्र, खराब है तेरा चरित्र."

सोहमला वाटले "अरे, हे तर काल मी माझ्या बहिणीसोबत बोलत होतो. याला कसे काय कळाले?" जाउदे काहीतरी योगायोग झाला असेल".

तेवढ्यात दुसरे एक सर म्हणाले "कसे काय वाटले सोहम, माझे "कॅरेक्टर"?.

हा योगायोग तर नक्कीच नव्हता. ऑफिस मधल्या लोकांना कसे काय कळाले, सोहमचे आणि त्याच्या बहिणीचे बोलणे? एक तर बहिण त्यांना मिळाली होती किंवा मायक्रोफोन लावला होता, सोहमच्या घराजवळ कुठे तरी.

आता सोहमच्या वैय्यक्तिक आयुष्यातल्या कमजोरीचा फायदा उठवला जाऊ लागला होता. सोहम कुठेही काहीही बोलला, की ते थेट ऑफिस मध्ये समजू लागले होते. सोहमने ऑफिसमध्ये मोठा आवाज केला, कोणाशी हसून बोलला, एखाद्याची चूक दाखवून दिली, की "कॅरेक्टर" हा शब्द पुढे केला जाऊ लागला होता. बहुतेक, व्यावसायिक (प्रोफेशनल) आयुष्य असेच असते. सगळे जण स्वत:ची पोळी भाजून घेण्याच्या नादात असतात. सोहमला हलकी कामे दिली जाऊ लागली होती.

हे तर काहीच नव्हते. सोहम मनात जो विचार करायचा, तो सुद्धा ऑफिस मधल्या लोकांना समजत होता. सोहम विचार करायचा "आपल्याला अजून फक्त संशय आहे. नक्की काय प्रकार आहे? ते माहिती नाही. विना पुराव्याचे, आपण कोणालाही काहीही बोलू शकत नाही."

दुसऱ्या दिवशीच ऑफिस मधला एक जण म्हणाला "काय सोहम, विना पुरावा, तू काहीही करू शकणार नाहीस म्हणे?"

सोहमने पुन्हा विचार केला "राजीनामा देऊन टाकू. एक तर ही सगळी देव असतील. किंवा यांना काहीतरी जादू येत असेल. यांना आपल्या मनातले सुद्धा कळते. "आपण आजपर्यंत, सगळ्यांना तारखेसोबत भविष्य सांगितले आहे." आपण सांगून टाकू, की मी या तारखेला राजीनामा देणार आहे."

तेवढ्यात एक सर जवळ येऊन म्हणाले "३१ तारीख हं सोहम. ३१ तारखेला, घरी सत्य-नारायणाची पूजा आहे".

सोहम अजूनच घाबरून गेला. ऑफिस मधल्या लोकांना सोहमचे मनसुद्धा वाचता येत होते. म्हणजे, बाहेर कोणाशीही, मनातल्या गोष्टी बोलणे बंद झाले होते. त्याहूनही मोठी गोष्ट म्हणजे, मनात सुद्धा बोलता येत नव्हते. मनात सुद्धा कोणाला शिव्या देता येत नव्हत्या.

सोहमची अवस्था, संदीप आणि सलीलच्या त्या गाण्यासारखी झाली होती:

"मी पंतोजींना भ्यालो, मी देवालाही भ्यालो, मी **मनातसुद्धा** साधा, कधी दंगा केला नाही."

"मी मोर्चा नेला नाही, मी संपही केला नाही,........."

आजकाल सोहम, सारखे हेच गाणे गुणगुणू लागला होता.

सोहमने ठरवले "आपण दुसरी नोकरी शोधायची."

असेच एकदा, सोहमला एका कंपनीमधून मुलाखतीसाठी बोलावणे आले. ही तीच कंपनी होती, जिथे पायल काम करत होती. सोहमने पायलला फोन करून भेटायला बोलावले.

पायल - का रे? एवढ्या घाई घाईत का बोलावलेस?

सोहम - अग, तुझ्या कंपनीमधून मला नोकरीसाठी बोलावणे आले आहे.

पायल - तू काय सहज नोकरी मिळवशील. असेही, तू कोणालाही सहज गंडवू शकतोस.

"ही अशी का टोचून बोलते आहे?" हे काही सोहमला समजेनासे झाले.

दुसऱ्या दिवशी, मुलाखत देण्यासाठी सोहम पायलच्या कंपनीत गेला. मुलाखत देताना, दोन-तीन प्रश्नांची उत्तरे येत नसल्यामुळे त्याने फेका मारायला सुरुवात केली.

मुलाखत घेणाऱ्या सरांने, नेमके काल पायल म्हणाली तेच शब्द वापरले - "सोहम, गंडवू नकोस".

म्हणजे, पायल आणि मुलाखत घेणारे सर सुद्धा मिळालेले होते की काय?.

सोहम मुलाखतीमध्ये नापास झाला. होती तीच नोकरी, अजून काही दिवस करायलाच लागणार होती.

सोहम दुसऱ्या दिवशी ऑफिसला गेला.

आल्या आल्या ऑफिसमधले एक सर म्हणाले "काय सोहम, आज कोणाला गंडवणार?"

आता सोहमला समजू लागले होते. फक्त पायल आणि तिच्या कंपनीतले सरच नाहीत, तर आपल्या कंपनीतले सर सुद्धा यांना मिळालेले आहेत.

त्याच संध्याकाळी संकेत घरी आला. संकेत आता प्रोफेसर म्हणून एका मोठ्या इंजिनिअरींग कॉलेजमध्ये कामाला लागला होता.

संकेत - काय सोहम, कसे चालले आहे?

सोहम - ठीक.

सोहमची आई - अरे संकेत, तू काय करतोस सध्या?

संकेत - काकू, मी इंजिनिअरींग कॉलेजमध्ये प्रोफेसर आहे.

सोहमची आई - किती पगार मिळतो रे तिकडे?

संकेत - काकू २९००० रुपये. आणि पेपर तपासण्याचे वेगळे.

सोहम - संकेत, तिथे सुट्ट्या सुद्धा भरपूर मिळत असतील ना?

संकेत - अरे, सगळ्या सरकारी सुट्ट्या. सबमिशन नंतर सुट्ट्या. परीक्षेनंतर सुट्ट्या. चार महिने

सुट्ट्या असतात एकूण.

सोहम - अरे, मला पण एखादी नोकरी मिळते का ते पहा ना.

संकेत - ठीक आहे मी पाहतो. बरं, माझा साखरपुडा आहे १४ फेब्रुवारीला. नक्की ये. चल मी निघतो.

संकेत निघून गेला. पण, सोहमला आता शिक्षक बनावे वाटू लागले होते. कुठेतरी मस्तपैकी प्रोफेसरची नोकरी करावी. "भरपूर सुट्ट्या आणि भरपूर पगार मिळवावा" असे वाटू लागले.

"ही नोकरी सोडली की त्या मनकवड्या लोकांपासून सुटका होईल" असे वाटू लागले.

सोहम आता प्रत्येक इंजिनिअरींग कॉलेजमध्ये जाऊन अर्ज देऊ लागला.

असेच एकदा, एका कॉलेजमधून इंटरव्यूसाठी बोलावणे आले.

सोहम मस्तपैकी तयार होऊन इंटरव्यू द्यायला गेला.

तिथल्या सरांचे पहिलेच वाक्य होते - "शिक्षक उत्तम चारित्र्याचा हवा."

त्या दिवशी खरे सांगतो, मला सुद्धा सोहमबद्दल खूप कीव येऊ लागली. सोहमचे तर बोलणेच बंद झाले होते. डोळयातून पाणी तर येत नव्हते. पण, त्याचे शून्यात हरवलेले डोळे पहावत नव्हते.

सोहमला समजले "म्हणजे, ही साखळी फार मोठी आहे". कोणीतरी हात धुवून मागे लागले आहे". सोहम पूर्णपणे अडकला होता. ऑफिसमध्ये बोलती बंद झाली होती. असणारी नोकरी करू दिली जात नव्हती. नवीन नोकरी मिळू दिली जात नव्हती. कोणीतरी आता खरंच सोहमच्या करियरचे नुकसान करायला टपले होते. सोहमवर डाग लागला होता, कलंक लागला होता.

सोहम तिथून थेट निघाला आणि देहूरोडच्या तुकाराम मंदिराकडे प्रस्थान केले. मध्ये शनी महाराजांचे मंदिर दिसले. तिथेच डब्बा वगैरे खाऊन हा तुकाराम महाराजांकडे गेला. तुकाराम महाराजांचे आयुष्य वाचल्यावर वाटले "किती खडतर प्रवास होता महाराजांचा?" आपला तर काहीच नाही."

पण, इंजिनिअरिंगचा निकाल लागेपर्यंत सगळे ठीक होते. त्या दिवशी मानसीने, काळया टी-शर्टच्या आतून लाल ओढणी घालून, जणू काही प्रेमाची कबुलीच दिली होती. पण, जेव्हा पायावर पाल पडली होती, तेव्हा सोहमने देवाचे म्हणणे ऐकले नव्हते. त्यानंतर त्याने स्वत:च्या लांबच्या बहिणीकडे भावना व्यक्त केल्या.

तेव्हापासूनच सगळा गोंधळ सुरु झाला होता.

आजकाल मन्ना डे यांनी गायलेले "लागा चुनरी मी दाग, छुपाऊ कैसे?" हे गाणे सोहमला आवडू लागले.

त्यातले "जाके बाबुल से नजरे मिलाऊ कैसे?" हे वाक्य म्हणजे तर, सोहमच्या स्वत:च्या आयुष्यावर आधारित असल्यासारखे त्याला वाटू लागले. रोज बाथरूम मध्ये अंघोळ करताना सोहम हेच गाणे म्हणू लागला. जणू काही, देवालाच 'बाबुल' म्हणून सोहम म्हणत होता "देवा, आता तुझ्याकडे येऊन तुझ्याशी कसे काय नजर मिळवू?"

ही तर फक्त सुरुवात होती.

हे असले प्रकार आयुष्यात पहिल्यांदाच घडत होते. संध्याकाळी घरी येऊन टी.व्ही लावला, की त्याच्याच आयुष्याची सिरीयल कुठे ना कुठे सुरु असायची. (आज दिनांक ०७.१०.२०१४ रोजी सुद्धा, सोहमच्या आयुष्यावरची एक मालिका टी.व्ही वर लागते. या मालिकेतले मुख्य पात्रसुद्धा आजकाल एक कादंबरी लिहिते आहे, अगदी सोहम सारखीच).

सोहम गाडीवर जात असताना मधेच त्याला वाटायचे "आज आपण चतु:शृंगी रस्त्याने जाऊ." चतु:शृंगी रस्ता संपत आला की वाटायचे "अरे आपण या रस्त्याने का आलो?"

विचार करता करता पुन्हा आठवायचे "आपल्याला कोणीतरी झपाटले असावे किंवा संमोहित करत असावे".

सोहमला वाटू लागले होते "ही तर आपल्या कर्मांची फळे. देवाचे ऐकले असते, पायावर पाल पडली तेव्हा पायलला मेसेज नसता केला, तर बरे झाले असते." आपल्यामुळे भरपूर मने दुखावली गेली आहेत. बहुतेक आपण मेल्यावरच हे सगळे संपणार."

असेच एक दिवस, सोहम मानसीला शोधण्यासाठी पुण्यात गेला. तो साधारणपणे, म्हसोबा गेटच्या रस्त्यानेच पुण्यात जायचा. आणि त्याच रस्त्याने परत यायचा. पण आज, त्याला का कोण जाणे? दीप बंगला चौकातून घरी परत जावेसे वाटले. हा दीप बंगला चौकातून चाललाच होता. तेवढ्यात मानसीसारखी एक मुलगी दिसली. "काहीतरी गैरसमज होतोय" असे समजून सोहमने व्यवस्थित पाहिले. त्या मुलीच्या शेजारीच, मानसीच्या मैत्रिणीसारखीच दिसणारी एक मुलगी उभी होती.

अरे, ती तर मानसीच होती. तिची मैत्रीणसुद्धा होती सोबत. मानसीने आणि तिच्या मैत्रिणीनेसुद्धा सोहमला पाहिले. एव्हाना सोहम, गाडीवर जात असताना साधारणपणे अर्धा किलोमीटर पुढे पोचला होता.

शेवटचे काहीतरी बोलावे म्हणून सोहमने गाडी वळवली. त्या उभ्या होत्या तिथे जाऊ लागला. एव्हाना मानसी गायब झाली होती. तिची मैत्रीण तर, घाई घाईत कारमध्ये बसून निघून चालली होती. सोहमने थोडा वेळ पाठलाग केला. पण, अचानक आठवले, "आपण कोणत्याही मुलीचा पिच्छा करायचा नाही, हे आपले तत्व आहे".

सोहम परत निघाला. जिथे त्या दिसल्या तिथे परत आला. पण, आता ना मानसी तिथे होती, ना इतर कोणीही.

सोहम तर रोज म्हसोबा गेटच्या रस्त्याने परत जायचा. पण, आजच तो दीप बंगला चौकातून का गेला?

इथे कन्फर्म झाले होते, सोहमला कोणीतरी खरंच संमोहित करत होते.

सोहम घरी पोचला. तेवढ्यात, तीच लांबची बहिण पुन्हा घरी आली. अगदी आस्थेने सोहमची चौकशी करू लागली. ती एवढ्या आस्थेने विचारत आहे, हे पाहून सोहमला पुन्हा आपले दु:ख तिच्यासमोर व्यक्त करावेसे वाटले.

सोहम म्हणाला "अग, मी तुला गेल्यावेळेस मानसी बद्दल जे सांगितले, ते आमच्या ऑफिसमध्ये कसे काय कळले, काय माहिती? सगळे मला 'कॅरेक्टर' हा शब्द वापरून खूप त्रास देऊ लागले आहेत. मध्यंतरी, मी माझ्या एका जुन्या मैत्रिणीला प्रपोज केला होता.  मला माहिती नाही, तिला बॉय-फ्रेंड आहे की नाही?" कसे काय कळणार?"

का कोण जाणे, पण, सोहमची ती बहिण म्हणाली "विनाशकाले विपरीत बुद्धी". म्हणजे, लोक थेट सोहमचा विनाश करायलाच टपले होते.

आता सोहमला समजून आले होते, "बहुतेक आपला विनाशाचा काळ जवळ आला आहे. विनाकारण आपण मानसीच्या आयुष्यात प्रवेश करण्याचा प्रयत्न केला". का आपण, त्या ऑर्कुटवरच्या खोट्या प्रोफाईलची मैत्रीची मागणी स्वीकार केली? का आपण त्या खोट्या प्रोफाईलला शिव्या दिल्या?"

सोहमची बहिण, फोन आल्याचा बहाणा करून तिथून सटकली.

दुसऱ्याच दिवशी, ऑफिसला जाताना रस्त्यात पायल दिसली. कोणातरी मुलाबरोबर बोलत बोलत चालली होती. इथे अजून एक गोष्ट कन्फर्म झाली होती, पायलला सुद्धा बॉय-फ्रेंड असावा (कन्फर्म नाही).

पण, नेमके कालच सोहम त्याच्या बहिणीला विचारत होता, "पायलला बॉय-फ्रेंड आहे की नाही, हे कसे काय समजणार?" आणि आजच पायल एका मुलाबरोबर दिसली.

"हे नक्की काय चालले आहे?" हे सोहमला कळेनासे झाले होते. "मी माझ्या बहिणी सोबत जे बोलतो, ते इतरांना कसे काय कळत असेल बरे?" माझ्या बहिणीचा आणि पायलचा तर दूर दूर पर्यंत संबंध नाही. विचार करून करून डोके फुटायची वेळ आली होती.

आता "आपण कधीही मरू शकतो" असे सोहमला वाटू लागले होते.

एवढेच नाही, ऑफिसला पोचल्यावर सतीशचा फोन आला. सतीश म्हणजे तोच मुलगा, ज्याचे पायलशी असणारे प्रेम प्रकरण सोहमने जुळवून दिले होते.

सतीश म्हणाला - सोहम, १५ तारखेला लग्न आहे माझे. नक्की ये.

सोहम - हो नक्की येतो.

सतीश - तू म्हणे पायलला प्रपोज केलास?

सोहम - तुला कसे समजले?

सतीश - ते महत्वाचे नाही. मला राग नाही आला. पण, लग्नाला मात्र नक्की ये. चल, अजून भरपूर लोकांना फोन करायचा आहे.

"सतीशला कसे काय समजले? पायलनेच तर सतीशला सांगितले नसेल ना? सतीश आणि पायलचे तर लग्न नाही ना होणार आहे? आता आपण संपलोच. सतीश तर, डॉन होता कॉलेजमध्ये".

"१३ चा आकडा इथेही पिच्छा सोडत नव्हता. मानसीचा नंबर याला १३ तारखेलाच मिळाला होता. १३ नोव्हेंबर २००८.

१३ तारखेलाच तिला शेवटचे पाहिले होते. १३ तारखेलाच पायावर पाल पडली होती. १३ तारखेलाच, त्याच दिवशी, देवाचे म्हणणे न ऐकता पायलला प्रपोज केले होते. एक महिन्याने १३ तारखेलाच, पायलने सुद्धा आपले प्रेम धुडकावले होते. १३ तारखेलाच इंटरव्यूला गेलो. त्याच दिवशी ते सर म्हणाले होते "शिक्षक उत्तम चारित्र्याचा हवा"

**१६. १३च्या आकड्याने पिच्छा न सोडणे, राहू महादशा, शनी महाराजांची एन्ट्री, मुचकुंद राजाची गोष्ट, नाथद्वाराची माहिती, कालेश्वरमची माहिती (इथे एकाच मंदिरात दोन शिवलिंग आहेत), बद्रचलमची माहिती (श्री विष्णूच्या २४ अवतारांचे मंदिर. इथे देवाला रात्री पाळणा म्हणून झोपवले जाते. आणि त्या वेळेस, सामान्य भक्तांना तिथे उपस्थित राहता येते). ६ महिन्यात ५ वेळा, ख्वाजा गरीब नवाजांने अजमेरला आणि ब्रम्हदेवाने पुष्करला बोलावणे. पुष्करची माहिती, ब्रम्हदेवाद्वारे गायत्री मंत्राची निर्मिती, स्वामी समर्थांची एन्ट्री, सोहमची साडे-साती, "मुली धोका देत नाहीत." मुली थोड्या भावनिक असतात एवढेच."**

"एकतर कोणीतरी जीव घेऊन मागे पडले आहे. त्यातच, ही सगळी मंडळी एकमेकात मिळालेली आहेत. आपल्यावर कोणीतरी पाळत ठेवून आहे. आपण कुठे जातो? काय बोलतो? काय विचार करतो? हे सुद्धा सगळयांना कळते. नोकरी सोडून दुसरी शोधायची म्हणले तर, तिथेही कोण, कधी, "कॅरेक्टर" या शब्दाचा वापर करून आपल्याला दुखावेल? हे सांगता येत नाही. आणि त्यातही हा १३चा आकडा पिच्छा सोडत नव्हता.

आपल्यासोबत असे का घडत आहे? याचा अभ्यास सोहमने सुरु केला. कधीतरी इंटरनेटवर "भृगु" ऋषीनें लिहिलेले "भृगु संहिता" हे पुस्तक हाती पडले. प्रत्येक माणसाला, आपले भविष्य नेहमीच जाणून घ्यावेसे वाटते. सोहमला सुद्धा आपले भविष्य जाणून घ्यावेसे वाटू लागले. त्याला समजून आले "आपली राहू महादशा सुरु आहे." १९९३ ते २०११ या काळात सोहमची राहू महादशा चालू होती. राहूदेव पंचमात आणि वृषभेचे होते.

राहू महाराज आणि केतू महाराज, नक्की कोणत्या राशीत उच्चेचे आहेत? या वर वेगळी वेगळी मत आहेत. कोणी म्हणते राहू महाराज मिथुनेत आणि केतू महाराज धनु राशीत उच्चेचे असतात. कोणी म्हणते राहू महाराज वृषभेत, आणि केतू महाराज वृश्चिकेत उच्चेचे असतात.

माझ्या मतानुसार, राहू महाराज म्हणजे अनिवार माया आणि केतू महाराज म्हणजे मोक्षाकडे नेणारा देव. वृषभ राशीचे लोक सर्वात जास्त शृंगारिक, गोड बोलणारे असतात. साक्षात श्री कृष्ण वृषभ राशीचे होते. कृष्ण किती मायावी होता? हे आपण सर्वांना माहितीच आहे. तसेच, वृषभ राशीतले रोहिणी नक्षत्र, हे चंद्रदेवांचे आवडते नक्षत्र. चंद्रदेव म्हणजे मनाचे कारक. अर्थातच, वृषभेतल्या रोहिणी या नक्षत्रात, कृष्णाच्या कुंडलीतले चंद्रदेव अतिशय उच्चेचे होते. म्हणूनच, श्री कृष्ण अतिशय सुदृढ अश्या मनाचे होते.

आता या ठिकाणी जर राहुदेव आले, तर कोणाच्याही मनाला ही अनिवार माया सहन होणे फार अवघड होऊन बसते. तेव्हा अर्थातच, राहू महाराजांची ही माया, चंद्रदेवाला म्हणजेच आपल्या मनाला सहन होणारच नसते.

दुसरे उदाहरण म्हणजे, मंगळदेव हे ज्याप्रमाणे मकर या राशीत उच्चेचे असतात कारण,

१. मकर ही रास शनी महाराजांच्या अमलाखाली येते.

२. शनी महाराज, मकर राशीच्या व्यक्तींना कठोर वास्तवाची जाणीव करून देत असतात.

३. भौतिक सुखाबद्दल या व्यक्ती चटकन उदासीन होऊ लागतात. यामुळे, सहसा मकर राशीच्या व्यक्तींचा जीवनातला रस आणि एनर्जी कमी झालेली असते.

४. याच ठिकाणी जेव्हा मंगळदेव येतात, तेव्हा त्यांना आपली शक्ती वापरण्याची पुरेपूर संधी मिळते. यामुळेच, मंगळदेव हे शनी महाराजांच्या मकर या राशीत उच्चेचे असतात.

अगदी त्याप्रमाणेच, राहुदेव जेव्हा वृषभ राशीत येतात. तेव्हा, त्यांना आपल्या मायेचा पुरेपूर उपयोग करता येतो. यामुळेच राहुदेव हे वृषभ राशीत उच्चेचे होत असावेत.

तसेच, केतू महाराजांचा स्वभाव हा रागीट असला तरीही, ते आपल्याला मोक्षाकडे न्यायचे काम करतात. आपल्याला मोक्षाकडे नेण्याचे काम अर्थातच गुरूंचे असते. पण, गुरुदेव स्वत:, त्यांच्या धनू किंवा मीन राशीत उच्चेचे होत नाहीत. ते चंद्रदेवांच्या कर्क या राशीत उच्चेचे असतात.

शनी महाराज सुद्धा गुरूच आहेत. शनी महाराजांच्या अंमलाखाली येणारी कुंभ ही रास म्हणजे, ज्ञानाची किंवा ज्ञानी लोकांची रास म्हणून ओळखली जाते. मोक्ष मिळण्यासाठी माणसाला ज्ञानाची आवशक्यता असते. यामुळेच, केतुदेव हे शनी महाराजांच्या कुंभ या राशीत उच्चेचे होत असावेत.

जरुरी नाही की, जर राहुदेव वृषभ राशीत किंवा मिथुन राशीत उच्चेचे असतील. तर, केतुदेव वृश्चिक किंवा धनू राशीत उच्चेचे असावेत.

(अशीच, अजून काही उदाहरणे आहेत.

१. शनी महाराज हे सर्वोत्तम न्यायाधीश आहेत. म्हणूनच, ते तूळ राशीत उच्चेचे असतात. मग ते तूळ राशीचे स्वामी का नाहीत? तूळ रास म्हणजे समन्वय. शनी महाराज म्हणजे न्यायाधीश. मग, तूळ ही रास शनी महाराजांची स्वत:ची रास का नाही? ती शुक्रदेवांना का दिली गेली असावी?

२. मीन रास म्हणजे सर्वात चंचल रास. माणसातला शुक्र हा सुद्धा चंचलच असतो. शुक्र महाराज म्हणे मीन राशीतच उच्चेचे असतात. गुरु आपल्याला, देवावर दृढनिष्ठा कशी ठेवायची याचे ज्ञान देतात. मग, मीन ही चंचल रास गुरूंची कशी काय असू शकते? मीन ही रास शुक्र महाराजांची असली पाहिजे, नाही का? आणि असेही, गुरु आणि शुक्र हे परस्परांचे शत्रू म्हणवले जातात. मग जर, गुरु हे शुक्र महाराजांचे शत्रू असतील, तर त्यांच्याच राशीत शुक्रदेव कशे काय उच्चेचे असतात?

३. थांबा, तुमच्या मनातला पुढचा प्रश्न मला समजलाय. मंगळदेव आणि शनी महाराजांची गोष्टही समजून घेऊ.

मेष ही रास मंगळ देवांच्या अंमलाखाली येते. मेष राशीपासून दहावी रास म्हणजे मकर. आणि

अकरावी रास म्हणजे कुंभ. या दोन्हीही राशी शनी महाराजांच्या अंमलाखाली येतात. म्हणजेच, मेष लग्न असणाऱ्या लोकांचे कर्माधीपती अर्थातच शनी महाराज असतात. तसेच, मेष लग्नाच्या लोकांसाठी, शनी महाराज हे एकादश स्थानीचे स्वामी असतात. एकादश स्थान म्हणजे, तुमच्या आयुष्यात पैसा किती असेल? हे सांगणारे स्थान. म्हणजेच, मेष लग्नाच्या लोकांसाठी, शनी महाराज म्हणजे कर्माधीपती + एकादश स्थानीचे स्वामी. अर्थातच, शुभ फलदायक.

असेच काही वृश्चिक लग्नाच्या लोकांसाठी आहे. वृश्चिक लग्नाच्या लोकांसाठी, शनी महाराज हे तृतीय, म्हणजे पराक्रम/बंधू स्थानाचे स्वामी. तसेच, चतुर्थ स्थानीचे स्वामी. पुन्हा, शनी महाराज हे वृश्चिक लग्नाच्या लोकांसाठी शुभ फलदायक असतात.

आता, थोडे मकर लग्नाच्या लोकांचे पाहू.

मकर लग्नापासून, मंगळ महाराजांची मेष ही रास चौथी असते. आणि वृश्चिक ही रास अकरावी असते. म्हणजेच, मंगळदेव हे मकर लग्नाच्या लोकांसाठी केंद्राधीपती अधिक एकादश स्थानीचे मालक.

असेच काही कुंभ लग्नाच्या लोकांचे. कुंभ लग्नाच्या लोकांसाठी, मंगळ महाराज हे तृतीय म्हणजे पराक्रम भावाचे स्वामी. आणि दशम भावाचे, म्हणजे कर्मस्थानीचे स्वामी.

याचाच अर्थ असा की, मेष आणि वृश्चिक, या मंगळदेवांच्या राशींसाठी शनी महाराज हे शुभ फलदायक असतात.

मकर आणि कुंभ, या शनी महाराजांच्या राशींसाठी मंगळ महाराज हे शुभ फलदायक असतात.

मग ज्योतिष शास्त्राप्रमाणे, मंगळ महाराज आणि शनी महाराज एकमेकांचे शत्रू कसे काय? तसे नाही, हे दोघेही एकमेकांचे पूरक ग्रह आहेत. त्यांच्यात वैचारिक मतभेद असतील. पण ते एकमेकांचे शत्रू नाहीत, हे मात्र नक्की.

तर, ज्योतिषी मित्रांनो, मी येत आहे माझे नवीन पुस्तक घेऊन. जरा सगळे मिळून या नव्या पैलूंबद्दलसुद्धा विचार करू की).

तर, सोहमला समजून आले होते. "आपली राहू महादशा चालू आहे". पंचमेत राहू असणे म्हणजे, संततीप्राप्तीसाठी अवघड स्थिती. त्यातच, राहू महाराज उच्चेचे, रोहिणी नक्षत्रात विराजमान.

१९९३ सालीच सोहमची राहू महादशा सुरु झाली होती. तेव्हा सोहम ५ वीत शिकत होता. तेव्हाच सोहमने पहिल्यांदाच, इयत्ता पाचवीत शाळेला दांडी मारायला सुरुवात केली. सोहम, १९९३ पासून आत्तापर्यंत 'कधी पास कधी नापास' असाच पुढे सरकत होता. कधी मुली पटवायच्या नव्या नव्या युक्त्या शोधत होता. तर कधी कधी, मुलींना कोणी छेडले, की त्या मुलांशी भांडत होता. कधी चांगले वागत होता आणि कधी वाईट वागत होता.

राहू महाराज उच्चेचे असल्यामुळे त्याला इंजिनिअरिंगला प्रवेश मिळाला. पण, हेच राहू महाराज पंचमेत असल्यामुळे त्याला मध्यम फळे मिळत होती. आणि आता तर पहिल्यांदाच "आपली राहू महादशा चालू आहे" हे समजले होते.

राहुदेवांविषयी आत्तापर्यंत काहीच माहिती नव्हती. जेव्हा माहिती झाली, तेव्हा सोहमचे हातपायच गळून गेले. आधीच राहू महादशा, त्याच्यातच मनात संशय, आपल्याला कोणी भुताने झपाटलंय की काय? हे समजायचा सुद्धा काहीच मार्ग दिसत नव्हता. आधीच सोहम अतिशय हळव्या मनाचा. त्यातच हे भयानक प्रकार आयुष्यात सुरु होते. बुद्धीने काम करणेच बंद केले होते. देवाची ही माया, सोहमला सहनच होत नव्हती.

"अरे बाप रे, आता काही खरे नाही दिसत." हे तर काहीच नव्हते. अजून मोठ्या मोठ्या गोष्टी तर अजून समजायच्या होत्या.

दुसऱ्या दिवशी, ऑफिस मधले सर सोहमला म्हणाले "सोहम तुला मंडलेश्वरला जायला जमेल का? मंडलेश्वर मध्यप्रदेश मध्ये आहे. सोपे आहे, पुण्यावरून इंदोरला जाणारी बस पकडायची आणि मंडलेश्वरला उतरायचे."

सोहम कधीच पुणे सोडून एकटा बाहेर गेला नव्हता. सोहम घाबरला.

सोहम म्हणाला "सर विचार करून सांगतो".

सर म्हणाले "विचार करायचा असेल तर दुसरी नोकरी शोधा".

"नोकरी तर मिळणार नाही. फुकटचा टाईम पास होईल. त्यापेक्षा आपण मंडलेश्वरला जाऊ."

ईन-मीन दोन-तीन महिनेच झाले होते नोकरीला लागून. अजून काही येत सुद्धा नव्हते. मंडलेश्वरला जाऊन काय करायचे? तेही माहिती नव्हते. खूप भीती वाटत होती. पण काय करणार? पोटासाठी सगळे करावे लागते.

तर असा, सोहम मंडलेश्वरला निघाला. रात्रीची इंदोरची बस पकडली. पहाटे ४ वाजताच मंडलेश्वरला उतरला. ज्या साईटवर जायचे होते, ती तिथून १५ किलोमीटर होती. पहिली बस ६ वाजता होती. दोन तास भीत-भीतच बस स्थानकावरच बसून राहिला.

पहाटे रस्त्यावर मिळणारा चहा त्याने पहिल्यांदाच अनुभवला होता. सकाळी ६ वाजता बस आली.

बसमध्ये, अतिशय सुंदर मुलगी त्याच्याच बाजूला येऊन बसली. मनातून गडी खुष झाला होता, पण, उगाचच अंग चोरून बसायचे नाटक करू लागला. आश्चर्य म्हणजे, त्या मुलीने स्वत:हून सोहमशी बोलायला सुरुवात केली. अर्ध्या तासाच्या प्रवासात तिने सोहमचा मोबाईल नंबरसुद्धा घेतला. ज्योतिका नाव होते तिचे. कसे कुठून जाणे, सोहम मुलींच्या बाबतीत नशीबवान होता.

जाताना, रस्त्यात दोन्ही बाजूला निसर्गरम्य वातावरण, आजूबाजूची हिरवीगार शेती. थंडीचे दिवस असल्यामुळे, मनाला प्रसन्न करणारे थंड वातावरण. शेजारीच बसलेली सुंदर मुलगी. "सोहम का दिल बाग बाग हो गया था". तेवढ्यात तिची उतरायची वेळ झाली. सोहम पुन्हा एकटा पुढच्या प्रवासाला निघाला होता.

हॉटेलवर मस्त पैकी एक रूम घेतली. शेजारच्याच, घर वजा धाब्यावर, नाश्ता करण्यासाठी गेला. मस्त पैकी दही आणि आलू-पराठा मागवला. मध्यप्रदेश मधल्या लोकांची, शुद्ध हिंदी भाषा ऐकून मन अजूनच प्रसन्न झाले होते. पुढचे काही दिवस सोहम, स्वत:ची तोडकी मोडकी हिंदी शुद्ध समजून चालवणार होता.

साईटवर जाऊन, दोन दिवस मस्त पैकी काम उरकून सोहम पुण्याकडे परत निघाला. पण, मुख्य रस्त्यावर आल्यावर समजले "दुपारी ट्रॅव्हल्सच्या बसेस जात नाहीत". त्यासाठी संध्याकाळपर्यंत थांबावे लागणार होते. सोहमने ठरवले "आपण मध्यप्रदेशच्या एस.टी ने महाराष्ट्र बॉर्डर पर्यंत येऊ. तिथे काहीना काही मिळेलच पुण्याला जायला आणि वेळ वाचेल".

त्याला धुळयापर्यंत एस.टी मिळाली. इंदोरकडे येताना, रात्री कधीतरी रस्त्यात शिर्डी दिसले होते. सोहमला वाटू लागले. धुळयावरून शिर्डीला जाऊ, तिथून शनी-शिंगणापूरला जाऊ. पुढे नगर रस्त्यावरून पुण्याची गाडी पकडू.

मंडलेश्वर ते धुळे, हा ४ तासाचा प्रवास होता. बसायला जागा २ तासांने मिळाली. धुळयावरून, रात्री ९ वाजता सोहम शिर्डीला पोचला. रात्री शिर्डीलाच झोप घेतली. अगदी कधी नव्हे ते, सोहमने पहाटेच उठून साई-बाबांचे दर्शन घेतले. तिथून शनी-शिंगणापूरला जाऊन, विधीपूर्वक शनी महाराजांचे दर्शन घेतले. नंतर सोहम पुण्याला आला.

इथेच, साईबाबांची आणि शनी महाराजांची दृष्टी सोहमवर पडली असणार. सोहमच्या आयुष्यात शनी महाराजांची एन्ट्री झाली होती. तसे, शनी महाराजांची एन्ट्री सोहमच्या आयुष्यात फार पूर्वीच झाली

होती. पण सोहमला हे कळायला भरपूर अवकाश आहे.

ते जाउदे, इंजिनिअर झाल्यापासून देवावर थोडासा विश्वास बसला होता सोहमचा.

दरम्यान, सोहम पुण्यात असताना, एकदा शायना सोहमला म्हणाली - "माझी ती मैत्रीण आहे ना "पूजा", तिला तू आवडतोस". आपण लोणावळ्याला सहलीला गेलो होतो. तेव्हा तिने तुला पाहिले होते. ती म्हणत होती "तुझे हसणे सगळीकडे आनंद पसरवते".

तू भेटणार का तिला?

पण, सोहम आता एक-पत्नीव्रत (एक - नसलेली पत्नी व्रत) झाला होता. ती म्हणजे मानसी. त्यामुळे तो नाही म्हणाला.

ऑफिसला आल्यावर "कॅरेक्टर" प्रकरण अजूनच वाढू लागले होते. कधी कधी वाटायचे "नोकरी गेली तरी चालेल पण, एकाला तरी ऑफिसमधेच मारायचेच". साल्यांनो, लपून कशाला लडता. समोर येऊन भांडून दाखवा." एक तर हारेल तरी नाही तरी हारवेल तरी." पाळत ठेवता, मनावर सुद्धा पाळत ठेवता. मला टॉर्चर करून तुम्हाला काय मिळणार आहे? मी तर अजून नवीनच आहे ऑफिसमध्ये. कोणाशी भांडलोही नाही. दुसऱ्यावर पाळत ठेवणे म्हणजे, स्वत:चे मन कमजोर असण्याचे लक्षण आहे. मन ही हारा, तो क्या जीता?

सोहम नोकरीसुद्धा सोडायला तयार होता. पण, इतरही ठिकाणचे लोक "कॅरेक्टर" हा शब्द वापरून त्याला खिंडीत पकडू लागले होते.

पुन्हा पळून जावेसे वाटू लागले होते.

ही तर फक्त सुरुवात होती. यापेक्षाही मोठी मोठी कोडी पडणार होती सोहमला.

ऑफिस सुटल्यावर, खडकीला जाऊन मासे टाकणे सुरूच होते. कधी कधी सोहम तिथेच व्हॉलीबॉल खेळत बसायचा. सगळे लहानपणीचे मित्र असायचे सोबत.

असेच एकदा, सोहम कॉलनीमधल्या काही मित्रांशी बोलत असताना कविता दिसली (सोहमची पहिली गर्ल-फ्रेंड). ती सुद्धा आता नोकरीला लागली होती. मनात विचार आला "आपण आता नवीन आयुष्य सुरु करणार आहोत. कधी ना कधी आपले हिच्याबरोबर काहीतरी नाते होते. भलेही ते तुटले असेल. पण

आपण, आपल्या चुकीसाठी माफी मागायलाच हवी. तर, आपले लग्न व्हायच्या अगोदर आपण हिची माफी मागायला हवी."

सोहमने मनातला विचार मित्रांना सांगितला. तिचा विषय काढताच काही मित्रांचे हात मोबाईलकडे गेले. हे सोहमच्या नजरेत आले होते. काही मुलांने आपापले मोबाईल काढले. दोन-तीन बटणे दाबून खिशात ठेऊन टाकले. मोबाईल खिशात ठेऊन, सगळे सोहमच्या बोलण्याकडे लक्ष देऊ लागले.

सोहम म्हणाला "यार जाऊन बोलतो तिच्याशी. ती कामाला चालली आहे. रस्त्यातच गाठतो आणि बोलतो तिच्याशी."

सगळे म्हणाले "जा पटकन, दोन मिनिटात ती एकदम गायब होते कुठे तरी ".

सोहम निघाला, तिला रस्त्यातच गाठले.

सोहम - कविता, थांब ना मला बोलायचंय.

कविता - (वळून पाहिले पण थांबली नाही.)

सोहम - कविता थांब ना. मला खरंच बोलायचं.

कविता - मला काहीही बोलायचे नाही.

सोहम - एकदा, शेवटचे ऐकून घे.

कविता - तू जा, मला त्रास देऊ नकोस.

खडकी स्टेशन पर्यंत सोहम विनवणी करत राहिला. पण, ती काही थांबली नाही. शेवटी खडकी स्टेशनलाच गाडी लावून, सोहम तिच्या मागे चालत निघाला. तिच्या चालण्याचा वेग इतका होता, की सोहम तिच्यासोबत चालण्यासाठी जवळ जवळ पळत होता.

कसे बसे "दोन मिनिट बोलायचंय" असे म्हणून तिला थांबवले.

सोहम - मला माफ कर. (याला मला माफ कर म्हणण्याची इतकी सवय झाली होती, की माफीला सुद्धा आता कंटाळा आला असेल.)

ती - तुला मी कधीच माफ केले होते.

सोहम - मला वाटले की मी चुकीची माफी मागावी. म्हणून आलो.

ती - माफ केले. आता मी जाऊ?

सोहम - तुला पुन्हा एकदा माझ्याशी मैत्री करायला आवडेल? (मनातच - मला तुझी स्वप्न पूर्ण करायची होती )

ती- नको रे बाबा, तुझ्यासोबत मैत्री परवडत नाही.

सोहम - मी तुला पुन्हा प्रेमात पड असे नाही म्हणालो. मी म्हणालो, माझ्यासोबत मैत्री करायला आवडेल का?

ती- नाही.

सोहम - ठीक आहे. गुड बाय.

माफी मागितल्यावर सोहमच्या मनावरचे ओझे हलके झाले होते.

रात्री सोहम घरी पोचला. आई म्हणाली "अरे सोहम, तुझी ती बसमधली मैत्रीण होती ना नीता? (सोहमची दुसरी गर्ल-फ्रेंड), तिचा फोन आला होता."

"बघ तिला फोन करून. भरपूर दिवसांने फोन आला तिचा."

सोहमला अजूनच टेन्शन आले. सोहमने थेट तिला फोन लावला.

नीता - हेलो.

सोहम - सोहम बोल रहा हू.

नीता- अरे सोहम, कहो कैसे हो?

सोहम - देखो यार नीता, मै पहले से ही बहोत टेन्शन मे हू. तुम मेरी चिंता और मत बढाओ. आज के बाद प्लीज मुझे फोन मत करना.

नीता - पर, क्या हुआ?

सोहम - देखो, मै अभी कुछ नाही बता सकता. लेकीन प्लीज आगे से फोन मत करना.

नीता - सुनो तो............

तोपर्यंत सोहमने फोन कट सुद्धा केला होता.

पुढचे दोन दिवस टेन्शन अजूनच वाढले होते. ऑफिसमध्ये जावेसेच वाटत नव्हते.

दोन दिवसांने सोहम संकेतच्या घरी गेला. तिथेच हंसिकाचा फोन आला. (ती गर्ल फ्रेंड, जिने बालिश समजून, सोहमशी असणारे नाते तोडून टाकले होते.)

हंसिका - हेलो,

सोहम - कोण आहे?

हंसिका - मी हंसिका बोलतेय, हा माझा नवीन नंबर आहे.

सोहम - बोल हंसिका, कसे काय आमची आठवण?

हंसिका - तू अजून मोठा झालास की नाही? हे पाहण्यासाठी फोन केला.

सोहम - झालोय की, उंची आता ५.१० इंच आहे. वजन असेल ६०-६२ किलो. (आता तिचा प्रश्न न कळल्यामुळे, सोहमने भोळेपणाने हे उत्तर दिले. की, सोहमला झपाटलेल्या भुताने हे उत्तर दिले. हे समजणे सोहमलासुद्धा अवघड झाले होते).

हंसिका - म्हणजे, तू अजूनही तसाच बालिश आहेस.

फोन कट झाला होता (अर्थातच, हंसिकाने कट केला होता). सोहम आता कधी कधी असंबद्ध गोष्टी बोलू लागला होता आणि हे त्यालासुद्धा कळू लागले होते.

दुसऱ्याच दिवशी, बंगालच्या गर्ल-फ्रेंडचा सुद्धा फोन आला. "सोहम, मै तुम से बहोत प्यार करने लगी थी, तुमने ऐसे क्यो किया?" वगैरे वगैरे प्रश्न विचारून त्याला भंडावून सोडले तिने.

म्हणजे गेल्या ४ दिवसातच, त्याच्या ४ जुन्या गर्ल फ्रेंडस आयुष्यात परत आल्या होत्या.

जणू काही कोणीतरी, सोहमचे चारित्र्य कसे आहे? हेच दाखवून देत होते. पर, पिक्चर अभी बाकी है मेरे दोस्त.

विनोद, अभिजित, सायली, शायना, विवेक, असा ग्रुप त्या दिवशी पुन्हा एकत्र आला होता. विनोद म्हणाला, "यार सोहम, मानले तुला. काय इमोशनली वेड्यात काढतोस तू मुलींना." बहुतेक सोहमला अर्थ कळला नसावा (सोहम मनातच म्हणाला - आयला, इथे स्वत:ची वाट लागली आहे. आणि मी काय कोणाला इमोशनली वेड्यात काढणार?)

काही वेळाने, विनोद गेल्यावर सायली म्हणाली "सोहम, तू मुलींच्या भावनांशी खेळतोस".

विवेक तर सोहमकडे मुली पटवण्याच्या युक्त्या मागू लागला.

सोहमला वाटू लागले "आता मित्रांचा सुद्धा विश्वास संपलेला दिसतो आपल्यावरचा."

तेवढ्यात हरीश आला. हरीशने डिप्लोमानंतरच नोकरी मिळवली होती. आज तो चांगल्या पगारावर आणि हुद्द्यावर, मोठ्या कंपनीमध्ये काम करत होता.

हरीश लग्नाची पत्रिका घेऊन आला होता. पत्रिका वाचून झाल्यावर सोहम म्हणाला "यार हऱ्या, मी पण लग्न करूनच टाकतो."

हरीश म्हणाला - "एवढ्यात कंटाळलास होय? अजून खुप काही बाकी आहे."

सगळे टोचून बोलू लागले होते सोहमला.

फक्त शायना अजूनपर्यंत काहीच बोलली नव्हती. बहुतेक, ती स्वत:च्या तुटलेल्या प्रेम कहाणीमध्ये दंग असेल तेव्हा.

शायना रोज सोहमच्या घरी यायची. तिथून त्याला घेऊन, सगळ्या मित्रांनी ठरवलेल्या ठिकाणी जायची.

कित्येक दिवस, तीच एक सहारा होती सोहमसाठी.

इकडे घरी, सोहमची आज्जी गावावरून आली होती. सोबत सोहमची अजून एक लांबची बहीण, मीनू सुद्धा होती.

इथेही, सोहमच्या नवीन घरी एक नवीन मांजराचे पिल्लू आले होते. मिनूने त्या पिल्लाचे नाव 'शायनाच' ठेवले होते. खरेतर, सोहमच्या आणि शायनाच्या मैत्रीबद्दल मिनूने माहिती गोळा केली होती. मीनू सोहमला टोचून टोचून शायनाच्या नावाने चिडवत होती.

आता अजून एक शत्रू सापडला होता. ती म्हणजे मिनू. पण सोहम विचार करायचा -"मी मिनुचे काय घोडे मारले आहे? उलट, तिला नोकरी शोधायला आईने मदत केली. इथे घरी ठेऊन घेऊन रहायची सोय केली. आणि मिनू, मला तर मला, पण आईला सुद्धा टोचून बोलते? एवढी वर्ष तर ती गावाकडेच होती. म्हणजे, चुकूनही आम्ही तिचे काहीच वाईट केलेले नाही, ज्याचा ही बदला घेत आहे". मिनूने एका दैनंदिन मालिकेमधल्या, नकारात्मक पात्र असणाऱ्या बाईचे नाव सोहमच्या आईला दिले होते. हे सोहमला नंतर कधीतरी समजले.)

दुसरीकडे, पुण्यात राहणारी बहिणसुद्धा सोहमला नीताच्या नावाने चिडवत होती. म्हणजे अजून एक शत्रू सापडला होता.

बाहेर तर शत्रू होतेच. पण घरातलेच मुख्य शत्रू होते. कोळी जाळे विणतो. त्याच्यात शिकार अडकली, की अलगद त्याला पकडतो. असेच काही सोहमचे झाले होते. किती कोळयांने जाळे विणले होते? माहिती नाही. पण, सोहम पुरता अडकत चालला होता.

सोहमचे लग्नाचे वय झाले होते. सोहमला दाखवायचा कार्यक्रम दर आठवड्याला होत होता. सोहमच्या लांबच्या मामीसुद्धा घराजवळच रहात होत्या, अगदी १ किलोमीटर अंतरावर. पण, सोहमला पाहायला कोणतेही स्थळ आले रे आले, की याची माहिती त्यांना कशी काय मिळत होती? देवच जाणे. आणि, त्या धावतपळतच सोहमच्या घरी यायच्या. इतक्या घाईघाईत त्या घरी यायच्या, की त्यांचा श्वाससुद्धा फुललेला असायचा.

सोहमचा पगार कमी होता. त्याला लग्नाला नकार मिळू लागले होते. कोणीही सोहमला नकार दिला, की त्याच्या सगळया लांबच्या बहिणी आणि लांबच्या मामी खूष व्हायच्या..

दरम्यान, ऑफिसमधल्या सरांने सोहमला जैसलमेरला पाठवायचे ठरवले.

पहिल्यांदाच एवढ्या लांब जायचे होते. जैसलमेर म्हणजे, पाकिस्तानच्या बॉर्डर जवळ असणारे राजस्थान मधील शहर. "जवळ पाकिस्तान आहे, सगळीकडे मिलिटरी असते. "युद्ध सुरु झाले तर?. कोणी बॉम्ब टाकला तर?" अशा विचारांने सोहम खूप घाबरला. पण जायला तर लागणारच होते.

सोहमला रेल्वेचे तिकीट वगैरे काढणे माहितीच नव्हते. बाबा बसनेच निघाला. दुपारी १.३० वाजता बस निघाली. ती दुसऱ्या दिवशी सकाळी ९.३० वाजता उदयपुरला पोचणार होती. त्या २ बाय ६ च्या जागेत, ए.सी मध्ये झोपच लागत नव्हती. शी आणि शू ला जाण्याची सुद्धा पंचाईत होती. रात्री झोपच येत नव्हती. सकाळी कधी तरी ४-५ वाजता डोळा लागला. जाग आली ते थेट १० वाजता.

उठून पहातो तर, बस पार्किंगमध्ये उभी होती. सोहम एकटाच होता गाडीत. खाली येऊन विचारले. लोक म्हणाले "उदयपुर तो यहासे ५० कोस दूर है."

म्हणजे सोहम पुढे उतरला होता. जागेचे नाव होते नाथद्वारा. सोहमने विचार केला, "नाश्ता करू आणि पुढे काय करायचे ते पाहू." हॉटेलमध्ये गेल्यावर, मस्त पैकी आलू पराठा आणि दही मागवून सोहम खातच होता. तेवढ्यात, कुठून बुद्धी झाली आणि हॉटेलवाल्याला याने विचारले.

सोहम - यहासे जैसलमेर कैसे जाऊ?

हॉटेलवाला - देखो भाईसाब, उदयपुर से गाडी २ बजे निकलेगी और ३ बजे यहा पहुचेगी. और आगे जैसलमेर जाएगी..

सोहम - अब तो केवल ११ बज रहे है. ४ घंटे क्या करू?

हॉटेलवाला - जाईये, नाथद्वारा के दर्शन किजीये.

सोहम - नाथद्वारा कोई भगवान है?

हॉटेलवाला - आपके महाराष्ट्र मे जैसे पंढरपूर हे. वैसे ही, यहा पे नाथद्वारा (म्हणजे, सोहमला देवानेच मुद्दामहून झोपवले होते. आणि उठवले तेव्हा तो नाथद्वारा मध्ये होता).

सोहम - मंदिर  कितनी दूर है??

हॉटेलवाला - बस एक कोंस, पाच मीनट मे पोहोच जाओगे चलते चलते.

सोहम आता नाथाद्वाराचे म्हणजेच, कृष्णाचे दर्शन घ्यायला निघाला होता.

तर, तिथले काही लोक नेहमी ही गोष्ट सांगतात - कृष्णाच्या गोष्टीमध्ये एकदा, जरासंध म्हणून त्याचा शत्रू कृष्णाला मारायला आलेला असतो. त्याच्याबरोबर काल-यवन नावाचा अजून एक राजा असतो. काल-यवनला वरदान असते की "तू ज्याच्या डोक्यावर हात ठेवशील, तो भस्म होईल."

तसे पाहता, कृष्ण त्याला सहज मारू शकला असता. पण, देवाने काल-यवनला दिलेल्या वरदानाचा त्याला अपमान करायचा नसतो. कृष्ण म्हणतो "आपण दोघे युद्ध करू. पण आधी तू मला पकडून दाखव." असे म्हणून कृष्ण पळत सुटतो.

पळत पळत कृष्ण एका गुहेत शिरतो. तिथे, फार वर्षांपासून एक राजा झोपलेला असतो. त्या राजाचे नाव असते "मुचकुंद". देव आणि दानवांच्या युद्धात, मुचकुंद राजा देवांच्या बाजूने लढतो. खूप वर्षांने युद्ध जिंकल्यावर, इंद्र-देव राजाला म्हणतो "सांग तुला काय हवे आहे?" राजा म्हणतो "मी फार थकलो आहे. मला आता झोपायला जागा दे." इंद्रदेव, त्या राजाला वरदान देऊन म्हणतात "तू पृथ्वीवर जाऊन एका गुहेत झोप. जो कोणी तुला उठवेल आणि तुझी त्याचावर नजर पडेल, तो क्षणार्धात जळून भस्म होईल. तुझ्या झोपेत कोणीही व्यत्यय आणू शकणार नाही".

इकडे कृष्ण, धावत धावत काल-यवनाला त्याच गुहेत घेऊन येतो. स्वत:चा शेला, त्या झोपलेल्या राजाच्या अंगावर टाकून लपून बसतो. काल यवन, कृष्ण समजून त्या झोपलेल्या मुचकुंद राजाला लाथ मारून उठवतो. राजा जागा होताच त्याची नजर काल-यवनावर पडते. आणि तो जळून भस्म होतो. तर अश्या प्रकारे कृष्ण, महादेवाने दिलेल्या वरदानाचा अपमान न करता देखील स्वत:च्या शत्रूचा पराजय करतो.



रण-भूमी सोडून पळल्यामुळे कृष्णाला नाव पडले "रणछोडदास". तर नाथद्वाराचे हे मंदिर म्हणजे,

"रणछोडदास" मंदिर उर्फ "श्रीनाथजी" मंदिर म्हणून ओळखले जाते.

तर सोहम, याच "रणछोडदास" चे उर्फ "कृष्णाचे" दर्शन घेण्यासाठी चालला होता. कृष्णाचे दर्शन घेताना, का कोण जाणे? पण डोळ्यात पाणी दाटून आले होते. दर्शन घेऊन आल्यावर, जोधपुर आणि तिथून जैसलमेर. असा एकूण ३६ तासाचा प्रवास करून सोहम जैसलमेरला पोचला. दुसऱ्या दिवशी, पुन्हा १२ तास काम करून सोहम घरी निघाला.

येताना तिथलाच एक माणूस भेटला. तो म्हणाला "इथून आपल्याला जोधपूरला जायला रेल्वे मिळेल. जोधपुरवरून, सकाळीच तुला पुण्याला जायला रेल्वे मिळेल." दोघे जोधपुरला पोचले. सोहमने पुढची रेल्वे पकडली आणि जनरल डब्ब्यात शिरला. पण, डबा आधीच पूर्ण भरला होता. बसायला जागा काही मिळाली नाही. पुढचे १६ तास सोहम उभाच होता. १६ तासांने, दरवाज्याजवळ पायरयांवर जागा मिळाली.

सोहम, ३ दिवस आणी १६ तासांतच घरी परत सुद्धा आला होता. पण त्या काळात, फक्त ६ तासच व्यवस्थित झोपला होता. म्हणजेच, ८८ पैकी ८२ तास त्याने प्रवास केला होता. तसेच, आयुष्यात पहिल्यांदाच एवढी धावपळ केली होती. सोहम १६ तास उभाच राहिला होता. त्याच्या शरीरातले पाण्याचे आणि पांढऱ्या पेशींचे प्रमाण फार कमी झाले. सोहमचे म्हणजे असे झाले होते "आधीच दुष्काळ, त्यात तेरावा महिना."

हा बाबा आधीच इतका घाबरला होता. त्यातच, दवाखान्यात जाऊन बसला.

तसे त्याला हॉस्पिटलमध्ये दाखल होण्याची गरज नव्हती. पण, "सलाईन लावले की पुढे तब्येत चांगली सुधारते आणि माणूस जाड होतो. आपले वजन फक्त ६० किलो आहे. ते वाढेल" असे समजून तो हॉस्पिटल मध्ये दाखल झाला.

दुसऱ्या दिवशी त्याने विचार केला "शायना आजकाल आपण केलेला फोन उचलत नाही. आपण तिच्या मैत्रीची परीक्षा घेऊ".

सोहमने शायनाला मेसेज करून सांगितले "मी हॉस्पिटल मध्ये ॲडमीट आहे".

संध्याकाळी, त्याच्या बंगालच्या (इंटरनेट वरची गर्ल फ्रेंड) गर्ल फ्रेंडचा मेसेज आला "भगवान, कर्मो की सजा कभी ना कभी जरूर देता है".

आता सोहमचा संशय विश्वासामध्ये बदलला होता. एक तर त्याचा मोबाईल हॅक झाला होता. किंवा शायनासुद्धा शत्रूंना मिळालेली होती. आणि अर्थातच, बंगालची गर्ल फ्रेंड, जिच्याशी हा तिला विना पाहता लग्न करायला तयार होता. ती याला शत्रू मानत होती.

"आपण हॉस्पिटलमध्ये ॲडमीट आहोत, हे इतक्या दूर, बंगालमध्ये असणाऱ्या मुलीला कसे काय समजले?" हा विचार करून करून चक्कर यायला लागली होती.

या चार दिवसांत शायना भेटायलासुद्धा आली नव्हती. तिने अक्षय, संकेत, विशाल आणि इतरांनाही सांगितले नसावे. कोणीही मित्रसुद्धा भेटायला आला नाही. इतर वेळेस, अक्षयची आई हॉस्पिटल मध्ये असताना, शायनाची बहिण हॉस्पिटल मध्ये असताना, शायना स्वत: सोहमला हॉस्पिटलमध्ये घेऊन जात होती. आणि सोहमसुद्धा मित्रांसाठी जात होता.

आता सोहमला मित्र-मैत्रिणींवर सुद्धा विश्वास ठेवणे अवघड झाले होते.

सोहम घरी आल्यावर दोन दिवसांने शायना पुजाला घेऊन सोहमला भेटायला आली. पण, सोहमने काहीही जाणवू दिले नाही. सोहम म्हणाला "मी नाही येणार तुमच्या बरोबर" आणि पुढे तुम्हीही कधी येऊ नका माझ्याकडे."

सोहमने मैत्रीचे नाते तोडून टाकले होते. कोणीतरी म्हणालेच आहे "जेव्हा तुम्ही यशस्वी होता, तेव्हा तुम्हाला काहीही बोलायची गरज नसते. आणि जेव्हा तुम्ही अयशस्वी होता, तेव्हा तुम्ही उत्तर द्यायला न थांबलेलेच बरे."

अयशस्वी झाल्यामुळे, सोहमने आता कायमस्वरूपी एकटे राहणे स्वीकारले होते. एकट्या लोकांना साथ देणारा सोहम, आता स्वत: एकटा पडला होता.

चार दिवस सलाईन घेतल्यावर "आता आपल्यात फरक पडेल" असे सोहमला वाटले. पण ती आशा व्यर्थ होती.

ऑफिसमध्ये आल्यावर, सोहमच्या फायली गायब करणे, सोहम वापरत असलेले इंटरनेटचे उपकरण गायब करणे, टोचून बोलणे. सोहम बाथरूमला गेला, की बाहेरून दरवाज्याला कडी लावून घेणे. असे प्रकार वाढू लागले होते.

कोणाही मित्राचा फोन आला, की सोहमला आता बोलावेसे वाटत नव्हते. त्याने फोनच उचलणे बंद

करून टाकले होते. कधीतरी चुकून फोन उचलला गेलाच, तर सोहमला रडू कोसळू लागले होते. चार भिंतीत, एखाद्याला साखळदंडाने बांधल्यासारखी त्याची अवस्था झाली होती.

मित्रांची भाषा आता गोड राहिली नव्हती. एकदा सोहम आदित्यकडे गेला. त्याला म्हणाला "यार आदित्य, जीव द्यावासा वाटतोय रे." आदित्य म्हणाला "ते बघ समोर विहीर आहे, मार उडी."

कामावर जावेसे वाटत नव्हते. दुसरी नोकरी मिळत नव्हती. त्यातच, अनोळखी नंबर वरून धमकीचे मेसेज येऊ लागले होते. पालटून फोन करण्याची हिंमत आता राहिली नव्हती. कोणी मदत करेल असे वाटत नव्हते. घरीही टेन्शन वाढले होते. घरच्यांना सुद्धा नीट काही सांगता येत नव्हते. मनातल्या मनात घुसमट होत होती. कंपनीच्या कामासाठी बाहेर जावे लागले, तर बाहेरही मन रमत नव्हते. अनोळखी भीती मनात साठून रहात होती. याची गोष्ट ऐकून ऐकून, सगळे मित्र सुद्धा वैतागले होते.

कोणाला सांगितले "माझा मोबाईल, ई-मेल आय.डी. हॅक झाला आहे" तर कोणी विश्वास ठेवत नव्हते. याच्या पर्सनल ई-मेल वाचून ऑफिस मध्ये त्रास दिला जात होता. काही दिवसांने सोहमने मोबाईल नंबरसुद्धा बदलून टाकला. पण, कधी विकेट पडेल? सांगता येत नव्हते. "आपण खूप वाईट आहोत" असे वाटू लागले होते". कधी वाटायचे, "पुन्हा पळून जाऊ. आता तर कमवायची अक्कल आली आहे. घरच्यांपासून लांब राहून घरी पैसे पाठवू. पण इथे नको राहायला."

अजून चार महिने कसे तरी गेले. "थोडासा त्रास कमी होतोय" असे वाटू लागले होते. पण, जराजरी कुठेही अपमान झाला की वाटायचे "आपण कधीही मरून जाऊत".

असेच एकदा सोहम सकाळी ऑफिसला निघाला. रस्त्यातच, दापोडीपाशी गाडी पंक्चर झाली. याला घाबरायला कारणच हवे होते. याने ऑफिसमध्ये कळवले "सर आज काही येऊ शकत नाही. गाडी पंक्चर झाली आहे. मूडच गेला आहे ऑफिसला येण्याचा." सरांने समजून घेतले असावे.

पंक्चर काढून सोहम घरी आला. त्या दिवशी रविवार होता. शेजारीच कुत्रे रडू लागले होते. अजूनच भीती वाटू लागली. "भित्यापाठी ब्रम्हराक्षस, अशी गत झाली होती." सोहमला वाटू लागले "आज आपण नक्की मरणार आहोत". पण मरणारच असुत, तर घरात नको मरायला. आपण केतकावळेच्या बालाजीला जाऊ. नशिबात असेल तर दर्शन होईल. नाहीतर, कदाचित कात्रजच्या घाटातच मरून जाऊ."

कोणाला तरी सोबत घ्यावे म्हणून सोहमने रोहितला फोन लावला. पण, रोहित बिझी असल्यामुळे येऊ शकला नाही. मग हरीशला फोन लावला. हरीश यायला तयार होता. पण, सोहमने पुन्हा विचार केला "याचे नवीनच लग्न झाले आहे". जर मी मरणार असेल, तर हरीशचा आणि त्याच्या बायकोचा जीव धोक्यात नको टाकायला." हरीशला कळवले, प्लॅन कॅन्सल झाला आहे. तू काही येऊ नकोस."

सोहम एकटाच केतकावळेच्या बालाजीला निघाला. आधी खेड-शिवापूरचा दर्गा, मग बनेश्वरचा महादेव, नंतर केत-कावळेचा बालाजी आणि शेवटी नारायणपूरचा श्री. दत्त. दर्शन घेऊन, हडपसर मार्गे सोहम घरीसुद्धा पोचला. "आपण मेलो कसे नाही?" असे वाटले.

केतकावळेच्या बालाजीला गेला तेव्हा तिरुपती आठवू लागले. म्हणाला "देवा तिरुपतीची खूप आठवण येतेय रे, मला बोलावून घे".

दुसऱ्याच दिवशी ऑफिसला गेल्यावर, ऑफिसमधले सर म्हणाले "सोहम तुला हैदराबादला जायचे आहे". हैदराबादवरून साईट जवळच आहे. सोहमने विचार केला, "ठीक आहे, जाता येईल. हैदराबाद आन्ध्र-प्रदेश मध्ये आहे. तिरुपती जवळच असेल. कदाचित तिथेही जाता येईल." माहिती काढली तर, हैदराबाद ते तिरुपती हा १२ तासांचा प्रवास होता.

"आधी पुण्यावरून हैदराबादला जायचे. तिथून साईटवर जायचे. परत हैदराबादला यायचे. तिथून तिरुपतीला जायचे. आणि मग पुण्याला परत यायचे. "असा भला मोठा प्रवास कोण करत बसणार? त्यापेक्षा तिरुपतीला जायलाच नको".

महत्वाचे म्हणजे, सोहमला घाबरवून टाकणारी अजून एक गोष्ट त्याला कळाली. ती म्हणजे "जिथे सोहम जाणार होता, तो नक्षलवादी भाग होता.".

पण जायला तर लागणारच होते. घाबरत घाबरत सोहम निघाला. हैदराबादला पोचल्यावर कळाले "जायचे ठिकाण इथूनही फार दूर आहे". आधी हनमकोंडाला जायचे आणि तिथून पुढे कालेश्वरमला. कालेश्वरमला साईट होती. त्या काळी आजच्या सारखे चांगले रस्ते नव्हते झाले. उशीर लागणार होता पोचायला. म्हणजे, तिरुपतीला जाणे रद्दच करावे लागणार होते."

रस्त्यात ठिकठीकाणी मिलिटरीच्या चौक्या होत्या. नक्षलवादी भाग असल्यामुळे, प्रत्येक गाडी तपासूनच पुढे सोडली जात होती. सोहम अजूनच घाबरला. भीत भीत सोहम कालेश्वरमला पोचला. तिथे

फोनची रेंजसुद्धा येत नव्हती. निव्वळ खेडे गाव होते ते. ईन-मीन २०० लोक रहात असतील. कुठे पाण्याची सुद्धा सोय नव्हती. जो माणूस घ्यायला येणार होता, त्याचा तर काही पत्ताच नव्हता. कसे तरी, एस.टी.डी वरून त्याला फोन लावल्यावर तो गाडी घेऊन आला. त्या भागात जंगली प्राण्यांची भीती होती. सगळे लोक चार-चाकीनेच / कारनेच प्रवास करत होते.

"आज काम करून उद्या निघू" असे सोहमला वाटले. पण काम काही संपले नाही. रात्री सोहमने साईटवाल्या माणसाला विनवणी केली "मला खूप भीती वाटते आहे. मी दुसरीकडे राहणार नाही. मला तुमच्याच रूमवर झोपू द्या." असे सोहमने पहिली रात्र काढली.

बोलता बोलता कळाले 'इथे महादेवाचे मंदिर आहे'. जवळच तीन नद्यांचा संगम आहे. गोदावरी, प्राणहिता आणि अमृतवाहिनी. अमृतवाहिनी ही नदी अदृश्य रुपात इथे आहे. महादेवाला जो अभिषेक केला जातो, त्याचे पाणी जमिनीखालून गोदावरी आणि प्राणहिता नदीमध्ये मिळते. म्हणून अमृतवाहिनी ही तिसरी नदी झाली.

इथेच, साक्षात यम-देवाने, महादेवाचे लिंग स्थापन करून तपश्चर्या केली आणि मुक्तीचे वरदान मागितले. महादेवाने प्रसन्न होऊन यम-देवाला मुक्ती दिली. आणि त्याच मंदिरात स्वत: एक शिवलिंग स्थापन केले. एकाच मंदिरात दोन शिवलिंग असणारे भारतातले एकमेव मंदिर म्हणजे 'कालेश्वरम'. साक्षात यमदेवाला मुक्ती मिळाली, म्हणून याचे दुसरे नाव "मुक्तेश्वरम." सोहमने ठरवले "काहीही करून दर्शन घ्यायचेच."



दुसऱ्या दिवशी ऑफिसमधून फोन आला. "सोहम तुला कडप्पाला सुद्धा जायचे आहे. तिरुपती

पासून फक्त ८० किलोमीटर आहे." म्हणजे बालाजीनेच बोलावले होते सोहमला, तिरुपतीला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच उठून कालेश्वरमचे दर्शन घडले. सगळे साईटवर गेले. काम संपवता संपवता संध्याकाळ झाली. सोहम पुन्हा तिथेच राहिला. तिसऱ्या दिवशी सकाळीच, सोहम पुन्हा हैदराबादकडे निघाला. हैदराबादवरून तिरुपतीला जाण्यासाठी रेल्वे मिळाली. साधारणपणे रात्री ९.३० वाजता सोहम तिरुपतीला पोचला. तिरुपतीला पोचल्यावर, त्याने कडप्पाच्या माणसाला फोन केला. पण तो म्हणाला की "कल तो शनिवार और परसो इतवार है. साईट पर कोई नाही मिलेगा. आप सोमवारको आईये." सोहमने ठरवले, "आजच तिरुमलाला जायचे. उद्या दर्शन घेऊन परवा कडप्पाला जायचे". सोहम, जेवण वगैरे करून तिरुमलाला जाण्यासाठी बसमध्ये बसला.

शेवटचे, १२-१३ वर्षांअगोदर तिरुपतीला जाणे झाले होते. मध्यंतरी बराच फरक पडला होता. "वर गेल्यावर सामान कुठे ठेवायचे? रूम मिळेल का?" वगैरे भरपूर चिंता होत्या." जवळच एक माणूस बसला होता. तो सुद्धा एकटाच होता. सोहमला वाटले, "चला कोणीतरी पार्टनर मिळाला." सोहम त्याच्या शेजारी जाऊन बसला. ओळख वगैरे झाली. तो माणूस पहिल्यांदाच तिरुपतीला आला होता. त्याचे डोळे म्हणजे, अगदी ऐश्वर्या राय पेक्षाही सुंदर होते. सोहम म्हणाला "उपर जाके हम रहने के लिये जगह देखेंगे."

तो माणूस पहिल्यांदाच आला होता तरी म्हणाला "हमे रूम नही मिलेगी. हम क्लोक रूम मे सामान रख के, जमीन पे ही सो जायेंगे." खरेच तसेच झाले. रूम मिळाली नाही. शेवटी, क्लोक रूम मध्ये सामान ठेऊन दोघे जमिनीवरच झोपी गेले. सकाळी उठून, मुंडण, अंघोळ आणि इतरही गोष्टी उरकेपर्यंत संध्याकाळ झाली. मुंडण, अंघोळ करताना, सोहमने अगदी विश्वासाने स्वत:चे कपडे पार्टनरकडे दिले होते. अगदी पाकीटसुद्धा.

सोहमला पुढे कडप्पाला जायचे असल्यामुळे वेळ कमी होता. म्हणून, सोहम ३०० रुपयांच्या दर्शनाच्या रांगेत गेला. तर त्याचा पार्टनर, फ्री दर्शनाच्या रांगेत गेला.

३ तासात सोहमचे दर्शन झाले. बालाजीचे दर्शन घेताना, वैकुंठ म्हणजे काय हे समजते. तिरुपतीला गेल्यावर, माणूस कितीही चालत राहिला तरी थकवा जाणवत नाही. वातावरण अगदी प्रसन्न असते. सगळा थकवा, शीण, कुठे पळून जातो? ते कळतच नाही. देवाचे दर्शन फक्त एकाच मिनिटात होते. पण, त्या एका मिनिटासाठी माणूस काहीही करू शकतो. रांग मोडू शकतो, दोरीवरून उडी मारू शकतो, आजूबाजूच्यांना,

धक्का देऊ शकतो.

देवाजवळ गेल्यावर मात्र "आपण काय मागणार होतो?" ते आठवतच नाही. पण, "जे मागायचे होते ते आपण विसरलो आहोत" हे मात्र समजते. त्याचे रूप डोळ्यात कितीही साठवायचे म्हणले, तरी दर्शन घेऊन बाहेर आल्यावर आठवत नाही. कदाचित, बालाजी कसा दिसतो? हे पाहण्यासाठीच पुन्हा पुन्हा आपण तिरुपतीला जातो.

पुष्करणी तलाव, वराह स्वामींचे मंदिर, मुख्य मंदिरासमोर असणारे हनुमानाचे मंदिर, शेजारचे राधा कृष्णाचे मंदिर, रामाचे मंदिर, आकाशगंगा, पाताळगंगा, लग्न मंडप, जेवणाचा मंडप, सगळे कसे राजेशाही. का नसणार राजेशाही? जो जगाचा सांभाळ करतो, त्याचे सगळेच राजेशाहीच असणार.

तिरुपतीला फिरताना वाटते "जगाचा मध्य हाच आहे. आणि या भोवतीच सगळे जग फिरत असावे". कसलीही चिंता वाटत नाही. तिथे मिळणारे जेवण, चहा, अगदी सगळेच कसे अमृतासारखे वाटते. सगळे संत का 'विठ्ठल विठ्ठल' करतात? हे सुद्धा समजते.

दर्शन घेऊन सोहम पुन्हा क्लोक रूमपाशी पोचला. त्याचा पार्टनर काही आला नव्हता. थकला असल्यामुळे सोहम पटकन झोपी गेला. सकाळी ५-६ वाजता, त्याचा पार्टनर अगदी थकून परत आला.

सोहम म्हणाला "यार मुझे वापस पुणे जाना है, टिकट कैसे मिलेगा.?"

पार्टनर म्हणाला - यहा पे, दायी ओर रेल्वे रिजर्वेशन की काउंटर है. सुबह ८ बजे वहापर जाओगे, तो तुम्हे टिकट मिल जायेगी."

सोहम सकाळी ८ वाजताच रिजर्वेशन करण्यासाठी गेला. त्याला पुण्याचे तिकीट तर नाही मिळाले. पण, कोल्हापूरचे मिळाले. असे म्हणले जाते की, तिरुपती बालाजीचे दर्शन घेतल्यावर, पुढे महालक्ष्मीचे दर्शन घेतल्याशिवाय यात्रा पूर्ण होत नाही. कदाचित, देवालाच सोहमची यात्रा पूर्ण करून घ्यायची होती.

पुढे दोघांने ठरवले "प्रसादाच्या रांगेत जाऊन जेवायचे". पण गर्दी पाहून सोहम घाबरला. आणि परत जाऊ म्हणू लागला. पण पार्टनर म्हणाला "देखो, हमे बस २० मिनट मे खाना मिल जायेगा." पुन्हा तसेच झाले. ते जेवण म्हणजे साक्षात अमृतापेक्षाही गोड. गव्हाची खीर, गरम गरम भात, रस्सम, सांबर, एक भाजी, ताक, असा मस्त मेनू असतो. तिथे सगळे अन्न वाफेवर शिजवले जाते. दिवसभरात, कमीत कमी १ लाख लोक

तिथे जेवणाचा आस्वाद घेतात.

जेवल्यावर, दोघांने रात्री पुन्हा बालाजीचे दर्शन घ्यायचे ठरवले. सोहम पुन्हा ३०० रुपयांच्या लाईनमध्ये गेला. तर पार्टनर, पुन्हा फ्री दर्शनाच्या रांगेत गेला. आज सोहमचे दर्शन अडीच तासातच झाले. पुन्हा रात्री १ वाजता सोहम क्लोक रूम वर आला. रात्रभर पार्टनरची वाट पहात राहिला. पण, पार्टनर काही आला नाही. सकाळी समजले की, रात्रीच कुलूप परत करून, गेल्या दोन दिवसांचा पार्टनर निघून गेला होता.

सोहमची तब्येत पुन्हा बिघडू लागली होती. दोन तीन वेळा उलटीसुद्धा झाली. (म्हणजे माधवाच्या गोष्टीप्रमाणेच, बालाजीच्या आणि पर्वताच्या प्रभावाने, सोहमचे पाप उलटीच्या रूपाने बाहेर पडले होते). इथे सोहम, 'माधव' झाला होता.

सकाळी ६ वाजता सोहम खाली तिरुपतीला जाण्यासाठी निघाला. ७ वाजता तिरुपतीला पोचला. कोल्हापूरला जाणारी गाडी संध्याकाळी ७.१५ वाजता होती. म्हणजे, १२ तासात कडप्पाला जाऊन परत तिरुपतीला यायचे होते.

पण, बसमध्ये बसल्यावर समजले "कडप्पा इथून २०० किलोमीटर आहे". म्हणजे कमीत कमी ४ तास. ११.१५ वाजता सोहम कडप्पाला पोचला. तिथे त्याला घेण्यासाठी कार उभीच होती. कारमध्ये बसल्यावर अजून एक धक्का बसला. तो म्हणजे, साईट तिथून ८० किलोमीटर, म्हणजे दीड ते दोन तास लांब होती.

सोहम देवाला मनातच प्रार्थना करू लागला "देवा काम पटकन होऊ दे. म्हणजे संध्याकाळी रेल्वे पकडता येईल. तब्येत बिघडत चालली आहे."

सगळे १२.३० वाजता साईटवर पोचले. देवाने सोहमसाठी पुढचा बंदोबस्त आधीच करून ठेवला होता. विजेचे कनेक्शन नसल्यामुळे काहीच काम करता येणार नव्हते. पुढच्या ४५ मिनिटात, सगळीकडे फोन वगैरे करून, दीड वाजता सोहम पुन्हा कडप्पाला जाण्यासाठी निघाला. रस्त्याने जाता जाता, ब्रम्हमंगमटम म्हणून गावी, एका मोठ्या संताचे दर्शन झाले. पुढे भविष्यात काय घडणार आहे? हे त्या संतांने मंदिराच्या भिंतींवर आधीच, म्हणजे जवळ जवळ २००-३०० वर्षांपूर्वीच लिहून ठेवले आहे.

बरोबर ३.१५ वाजता सोहम कडप्पाला पोचला. जणू काही बस त्याच्यासाठीच थांबली होती.

सोहम बसताच बस निघाली. पण ४ तासात बसने तिरुपतीला पोचणे आवश्यक होते.

संध्याकाळी ७ वाजून १० मिनिटांने बस तिरुपतीला पोचली. मेडिकल मध्ये औषधे घेऊन, पळत पळत सोहम रेल्वेमध्ये चढला.

आपला एक एक मिनिट देवाने लिहिलेला असतो. हे आज सोहमला समजले होते.

पुढे कोल्हापूरला जाऊन, महालक्ष्मीचे दर्शन घेऊन सोहम परत पुण्याला पोचला.

महत्वाचे आश्चर्य म्हणजे -

१. श्रावण महिना सुरु होता.

२. एकादशीच्या दिवशी, शुक्रवारी कालेश्वरमचे दर्शन झाले होते.

३. त्रयोदशीच्या दिवशी आणि चतुर्दशीच्या दिवशीही पुन्हा, म्हणजे शनिवारी आणि रविवारी बालाजीचे दर्शन झाले होते.

४. पौर्णिमेला, म्हणजेच मंगळवारी महालक्ष्मीचे दर्शन झाले होते.

५. दोन दिवस त्याच्या सोबत असणारी व्यक्ती, ज्याने सोहमला "रेल्वेचे तिकीट कुठे मिळेल?" हे व्यवस्थित सांगितले. जेवणाच्या रांगेत "२० मिनिटात जेवण मिळेल" हे सुद्धा सांगितले. सोहम मुंडण करण्यासाठी गेल्यावर त्याचे पैसे आणि कपडे सांभाळले. पण, रात्री सोहम दर्शन घेऊन आल्यावर तो व्यक्ती गायब झाला होता. महत्वाचे म्हणजे, तो व्यक्ती पहिल्यांदाच तिरुपतीला आला होता. त्याचे डोळे, ऐश्वर्या राय पेक्षाही सुंदर होते.

मग तो होता तरी कोण? "जिसका कोई नही, उसका खुदा होता है". सगळ्या जगाची आस सोडून सोहम कृष्णाकडे गेला होता. आणि, कृष्णानेसुद्धा त्याच्या हाकेला उत्तर दिले होते.

पुन्हा ऑफिसला परत आल्यावर, सोहमकडे वेल्डिंग मशीन बनवण्याची जबाबदारी आली. अनुभवी लोकांच्या मदतीने सोहमने दोन वेल्डिंग मशीन बनवून दिल्या. हळू हळू टेस्टिंगचे काम जमू लागले होते. काही दिवसांने, एक जनरेटर रिपेयर करण्याची जबाबदारी येऊन पडली. सगळयांच्या मदतीने हे सुद्धा काम फत्ते झाले. कंपनीच्या ई-मेल पाहून, त्याच्या प्रिंट्स काढून द्यायची जबाबदारी सुद्धा पडली. हळू हळू एक एक

जबाबदारी वाढत जाऊन, सोहम आता वर्क-शॉप मधेच जास्त काळ राहू लागला होता. ऑफिसमध्ये येणे जाणे कमी झाल्यामुळे, होणारा त्राससुद्धा कमी होऊ लागला होता.

अशातच, पुन्हा एकदा राजस्थानला जाण्याची वेळ आली. या वेळेस जायचे होते अजमेरला. असे म्हणले जाते की "लोकांना अजमेरच्या दर्ग्याचे दर्शन लवकर मिळत नाही. ज्याला बाबा बोलावतात, त्यालाच जायला मिळते". सोहमला तर दर्ग्याविषयी काहीच माहिती नव्हते. पहिल्यांदाच अजमेरला जायचे होते. काम फार अर्जंट असल्यामुळे सोहमसाठी विमानाचे तिकीट पाठवले गेले. आयुष्यात पहिल्यांदाच सोहम विमानाने जाणार होता. पहिल्यांदाच विमानात बसणार असल्यामुळे, थोडी भीती, थोडे कुतूहल, थोडी मजा वाटत होती.

विमान मुंबईवरून जयपूरला जाणार होते. जयपूरवरून गाडीने अजमेरला जायचे होते. सोहम विमानात बसला. सोबतच, ज्याने सोहमचे तिकीट काढले तो सुद्धा होता. चेहऱ्यावरचा आनंद काही सोहमला लपवता येत नव्हता.

शेवटी अजमेरला पोचल्यावर "राजस्थानमध्ये थंडीच्या दिवसात किती मस्त वातावरण असते" हे सोहमला समजले. ४ दिवस सोहम तिथेच राहिला. राजस्थान मधली माणस अगदी साधी-भोळी. तिथे यात्रेकरूंची कोणतीही लुटा-लूट केली जात नाही. या चार दिवसांत सोहमने "आजूबाजूला काही देवस्थान आहे का?" याची चौकशी सुरु केली. त्याला समजले "अजमेरचा दर्गा फक्त २० किलोमीटर लांब आहे". "तसेच, अजमेर वरून पुष्कर सुद्धा फक्त १० किलोमीटर लांब आहे". पुण्याला निघण्याच्या दिवशी, सोहम आधी "ख्वाजा गरीब नवाज शरीफांच्या दर्ग्यावर गेला". आपण कधीही अजमेर शरीफच्या दर्ग्याला गेलो, की फक्त २०-३० मिनटात दर्शन मिळतेच मिळते. दर्शन घेऊन सोहम पुष्करला गेला.

पुष्कर म्हणजे, पृथ्वीवर ब्रम्हदेवाचे मंदिर असणारी एकमेव जागा. तिथे एक मोठ्ठे सरोवर आहे. त्या सरोवराचे नाव पुष्कर. म्हणूनच या जागेला पुष्कर असे नाव पडले असावे.

एकदा ब्रम्हदेवाच्या हातून हातातले कमळ खाली पडले. पडताना, त्या कमळाची एक पाकळी पृथ्वीवर पडली. कमळ म्हणजे "पुष्प" आणि हात म्हणजे "कर". म्हणूनच, "पुष्प" + "कर" = पुष्कर.

जवळच गायत्री मंदिर आहे, प्रती-बालाजी मंदिर आहे, जवळ जवळ १००० मंदिरे पुष्करमध्ये आहेत.

पूर्वी कधीतरी ब्रम्हदेवाला एक यज्ञ करायचा होता. यज्ञ करण्यासाठी, ब्रम्हदेवाला पत्नी सोबत म्हणजे, सरस्वतीदेवी सोबत उपस्थित राहणे आवश्यक होते. पण काही कारणाने सरस्वतीदेवी वेळेवर पोचू शकली नाही. शुभ मुहूर्त टळू नये म्हणून, ब्रम्हदेवाने मंत्रशक्तीने एक स्त्री देवता निर्माण केली. हा मंत्र म्हणजे गायत्री मंत्र. या मंत्रामुळे, त्या ब्रम्हदेव निर्मित देवीचे नाव पडले 'गायत्री'. ब्रम्हदेवाने गायत्री देवीशी लग्न केले. यज्ञ पूर्ण करण्यासाठी, पत्नी म्हणून तिला सोबत बसवले. यज्ञ पूर्ण केला. पण, ब्रम्हदेवाने दुसरे लग्न केले म्हणून, सरस्वती देवी रुसून दूर जाऊन बसली. दूरवर सरस्वतीदेवीचे देखील मंदिर आहे.

जवळच प्रती-बालाजीचे मंदिरसुद्धा आहे. सोहम तिथेही पोचलाच. दक्षिणापेटीत ४० रुपये टाकले. पण, तिथल्या पुजारयांने, प्रसाद म्हणून साधे तीर्थसुद्धा दिले नाही. मनातच सोहम, देवाला शिव्या देत निघाला. "देवा, एवढे ४० रुपये टाकले मी. आणि तू साधे तीर्थसुद्धा दिले नाहीस."

पुन्हा सोहम, मनात नकारात्मक विचार घेऊन, शेजारच्या गायत्री आणि सरस्वतीच्या मंदिरात पोचला. "इथेही कोणी प्रसाद देणार नाही" असे वाटून सोहम आल्यापावलीच परत निघाला होता. तेवढ्यात मागून कोणीतरी आवाज दिला "भैय्या, प्रसाद लेके जाओ".

मनातली हाक तू ऐकतोसच,
हाकेला प्रतिसाद देतोसच...
रिकामे कोणालाच तू पाठवत नाहीस
प्रत्येकाला तू भेटतोसच...

इथेही ब्रम्हदेवाचे दर्शन घेऊन, सोहम पुढे नाथद्वाराला पुन्हा गेला. नाथद्वारा पुण्याच्या रस्त्यातच मध्ये आहे. पुन्हा कृष्णाचे दर्शन घेऊन, सोहम अहमदाबादमार्गे पुण्याला परत आला.

पुण्याला येताच, ७ दिवसांने सोहमला पुन्हा आंध्रप्रदेश मध्ये जावे लागले. या वेळेस जायचे होते "बद्रचलमला". पुन्हा हैदराबाद आणि तिथून बद्रचलम.

श्री. विष्णूने एकूण ४८ अवतार घेतले आहेत. कोणी २४ म्हणते, कोणी ५२ म्हणते. पण, बद्रचलम येथे असे मंदिर आहे, जेथे श्री. विष्णूच्या २४ अवतारांचे तुम्हाला दर्शन मिळते. इथे रोज रात्री, साधारणपणे ८ - ८.३० वाजता देवाची झोपायची वेळ होते. तेव्हा देवाला पाळणा म्हणून झोपवले जाते. आणि या वेळेस, आपल्यासारख्या सामान्य भक्तांना तिथे उपस्थित राहण्याची परवानगी आहे.

सोहमला नक्की आठवत नाही. पण, कदाचित इथेच अजूनही एक गोष्ट प्रसिद्ध आहे. ती म्हणजे, एकदा या मंदिरातले पुजारी, रात्री देवाला पिण्यासाठी पाणी ठेवायचे विसरून स्वत:च्या घरी निघून गेले.

रात्री रामाला तहान लागली. रामाने सीतेला पाणी आणायला सांगितले. सीतामाई रामासाठी पाणी आणायला बाहेर आल्या. तितक्यात, जो पुजारी देवासाठी पाणी ठेवायचे विसरला होता, तो तिथे पाणी घेऊन परत पोचला.

सीतामाईला हे समजले. आणि ती घाई-गडबडीतच, रामाच्या मूर्तीच्या उजव्या बाजूला जाऊन उभी राहिली. कोणत्याही मंदिरात, नेहमी सीतामाई रामाच्या डाव्या हाताच्या बाजूलाच उभ्या असतात. पण, या मंदिरात मात्र त्या उजव्या बाजूला उभ्या आहेत. रात्र झाल्यामुळे हे मंदिर काही सोहमला पाहायला मिळाले नाही. नक्की हे तेच मंदिर आहे की नाही? हे सांगता येणार नाही, पुन्हा तिथे गेल्याशिवाय.

पण, एक गोष्ट मात्र नक्कीच इथली आहे. इथल्या रामाच्या मंदिरात, रामाच्या उजव्या नव्हे तर डाव्या हातात सुदर्शन चक्र आहे. आणि उजव्या हातात शंख आहे. रामाचे आणि रावणाचे युद्ध संपल्यावर "सर्व राक्षसांचा अंत झाला आहे" असेच श्री विष्णुंने, त्यांच्या या प्रतिमेवरून दाखवून दिले आहे.



बद्रचलम येथे सोहम ३ दिवस राहिला. संध्याकाळी फार कंटाळा येतो, म्हणून त्याने थिएटर मध्ये जाऊन सिनेमा पहायचे ठरवले. रोबोट आणि अजून कोणतातरी चित्रपट, त्याने एकाच दिवशी आणि ते ही तेलगुमधून पाहिला. हा बाबा इतका फिल्मी आहे, की भाषेशी याचे काहीही घेणे देणे नव्हते. थिएटर दिसले रे दिसले, की हा आत शिरायचा.

काम संपवून सोहम पुन्हा हैदराबादला आला. रस्त्यात सोहम विचार करू लागला "आपल्याला जाताना तुळजापूर लागेल. आपण तुळजापूरच्या भवानी मातेचेही दर्शन घेऊ. किंवा, हैदराबादवरून थेट माहूर गडावर जाण्यासाठीसुद्धा बस मिळते. आपण तुळजापुरला किंवा माहूरला जाऊ".

सोहम देवीला म्हणाला "माते, मी तुळजापूरला यावे की माहूरला? हे तूच सांग."

तेवढ्यात, समोरून दोन वेगळया वेगळया बस आल्या. एक होती तुळजापूरला जाणारी आणि दुसरी होती माहूरला जाणारी. जणू काही देवीच सोहमला म्हणाली "आता कुठे यायचे, ते तूच ठरव".

शेवटी, "आधी आलेल्या बसने जायचे" असे ठरले. आधी आलेली बस तुळजापूरला जाणारी होती.

सोहम बस पकडून नळदुर्गला उतरला. तिथून तुळजापूरला जाऊन, भवानी मातेचे दर्शन घेऊन सोहम पुन्हा घरी आला. घरी सांगितल्यावर, सगळे सोहमला खूप भाग्यवान समजू लागले. सगळे म्हणायचे "देव तुला कसे काय रे अजमेर, पुष्कर, तिरुपती, कालेश्वरम, बद्रचलम, नाथद्वारा, तुळजापूर अश्या सगळ्या ठिकाणी बोलावतो?" आम्ही आपले घरीच रहातो.

सोहम म्हणाला "अग आई, तुम्ही घरी असता. म्हणून तर मला जाता येते."

पुन्हा, ऑफिसला येऊन जेमतेम ४-५ दिवस झाले असतील. सोहमला पुन्हा अजमेर शरीफचे आणि ब्रम्हदेवाचे बोलावणे आले. आत्तापर्यंत सोहमला समजले होते "आपल्या पूर्वजांच्या नावाने पुष्करमध्ये श्राद्ध केले, की त्यांना स्वर्ग किंवा मुक्ती मिळते". तसेच, जर आपल्या हातून कोणी प्राणी, पक्षी मारला गेला असेल, तर त्या पापापासुनही आपल्याला मुक्ती मिळते. सोहमच्या हातून लहानपणी, जे कोणी प्राणी, पक्षी मारले गेले आहेत, त्यांच्या नावाने श्राद्ध करायचे त्याने ठरवले.

सोहम श्राद्ध करायला गेल्या गेल्याच तिथले ब्राम्हण सोहमला म्हणाले "भाई-साब, पितृ-श्राद्ध करने आए हो? और हातसे जो हत्याए हुई है, उसके लिये भी श्राद्ध करने आए हो? पहले ही सब मंजूर हो चुका है." जणू काही स्वत: ब्रम्हदेवच बोलत होता.

पूर्वी, कौरव आणि पांडवांचे युद्ध संपल्यावर. जसे कृष्णाने, सर्व हत्त्यांच्या पातकातून पांडवांना मुक्त करून घेतले होते. तसेच सोहमबरोबरसुद्धा घडत होते.

पुन्हा पुष्कर, अजमेर शरीफ आणि नाथद्वारा, असे करून सोहम घरी आला. घरातले अजूनच खुष झाले.

अजमेरवरून परत आल्यावर पुन्हा तिरुपतीला जाणे झाले. आता सोहमला, तिरुमलामधले, अजमेर मधले रस्तेसुद्धा पाठ झाले होते. सोहमचे योग इतके चांगले होते, की तो जिथे जिथे जायचा, तिथे तिथे, देवाचे कोणते तरी प्रसिद्ध मंदिर असायचेच. मंदिर नसले, तर सोहम वाट वाकडी करून देवाच्या दर्शनाला जात होता.

महत्वाचे म्हणजे, सोहमला कधीही, स्वत:च्या देव-दर्शनासाठी ऑफिसचा वेळ वाया घालवण्याची वेळ आली नाही. देवाचे दर्शन घेता यावे म्हणून सोहम, आराम वगैरे न करता रात्रीसुद्धा बसने प्रवास

करायचा. ठरलेल्या वेळेत काम करून, दर्शन घेऊन पुण्याला यायचा.

तेव्हा काही ए.टी.एम कार्ड जवळ नसायचे. ऑफिसमध्ये मिळतील, तेवढेच पैसे घेऊन सोहम निघायचा. सोहम परत आल्यावरसुद्धा त्याच्याकडे काही पैसे शिल्लक असायचे. सगळी सोय देवच करतोय म्हणल्यावर, कमी पडणे शक्यच नव्हते.

गेले दोन-अडीच महिने, सोहम घरी कमी आणि बाहेरच जास्त फिरत होता. आता फिरण्याची मजा सुद्धा येऊ लागली होती. एकदा असेच गोदरेज कंपनीच्या साईटवर जायचे होते. ठिकाण होते, महाराष्ट्रामधले अंबाजोगाई. सोहम रात्री बसमध्ये बसला. सकाळी अंबाजोगाईला पोचला.

अंबाजोगाई म्हणजे योगेश्वरी. तिचे लग्न परळी वैजनाथांसोबत ठरले होते. पण, लग्नाचा शुभ मुहूर्त टळून गेला. तरी वऱ्हाड काही पोचलेच नाहीत. यामुळे सगळे वऱ्हाडी दगड झाले.

अंबाजोगाईचे दर्शन घेऊन, साईटवर जाऊन एकाच दिवसात काम संपले. पुन्हा "जवळ कोणते मंदिर आहे का?" हे शोधणे सुरू झाले. अंबाजोगाई वरून जवळच आहे परळी वैजनाथ. परळी वैजनाथचे दर्शन घेऊन, पुढे सोहम औंढा नागनाथ येथे पोचला.

औंढा नागनाथ हे मंदिर नामदेवांच्या गोष्टीसाठी सुद्धा प्रसिद्ध आहे. एकदा संत नामदेव औंढा नागनाथ येथे पोचले. मंदिरासमोर बसूनच त्यांने भजन म्हणायला सुरुवात केली. पण, "देवाच्या पूजेत अडथळा येतो" म्हणून तिथल्या काही लोकांनी, नामदेवांना मंदिराच्या मागच्या बाजूस जाऊन भजन म्हणायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच, सगळे उठून पाहतात तो काय? देवाने, नामदेवांचे भजन ऐकण्यासाठी मंदिराची दिशाच बदलून टाकली होती. नामदेव, रात्री मंदिराच्या मागच्या बाजूस जाऊन भजन म्हणत बसले होते. आणि सकाळी पाहतात तो, मंदिराचे प्रवेशद्वार नामदेवांसमोर होते.



तर, सोहम रात्री इथे पोचल्यामुळे झोपायची काहीच सोय नव्हती. तितक्यातच, एक धष्टपुष्ट माणूस सोहम बरोबरच मंदिरात आला. सोहमला नवीन पार्टनर मिळाला होता. जर शनी महाराज किंवा महादेव, माणसाचे रूप घेऊन पृथ्वीवर आले, तर असेच रूप घेतले असते त्यांने.

घाबरलेल्या सोहमबरोबर, तो व्यक्ती मंदिराच्या आवारातच जमिनीवर झोपला. सकाळी दर्शन घेऊन दोघे आपापल्या मार्गाने निघाले. महाराष्ट्रात साडे-तीन शक्ती पीठे आहेत. त्यातले तुळजापूर, कोल्हापूर आत्तापर्यंत झाले होते. सोहमचे, फक्त माहूर आणि वणीला जाणे बाकी होते.

१. तुळजापूर म्हणजे - भवानी मातेचे शक्तीपीठ.

२. कोल्हापूर म्हणजे - महालक्ष्मी मातेचे शक्तीपीठ.

३. वणी म्हणजे - सप्तशृंगीमातेचे शक्तीपीठ. महिषासुर राक्षसाचा वध करीत असणारी. मातेची आठ फूट उंच, अष्टभूजाधारी मूर्ती पाहिल्यावर, खरंच अंगावर काटा येतो. (अगदी काल-परवाच माझे वणीला



जाणे झाले.

४. माहूर म्हणजे - रेणुकामातेचे शक्तीपीठ. रेणुकामाता म्हणजे, परशुरामाची जननी.

इथेच अनुसूया मातेचे मंदिरही आहे.

अनुसूया माता, म्हणजे साक्षात श्री दत्तप्रभूंची आई. आपल्याला माहितीच आहे, दत्तप्रभू म्हणजे, श्री ब्रम्हा, विष्णू आणि महेश यांचा संयुक्तिक अवतार.

एकदा, अनुसूया मातेच्या सत्वाची परीक्षा घ्यावी म्हणून, ब्रम्हा, विष्णू आणि महेश, ब्राह्मणांचा वेष घेऊन अनुसूया मातेच्या झोपडीत आले. तिघेही म्हणाले "माते आम्हाला भिक्षा द्या".

अनुसूया मातेने त्यांना घरात घेऊन त्यांचे आदरातिथ्य केले. ती देवांसमोर जेवण घेऊन आली. तेव्हा देव म्हणाले "कोणीही, अंगावर वस्त्र परिधान करून आम्हास जेवण वाढले, तर आम्ही खात नाहीत."

आता देवीसमोर धर्मसंकट पडले, "पतीशिवाय इतर कोणासमोरही, अंगावरची वस्त्र उतरवून सत्व गमवायचे? की आलेल्या अतिथींना उपाशी पोटी परत पाठवून, हे सत्व गमवायचे?"

शेवटी देवीने मनातच प्रण केला, "जर माझे सत्व खरे असेल, तर आलेले तीनही अतिथी लहान बाळात रुपांतरीत होतील". कोणतीही आई आपल्या मुलाला, अंगावरचे वस्त्र उतरवूनच दूध पाजते की.

देवीचे सत्व खरे होते. ब्रम्हा, विष्णू आणि महेश हे तीनही देव, खरंच लहान बाळात रुपांतरीत झाले. पुढे कित्येक दिवस हे तीनही देव, लहान बाळ होऊन माता अनुसूयेच्या घरीच होते.

इथे, सगळया देवांना आणि महालक्ष्मी, सरस्वती आणि पार्वती, या विष्णू, ब्रम्हा आणि शंकर, यांच्या बायकांना टेंशन येऊ लागले. अजून किती काळ आपल्या नवरयांशिवाय रहायचे?

शेवटी या तिघीही, स्वर्गातल्या इतर देवांना घेऊन अनुसुयादेवीला भेटायला आल्या. सगळयांची प्रार्थना मान्य करून अनुसुयादेवीने, ब्रम्हा, विष्णू आणि महेश या तिघांनाही आपापले मूळ रुप पुन्हा बहाल केले.

अनुसूया मातेवर प्रसन्न होऊन देवांने तिला वरदान मागायला सांगितले. देवी म्हणाली "तुम्ही तिघेही, तुमच्या अंशरूपाने माझ्या पोटी जन्म घ्यावा. हीच माझी मागणी".

पुढे, या तिघांनेही अनुसूया मातेच्या पोटी जन्म घेतला. बाळाचे नाव आहे "श्री दत्तप्रभू".

औंढा नागनाथ वरून सोहम थेट माहूरला गेला. तिथे रेणुका मातेचे, अनुसूया मातेचे दर्शन घडले. त्याला पुढे शेगावला जायची बुद्धी झाली. शेगावला जाऊन गजानन महाराजांचे दर्शन घडले. सोहम पुन्हा पुण्याला परत आला. लहानपणी सोहम आजारी असताना, आई-बाबांनी गजानन महाराजांना नवस केला होता. तो बहुतेक गजानन महाराजच पूर्ण करून घेत असावेत.

एवढे सगळे देवाने, सोहमकडून फक्त दीड दिवसात करून घेतले होते. आणि ऑफिसच्या वेळेत सोहम पुन्हा पुण्याला आला.

कदाचित, "पुढे येणाऱ्या संकटांना तोंड देण्याची सोहममध्ये क्षमता यावी". म्हणूनच, देव त्याला प्रत्येक ठिकाणी बोलावून शक्ती देत होता.

आत्ता, नोकरीला लागून जवळ जवळ एक वर्ष झाले होते. पुण्याला आल्यावर पुन्हा चिंता सुरु होत होती.

एकदा, १४ नोव्हेंबरच्या दिवशी सोहमला एक एस.एम.एस आला. त्यात लिहिले होते "happy anniversary (लग्नाच्या/प्रेम कहाणीच्या वाढदिवसाच्या शुभेच्छा). एस.एम.एस नवीन मोबाईल नंबर वरून आला होता. त्या नंबरवर फोन केला तर फोन लागला नाही.

खूप वेळ विचार केल्यावर सोहमला समजले "दोन वर्षाअगोदर, १३ नोव्हेंबर रोजी आपल्याला मानसीचा मोबाईल नंबर मिळाला होता. १४ नोव्हेंबर रोजी, आपण तिला पहिल्यांदाच एस.एम.एस केला होता.

""happy anniversary (लग्नाच्या/प्रेम कहाणीच्या वाढदिवसाच्या शुभेच्छा). असा एस.एम.एस

तिने पाठवला, याचा अर्थ असा की, तिचे आपल्यावर प्रेम आहे. ती मलाच आपला बॉय-फ्रेंड मानते, ती माझ्याबरोबरच कमिटेड होती. मग, ती समोर का येत नाही?"

म्हणजेच, न होऊ शकलेल्या लग्नाची तारीख सोहम विसरला होता. पण, मानसी नव्हती विसरली.

अजून भरपूर काही समजायचे आहे सोहमला.

महत्वाचे म्हणजे, सोहमला आजच, १४.११.२०१० रोजी, नोकरीत एक वर्ष पूर्ण झाले होते.

असेच एकदा, ऑफिसच्या कामासाठी सोहमला औंधला जावे लागले. तिथे कामानिमित्त सोहम इंटरनेट कॅफे मध्ये गेला. तिथे त्याला विराट दिसला. विराट (घराजवळ असणाऱ्या पोलीस लाईनमध्ये रहाणारा मुलगा. ज्याच्याशी मागे सोहमची खूप भांडणे झाली होती. आणि विराटने सोहमला धमकी दिली होती - "तुझी सगळी लफडी मला माहिती आहेत इत्यादी.)

तर, विराट ऑर्कुटवर काहीतरी खोटी प्रोफाईल तयार करत होता. सोहमला कळून चुकले होते, "इतके दिवस आपल्याला मानसीच्या नावाने हा फसवत होता तर?. हाच मागे सोहमला म्हणाला होता "तू पास कसे होतोस तेच बघतो, तुझी सगळी लफडीसुद्धा मला माहिती आहेत".

पण सोहम विराटला काहीच बोलला नाही. दुपारी ऑफिसला आल्यावर, मनावर दगड ठेऊन सोहमने स्वत:ची ऑर्कुटची प्रोफाईल डिलीट / बंद करून टाकली. त्याच्या आणि मानसीमध्ये असणारा संपर्क करण्याचा शेवटचा मार्ग सुद्धा आता बंद झाला होता. त्या दिवशी, भर ऑफिसमध्ये सोहम खूप रडला.

संध्याकाळी मोबाईलवर अजून एक एस.एम.एस आला "अब ऐसेही कही मिलेंगे. तुम्हारे लिये दुआ करेंगे. हमे याद रखना". हा एस.एम.एस सुद्धा नवीन मोबाईल नंबरवरून आला होता. जणू काही मानसीनेच हा मेसेज पाठवला होता.

तेवढ्यात, अजून एक एस.एम.एस आला, यावेळेस हा मेसेज, एका मित्राच्या मोबाईल वरून आला होता "हम बेवफा ना थे. मरने से पहले, तुम्हारे सब सवालो के जवाब दे के जायेंगे".

सोहमने त्या मित्राला फोन लावला. मित्र म्हणाला "मी तर असा कोणताही मेसेज पाठवला नाही". मग, मित्राच्या मोबाईलवरून तो मेसेज कसा काय आला?

आज सोहमला समजले होते "मानसीची ऑर्कुटवर कोणतीही प्रोफाईल का नव्हती?" "का तिचा फोन बंद झाला होता?" "का ती गायब झाली होती?" "का कोणालाच, ती कुठे आहे" याचा पत्ता लागत

नव्हता?.

कदाचित, तिचाही मोबाईल हॅक झाला होता. कदाचित, तिचेही ई-मेल अकाऊन्ट हॅक झाले होते. कदाचित, तिला सुद्धा सोहमसारखेच टॉर्चर केले गेले होते. आणि, ती निघून गेली. पण, सोहमशी संपर्क साधण्यासाठी, ती नवीन नवीन मोबाईल नंबरवरून एस.एम.एस. करत होती.

आज सोहमला अजून एक गोष्ट कळाली होती. ती म्हणजे, आजच्या या इंटरनेटच्या युगात, जिथे संपर्काची सगळी साधने उपलब्ध असतानासुद्धा, सोहमला तिच्याशी संपर्क साधण्यासाठी, गाडीमध्ये चिठ्ठी टाकणे, बाकावर लिहून ठेवणे, असे जुन्या मार्गांने संपर्क करण्याची बुद्धी का झाली होती?.

कदाचित, वरूनच देवानेच अशी प्रेम-कहाणी लिहून ठेवली होती.

आजकाल, लोक आपला मोबाईल नंबर सहजपणे हॅक करू शकतात. आपला ई-मेल, सहजपणे हॅक करू शकतात. हे सोहमला माहिती नसले, तरीही देवाला तर माहिती होते ना? म्हणूनच देवाने सोहमला, तिच्या बाकावर लिहून ठेवायची, तिच्या गाडीत चिठ्ठी टाकायची बुद्धी घातली होती.

त्यांची प्रेम-कहाणी अजरामर होणार होती.

अजूनही बरेच काही कळायचे होते सोहमला.

"ती निघून गेली आहे" हे आज पहिल्यांदाच सोहमला जाणवले होते. तत्वे आड येत होती. जवळ एवढा पैसा नव्हता, की सोहम तिला शोधू शकणार होता. पैसा सुद्धा मिळवला असता. पण, तिच्या मर्जीशिवाय तिला शोधणे अवघडच होते.

(सोहमने आत्तापर्यंत एवढी सगळी लफडी केली होती.

१. कधीही सोहमने, कोणाच्याही असहाय्यतेचा फायदा उचलला नव्हता.

२. कधीही, कोणाच्याही मर्जीविरुद्ध, आपल्या भावना, इच्छा कोणावर थोपल्या नव्हत्या.

विचार करा.......

असो,

तू आता येणार नाहीस... आज पहिल्यांदाच समजले होते...<br>
तुझे ही प्रेम होते माझ्यावर.... असे कधीच वाटले नव्हते.....

सोहमला आता रामाची आठवण येऊ लागली होती. सोहम मनातच रामाशी बोलू लागला "देवा, तू तर साक्षात देव होतास. तू काय करतो आहेस, ते तुला माहिती होते. "पुढे तुमच्याही आयुष्यात हेच घडणार आहे" हेच तू दाखवून देत होतास. खरंच देवा, तू जे काही सांगून गेला होतास, तेच माझ्याही आयुष्यात घडलेच की रे. लहानपणी मी तुझ्या दोन मालिका बघितल्या होत्या, एक म्हणजे रामायण आणि दुसरी म्हणजे श्री कृष्णा. रामायणात फक्त रडा-रडच पाहायला मिळाली होती. नेहमी वाटायचे, राम किती भोळा होता? चांगले राज्य चालवायचे सोडून वनवासाला गेला. मी असतो तर राज्य सोडून गेलोच नसतो. पण, नाही देवा, राम बनणे खूप अवघड आहे रे..

तुला किती वाईट वाटले असेल रे देवा. जेव्हा तुझी पत्नी तुझ्यासोबत होती, तेव्हा लोक म्हणत होते, "हिला सोडून दे". तुम्ही वेगळे झाल्यावर लोक म्हणू लागले "रामाला पत्नी सांभाळता नाही आली". तुझेच लोक, नेहमी तुझ्यावर कलंक लावत असताना, तुला किती वाईट वाटले असेल रे देवा?.

कोणी तुलाच शिव्या देत होते. तू कसे काय रे देवा, हे सगळे युगानयुगे सहन केले असशील?

तुला सगळे कर्तव्य-परायण, पुरुषोत्तम का म्हणतात? ते आज मला समजले.

खरेच, तू म्हणालास तसेच होते आहे रे. मी जिला पत्नी मानत होतो, तिच्यावर मी संशय नव्हता घेतला. पण, असे काही गैरसमज झाले, की माझ्यावर सुद्धा कलंक लागला रे. तुझे सुद्धा असेच काहीतरी झाले असेल. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. तू पुरुषोत्तम आहेस. जसे तुझ्या सीतेने अग्निप्रवेश केला. ती धरणीमध्ये गुप्त झाली. तसेच, मी जिला पत्नी मानत होतो, ती सुद्धा कुठे तरी गुप्त झाली आहे रे. ना तिच्याशी काही संपर्क करता येतो. ना तिची काही माहिती मिळते. सगळे जवळचे लोक, 'चारित्र्य', 'चारित्र्य' करून टॉर्चर करत आहेत. तुला पण असेच केले होते का रे सगळयांनी? तू किती वर्ष, किती युग, हे सहन केले असशील? तुलाच माहिती.

पण, तू स्वत: देव असल्यामुळे, तू आणि सीता कधीही अवतार संपवू शकत होतात. तुम्हाला पुढच्या अवताराची तयारी सुद्धा करायची होती. पण, ना मी देव आहे आणि ना आयुष्य संपवायची हिंमत आहे." जाउदे तुला तर सगळे दिसत आहे." आयुष्यात पहिल्यांदाच, सोहमचा देवाच्या वचनांवर विश्वास बसला होता.

(ज्या दिवशी मी, म्हणजे लेखकाने, सोहमचे आणि रामाचे मनातले बोलणे लिहिले. त्याच्या दुसऱ्याच दिवशी मी ही वर लिहिलेली वाक्य पुन्हा वाचत होतो. तेवढ्यात, मला देवाने अजून एक संकेत

दिला. संकेत कसा दिला? हे मी सांगणार नाही. पण, संकेत काय होता ते मी सांगू शकतो. देव म्हणाला "हो, माझ्यासोबतही असेच घडले होते आणि माझ्या भावना लोकांसमोर पोचणे गरजेचे आहे".)

तेवढ्यात रेडिओवर प्रवचन ऐकू आले, "जर कोणी पहिल्या जन्मी अजाणतेपणे एखादी चूक केली, तर देव माफ करतो. पण, जर पुढच्या जन्मीसुद्धा त्यांनी हीच चूक केली, तर देव सोडत नाही".

देवाचे टायमिंग अफलातून असते. एकाच वेळी, दोन वेगळया वेगळया प्रकारे त्याने मला संकेत दिले होते.

(देवाचा हा संदेश सर्वांपर्यंत पोचवणे, हेच बहुतेक माझे पुढचे कर्म असावे. हे लिहित असताना टी.व्ही वर अजून एक वाक्य ऐकू आले, "काम अभी पुरा नाही हुआ है).

सोहमच्या, त्या मुलींसारख्या असणाऱ्या मित्राने सांगितलेले भविष्य आज खरे ठरले होते. "तिला तू आवडतोस. तुमच्या प्रेम कहाणी मध्ये खूप अडथळे असणार आहेत. कोणीतरी कॉमन ओळखीची व्यक्ती तुला मदत करेल".

मित्राने सांगितलेले भविष्य तर खरे ठरले होते. पण, मदत करणारी व्यक्ती अजूनही सापडली नव्हती.

"देवा मानसी मला सोडून गेली रे." आई-बाबांची जबाबदारी घ्यायची वेळ आली आहे. नाहीतर, मी सुद्धा हे आयुष्य संपवून टाकले असते."

आता सोहमसाठी, खरंच मनापासून स्थळे पाहायला सुरुवात झाली होती. पहिल्याच मुलीने आणि तिच्या आई-वडिलांने सोहमला पसंत केले. पण, सोहम अजूनही मानसीमध्येच अडकला होता. कसेतरी, आई-वडिलांना पटवून त्या मुलीला नकार कळवला.

"आपले खूप शत्रू आहेत" हे सोहमला आत्तापर्यंत कळालेच होते. "हे सगळे आपले लग्न होऊ देणार नाहीत" अशी भीतीसुद्धा वाटत होती. भीत भीतच, मुली पहायचा कार्यक्रम ठरवला जायचा. अशातच काही मुली अशाही मिळाल्या ज्या सोहमकडे, त्याच्या घराकडे पाहून नाक-डोळे मुरडत होत्या.

धमकीचे एस.एम.एस येण्याचे प्रमाण अजूनच वाढले होते. जुन्या गर्ल-फ्रेंड्स कधी कधी, 'बास्टर्ड' वगैरे शिवीगाळ करू लागल्या होत्या. "याच्यामागे काहीतरी योजना आहे" हे आत्तापर्यंत सोहमला समजू लागले होते.

"याने आपल्याला सगळयांना फसवले आहे" असे समजून, सगळया जुन्या गर्ल-फ्रेंड्स सोहमवर

रागावल्या होत्या. महत्वाचे म्हणजे "लेडीज वर्सेस रिकी बहल" सिनेमाप्रमाणे, सगळया जुन्या मैत्रिणी एक झाल्या होत्या. शत्रू घरातसुद्धा घुसला होता. लांबच्या सगळया बहिणी, ऑफिसमधले काही लोक, काही मित्र, काही नातेवाईक, असे सगळे लोक एकत्र आले होते. सगळे, पूर्ण प्रयत्नानिशी सोहमला पाडायचा प्रयत्न करू लागले होते.

एवढ्या सगळया लोकांच्या तावडीतून वाचणे अशक्यच होते.

आता "मी तुमचा शत्रू नव्हतो" हे दाखवण्यासाठी सोहम जीवाचा आटापिटा करू लागला. सोहमसुद्धा प्रत्येकाला पटवून पटवून थकला होता. दर वेळेस सोहम समजावून सांगण्याचा प्रयत्न करायचा. तेव्हा, अजूनच शिव्या पडत होत्या.

या काळात, सोहम कधी कधी टोचून बोलायला सुद्धा शिकला. सोहम कधी कधी लोकांशी टोचून बोलू लागला. कधी कधी फटकळपणे वागू लागला. संध्याकाळी घरी आले की पुन्हा वाटायचे "आपण असे कोणालाही टोचून बोलू नये. जर समोरच्याने आपल्याशी कांही चुकीचे वागले, तर देव त्याला शिक्षा करेल. पण, आपण टोचून बोलू नये"

आता सोहमला, राज कपूरचे "रमैया वसता वैय्या" हे गाणे आवडू लागले होते. त्यातले "आंखो मे थी प्यार की रोशनी... मेरे नैनो मे मिठी कटारी ना थी.... मै और था... मेरा दिल और था... मेरे नजरो मे ये दुनियादारी ना थी...."

हे वाक्य म्हणजे, "मी आधी किती गोड बोलायचो. टोचून बोलणे हे मला माहितीच नव्हते. मला ही दुनियादारी माहितीच नव्हती". असे सोहमला वाटू लागले होते.

विष्णूने जेव्हा राम अवतार घेतला, तेव्हा सगळे दु:खच पदरी पडले होते. राम फसला, फसून वनवास स्वीकारला. पण, कृष्णाला कोणी फसवू शकले का? नाही, कारण राम संयमी आणि एकवचनी होता. पण, कृष्ण म्हणजे अतिशय चतुर. त्याला फसवणे अशक्यच.

या काळात, शेवटी सोहमला कुठून तरी बुद्धी सुचली "तू सरळ कृष्णाला शरण जा. तो पतितांचा स्वामी आहे. तोच तुला वाचवू शकतो". झाले, आता दिवस रात्र सोहमच्या तोंडी एकच गाणे होते "श्रीकृष्णम शरणं नमामि".

सोहम आता, हळू हळू संध्याकाळी घरी देवपूजा करू लागला होता. देवाशी बोलू लागला होता.

सोहम म्हणायचा "देवा, मी आजपर्यंत खूप वाईट वागलो, सगळयांना खूप त्रास दिला. पण, वाल्याचा वाल्मिकी नाही का रे होऊ शकत? आता, सगळे एक होतील आणि मला त्रास होईल. असे वाटले नव्हते. मला त्यांचे कोणाचेही, काहीही वाईट करण्याची इच्छा नाही. तू सगळयांचे चांगले कर. तसेच, माझे लग्न कोणी होऊ देईल, असेसुद्धा वाटत नाही. माझे लग्न ठरले, तर त्या दिवशी मी ढोल वाजवून नाचेल"

त्या काळी, टी.व्ही वर दोन नव्या मालिका सुरु झाल्या होत्या. एक म्हणजे "श्री गजानन महाराज" आणि दुसरी "श्री स्वामी समर्थ". नेमके, सोहमची देवाशी बोलायची वेळ, आणि "श्री स्वामी समर्थ" ही मालिका लागायची वेळ एकच असायची.

आता सोहम जेव्हा कृष्णाला म्हणाला "देवा तू सगळयांचे चांगले कर, वाल्याचा वाल्मिकी नाही का होऊ शकत?" नेमके तेव्हाच, टी.व्ही मध्ये "श्री स्वामी समर्थ" ही मालिका सुरूच होती.

जसे सोहम म्हणाला "वाल्याचा वाल्मिकी नाही का होऊ शकत? देवा तू सगळयांचे चांगले कर" तसे टी.व्ही मधून आवाज आला "भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे" आता सगळयांचे चांगलेच होणार आहे". साक्षात "श्री स्वामी समर्थ" टी.व्हीच्या माध्यमातून सोहमशी बोलले होते.



(जसे आजकाल सिनेमामध्ये, हिरोच्या तोंडी कोणता तरी डायलॉग असतो, जो पुढे फार प्रसिद्ध होतो. उदा. गब्बरसिंगचा "कितने आदमी थे?. तसाच, श्री स्वामी समर्थांचा "भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे" हा डायलॉग सगळयात भारी आहे, नाही का? आपल्याला वाटणाऱ्या भीतीमध्ये, या डायलॉगचाच फार मोठा आधार वाटतो. असे वाटते की "खरेच कोणीतरी मोठे आपल्या पाठीशी आहे". प्रिय स्वामी, तुमचा डायलॉग एव्हरग्रीन आहे बरं का..)

तर असे "श्री स्वामी समर्थांची" सोहमच्या आयुष्यात एन्ट्री झाली होती.

दुसऱ्याच दिवशी ऑफिसमधले एक सर म्हणाले "काय सोहम, वाल्याचा वाल्मिकी होऊ नाही शकत

का?".

"अरे बापरे, मी देवाशी घरात बोललेलेसुद्धा यांना कसे काय समजले?" सोहमला अजूनच मोठ्ठा प्रश्न पडला होता. एक तर त्याचे सर देव होते, किंवा घरात मायक्रो-फोन लावला होता.

पण, कृष्णाला शरण गेल्याचा पहिलाच अनुभव सोहमला मिळाला होता.

दरम्यान, पत्रिका मिलन करण्यासाठी एका मुलीच्या घरी सोहमची पत्रिका पाठवण्यात आली. तसे त्या मुलीबरोबर लग्न नाही जुळले. पण, तिचे वडील स्वत: पत्रिका पाहणारे होते. ते म्हणाले "याच्या आयुष्यात राजयोग आहे".

हे ऐकून सोहम भलताच खुष झाला. "राजयोग" म्हणजे, आता आपण राजा होणार" असे वाटू लागले. पण, १४-१५००० रुपये पगारात कोणी राजा होत नसतो." आणि सोहमचे आत्तापर्यंतचे आयुष्य, त्याने शिक्षणात घालवलेली वर्ष, याचा अंदाज घेतला तर, सोहमचे अर्धे आयुष्य आत्तापर्यंत संपले होते. मग कसला राजा आणि कसला "राजयोग"?

पण, या "राजयोग" या शब्दामुळे सोहमला नवीनच वेड लागले होते. ते म्हणजे कुंडलीचा अभ्यास करण्याचे. हळू हळू सोहम, अजूनच काळजीपूर्वक स्वत:च्याच कुंडलीचे विश्लेषण करू लागला. इंटरनेटवर, ८-१० वेगळया वेगळया ठिकाणांवरून त्याने स्वत:चीच कुंडली तयार केली आणि अभ्यास सुरु केला.

त्याचे लग्न मकर होते. रास कन्या होती. शनी महाराज तुळ राशीत होते. म्हणजेच १०व्या स्थानी उच्च राशीत विराजमान होते. मकर लग्न असल्यामुळे आणि, मकर ही रास शनी महाराजांच्या अमलाखाली येत असल्यामुळे, सोहमची पूर्ण कुंडली, पूर्ण आयुष्य, हे शनी महाराजांच्या अमलाखाली चालणार होते.

तुळ राशीत, १७ अंश ते २० अंश या दरम्यान शनी महाराज अतिशय उच्च स्थानीचे असतात. या अंशांना पुष्कर अंश असे म्हणले जाते. पुष्कर म्हणजे अतिशय पवित्र, अतिशय भाग्यवान. सोहमच्या कुंडलीमध्ये, शनी महाराज असेच पुष्कारांशात होते.

एवढेच नाही तर पूर्वी सांगितल्याप्रमाणे, राहूदेव वृषभेत उच्चस्थानी आणि केतूदेव एकादश स्थानी होते. गुरु एकादश स्थानी वृश्चिकेत होते. गुरूंची पूर्ण उच्चेची (९ वी) दृष्टी, त्यांच्या उच्चस्थानी, म्हणजे सप्तमावर कर्कराशीवर होती. सूर्यदेवसुद्धा एकादश स्थानी म्हणजे, वृश्चिकेत होते. चंद्रदेव आणि मंगळदेव हे

केंद्राधीपती, एकाच त्रिकोणात होते. म्हणजेच, ९व्या स्थानी कन्या राशीत होते (याला शशी-मंगळ योग म्हणले जाते). नवमांश कुंडलीमध्ये, मंगळदेव सुद्धा पुष्कारांशात होते. चंद्रदेव स्वगृहीचे, म्हणजे कर्क राशीत होते.

हर्षलदेव सुद्धा वृश्चिक राशीत आणि अकराव्या स्थानी होते. आता, नवग्रहांबद्दल तर आपण ऐकलेच आहे. पण, हर्षल हा ग्रह/देव म्हणजे अतिशय चमत्कारिक असा ग्रह/देव आहे. हर्षलदेवाचे, एकादश स्थानी आणि वृश्चिक राशीत असणे म्हणजे अतिशय चमत्कारिक गोष्ट.

या हर्षलदेवांमुळे, बाह्य शक्तींने दिलेले संकेत चटकन सोहमला समजून यायचे. उदाहरणार्थ. आत्म्यांचा संवाद वगैरे, पुढे हे समजेलच तुम्हाला. अजून ते सोहमलासुद्धा समजले नाहीये.

एवढेच नाही तर, कुंडलीमधले सगळे ७ चे ७ मुख्य ग्रह, ९ व्या, १०व्या, ११व्या आणि १२व्या, एवढ्या चारच घरात होते. याला "केदार योग" असे म्हणले जाते.

रामाने, अतिशय उच्च कुंडली सोहमला दिली होती. कदाचित, सोहमचे आयुष्य याच गोष्टींमुळे इतके चमत्कारिक घडत होते.

शनी महाराज त्यांच्या साडे-सातीसाठी प्रसिद्ध आहेत. लग्न कुंडलीनुसार, सोहमची रास होती कन्या. नेमकी, २००७ ते २०१४ सालापर्यंत सोहमची साडे-साती चालू असणार होती. २००९-२०१२ या काळात, साडे साती मधली दुसरी अडीच वर्षे चालू होती. शनी महाराज कन्या राशीतच होते की.

आधीच राहू महादशा चालू होती. त्यातच साडे-सातीसुद्धा सुरु झाली होती. त्याच्यातच भर म्हणून, सोहमला कोणीतरी संमोहितसुद्धा केले होते. भरीस भर म्हणून, १३चा आकडा मागे लागला होता. आधीच, संमोहित झाल्याची आणि राहू महाराजांची भीती मनात होती. त्यातच शनी महाराजांचे नाव कानी पडले. होती नव्हती ती सगळी हिंमत गुंडाळली गेली.

"आता मेल्याशिवाय काही खरे नाही". पटकन मारून जाऊ" असे वाटू लागले होते.

मकर राशीपासून कन्या रास पडते ९वी. ९वे स्थान म्हणजे धर्म-स्थान म्हणून ओळखले जाते. २००९-२०१२ या काळात, शनी महाराज सोहमच्या कुंडलीत धर्म-स्थानी असल्यामुळे

१. सोहमने पूर्वी केलेल्या कर्मांची फळे म्हणून त्याला हा मानसिक त्रास झाला होता.

किंवा

२. शनी महाराजांची साडे साती येते ती, एखाद्या व्यक्तीला शुद्ध करून घेण्यासाठी.

३. जेव्हा शनी महाराज धर्म-स्थानी आले, तेव्हाच सोहमचे धार्मिक स्थळांना भेटी देणे सुरु झाले. देवाचा आशीर्वाद मिळून, सोहमची पापं आता नष्ट होऊ लागली होती.

तसेच,

४. शनी महाराज वास्तवाची जाणीव करून देतात. शनी महाराजांने छुप्या शत्रूंना समोर आणले होते.

शनी महाराज, सोहमला पळवून पळवून देवाचे दर्शन देत होते. हळू हळू पवित्र करून घेत होते.

ज्यांच्या कुंडलीत लग्नगृहिचा स्वामी, दशम स्थानी उच्चेत विराजमान असतो. त्यांना वयाच्या पंचविसाव्या वर्षीच गंगेत स्नान करण्याचे भाग्य मिळते, असे म्हणले जाते. शनी महाराजच सोहमच्या कुंडलीत लग्नगृहीचे स्वामी होते. आणि तेच, दशम स्थानी म्हणजे तुळेत, उच्चस्थानी विराजमान होते. सोहमला त्यांच्या साडे-सातीमध्ये देवाचे आशीर्वाद प्राप्त होऊ लागले होते.

बहुतेक, "आपली साडे-साती चालू असल्यामुळेच एवढे सगळे शत्रू निर्माण झाले". असे सोहमला वाटू लागले. पण तसे नसते, शत्रू आपणच आधीपासूनच निर्माण केले असतात. कोणी समोरासमोर युद्ध करते आणि कोणी पडद्यामागून. तर हे सगळे शत्रू पडद्यामागुनच लढत होते. कोणीही थेट समोर नव्हते. अश्या सगळया शत्रूंना, शनी महाराजांने समोर आणले होते.

शनी महाराज वास्तवाचे दर्शन करवून देतात. सोहमला आत्तापर्यंत समजून चुकले होते की "कोणीतरी आपल्याविरुद्ध खूप मोठा प्लॅन करून आपल्याला एकटे पाडले आहे." पण शनी महाराजांने, सोहमला सावध करण्यासाठीच हे सगळे उघडकीला आणले असावे.

सोहमला हे कसे समजले? हे आता समजून घेऊ:

१. जेव्हा सोहम पहिल्या गर्ल-फ्रेंडची माफी मागायला गेला. तेव्हा काही मित्रांचे हात मोबाईलकडे गेले होते. आजकाल भरपूर पाळत ठेवण्याची साधने उपलब्ध झाली आहेत. उदा. घड्याळात कॅमेरा, पेनमध्ये मायक्रो फोन इत्यादी. तर सगळया मित्रांने जेव्हा दोन तीन बटणे दाबून फोन खिश्यात ठेवला, तेव्हा तो आवाज रेकॉर्ड करण्यासाठी ठेवला होता.

२. जेव्हा, सोहमने आपली प्रेम कहाणी त्याच्या बहिणीला सांगितली. तेव्हा दुसऱ्याच दिवशी ऑफिसमधल्या लोकांनी, कॅरेक्टर, कॅरेक्टर म्हणून त्रास द्यायला सुरुवात केली.

३. सोहम कोणत्या रस्त्याने जातो? कधी जातो? हे सगळे माहिती असल्यामुळे, तो जिथे जाईल तिथे रिपोर्टर पेरून ठेवले गेले होते. प्रत्येक ठिकाणी काहीना काही लिहून ठेवले होते.

४. सगळ्या ५-६ गर्ल-फ्रेंडसचे, एका मागोमाग एक फोन येऊ लागले होते. काही जणी खूप अपमानास्पद वागणूक द्यायच्या. जणू काही, कुठल्या गर्ल-फ्रेंडने कधी फोन करायचा? काय बोलायचे? हे सगळे ठरवून केले जात होते.

५. सोहम जे काही ऑफिसबाहेर बोलत होता, ते ऑफिसमधल्या लोकांना कळत होते.

६. सोहम बहिणीशी जे काही बोलायचा, तेही ऑफिसमध्ये कळत होते. एवढेच काय तर पायलला सुद्धा कळत होते.

७. मिनू शायनाच्या नावावरून चिडवत होती. मिनू ४-५ महिन्यांपूर्वीच गावावरून आली होती, तिला कशी काय शायनाबद्दल माहिती मिळू शकणार होती?

८. लांबच्या बहिणीसुद्धा नीताच्या नावाने चिडवत होत्या.

९. कुठेही इंटरव्यूला गेले, की तिथले सर "कॅरेक्टर" हा शब्द वापरून सोहमला दाखवून देत होते "गड्या, इथे तुझे काहीही काम होणार नाही".

सोहमला, यावरून थोडासा संशय आला होता. आणि हळू हळू, शनी महाराजांच्या प्रभावाने, "तो संशय खरा होता" हे समजले.

लहानपणापासूनचे काही मित्र, सगळ्या जुन्या गर्ल-फ्रेंड्स, ऑफिसमधले काही लोक, आत्ये-मामे बहिण, मामे-चुलत बहिण (यार ही नाती समजणे खूप अवघड होत चाललय). असे सगळेच मिळालेले पाहून, सोहमचा लोकांवरचा विश्वासच उडू लागला होता. अजूनही, काही विश्वास ठेवण्यासारखे मित्र होते आयुष्यात. पण, "कोण आपले?" आणि "कोण दुसरे?". हे ठरवायला त्यांची परीक्षा कोण घेणार? त्यापेक्षा सोहमने, सगळ्यांपासून लांबच राहणे पसंद केले.

तसे, शनी महाराजांची साडे-साती, आपल्याला माणसांची पारख करून देण्यासाठीच येत असते. कोण आपला शुभचिंतक आणि कोण आपला अशुभचिंतक? हे दाखवण्यासाठीच येते. आपण ज्यांना आपले म्हणतो, तेच जर आपल्यामागे शत्रूंशी मिळाले, तर कसे वाटते? हेच दाखवण्यासाठी साडे-साती येत असते.

जुन्या गर्ल-फ्रेंड्सचे वागणे एका अर्थाने ठीकच होते. कधी ना कधी त्यांना सोहममुळे त्रास झालाच होता. त्या सोहमला शत्रू मानत होत्या. त्यांना वाटत होते "सोहमने आपल्याला फसवले आहे".

पण, आता मोठे काम होते. ते म्हणजे "या सगळयांचा राग दूर करणे".

सोहम त्यांचा राग दूर करण्याचा अजूनच प्रयत्न करू लागला. सोहमला विश्वास होता "मुली धोका देत नाहीत." मुली थोड्या भावनिक असतात एवढेच." मुली सिन्सिअर असतात." जीव लावणाऱ्यासाठी जीव सुद्धा देतात"

सोहम हळू हळू त्यांना पटवून देण्याचा प्रयत्न करू लागला. पण सोहमची भाषा अशी होती, की तो जेव्हा जेव्हा काही समजावायला जायचा, तेव्हा तेव्हा अजूनच काहीना काही मोठा गोंधळ सुरु होत होता. सगळयांना अजूनच राग येत होता. पुन्हा सोहमला सुद्धा राग यायचा, आणि मागच्या सगळया प्रयत्नांवर पाणी फिरले जायचे.

**१७. आत्म्यांचे सोहमशी संपर्क साधणे, भीतीदायक स्वप्नांचा अर्थ, धोक्याची सूचना मिळणे, सलमान खानची एन्ट्री, भेट द्वारकेची माहिती.**

अशातच सोहमला अशी कोणती तरी व्यक्ती मित्र / मैत्रीण म्हणून मिळाली. जी, सोहमच्या बाजूने सगळयांना पटवून देऊ लागली. "ती व्यक्ती कोण?" हे सोहमला कधीच कळले नाही. पण, ती व्यक्ती एकदम भारी होती. ती व्यक्ती साक्षात कृष्णच होती. हळू हळू सगळया मुलींना त्या व्यक्तीने पटवून दिले की "सोहम वाईट नव्हता".

सोहम मागे एकदा देवाला म्हणाला होता "देवा सगळया शत्रूंना माझे मित्र करून टाक." हळू हळू आता सगळयांचा राग थंड होऊ लागला होता. सगळे खरेच, आता पुन्हा मित्र होऊ लागले होते. देवाने सोहमचे हे मागणेही ऐकले होते.

उलट, सगळया जुन्या मैत्रिणी आता, याची आणि मानसीची भेट करून देण्यासाठी प्रयत्न करू लागल्या होत्या.

("आम्ही तुझी आणि मानसीची भेट करून देण्याचा प्रयत्न करत आहोत" हे काही, त्यांने सोहमला सांगितले नव्हते. आणि, त्यांचे सोहमशी पुढे कधीच बोलणेसुद्धा झाले नव्हते. पण, काही गोष्टी विना बोलता समजून घेतल्या जात असतात.)

सोहम ज्यांना मानसीचा बॉय-फ्रेंड समजत होता, ते सुद्धा आता सोहमची आणि मानसीची भेट घडवून देण्यासाठी प्रयत्न करू लागले होते.

अशातच सोहमला एस.एम.एस आला "मित्रा, मी तुझ्या 'X" या व्यक्तीला आता शोधून शोधून थकलो आहे. तिला विसरून जा"

संध्याकाळीच बहीण म्हणाली "तू घाबरू नकोस, ती येईल." आधीतर सोहमला प्रश्न पडला "हिला कसा काय कळला माझ्या मोबाईलवरचा एस.एम.एस?" विचार केल्यावर सोहमला समजले "म्हणजे माझा

मोबाईल हॅक करणाऱ्यांपैकी ही सुद्धा एक होती. म्हणूनच, तिला माझी सगळी गोष्ट माहिती होती." पण आता, ती मित्र झाली आहे म्हणल्यावर विषय वाढवून काही फायदा नव्हता.

सोहमसारखेच, ज्या व्यक्तींना टोर्चर केले गेले होते, ज्यांना मानसिक त्रास दिला गेला होता. आणि, त्यांने या भीतीने आत्महत्या केली होती. असे काही आत्मे सुद्धा आता सोहमशी लिहून संपर्क साधू लागले होते. गाडीवरून जाताना, काही दगडांवर लिहिलेले आढळायचे "आम्हालाही असाच मानसिक त्रास दिला गेला होता."

पण, "हा आभास होता, की खरेच काही लिहिलेले होते?" हे समजून घेण्यासाठी, दुसऱ्या दिवशी सोहम त्याच ठिकाणी परत जायचा. पण, दुसऱ्या दिवशी ते लिहिलेले वाक्य गायब झाले असायचे. असो, सगळे आत्मेसुद्धा सोहमला मदत करण्यासाठी पुढे आले होते.

सोहमला वेगळी वेगळी भीतीदायक स्वप्न पडू लागली होती. "अनोळखी व्यक्ती कोणाला तरी मारताना, अंधाऱ्या खोलीत डांबून ठेवताना आपण पहात आहोत" असे सोहमला स्वप्नात दिसू लागले होते. म्हणजे, हे आत्मे सोहमला स्वप्नातून संदेश देत होते "आमचा सुद्धा असाच छळ झाला होता."

सोहमला वेगळे वेगळे आवाज सुद्धा ऐकू येऊ लागले होते. ते आवाज म्हणायचे "आम्ही तुझ्या सोबत आहोत. आम्हालाही असाच त्रास दिला गेला होता" तूच आमची सुटका करू शकतोस, आम्हाला मदत कर".

गाडीवर जाताना, पुढे काहीतरी धोका असण्याची सूचना त्याला आधीच मिळू लागली होती. एकदा एका माणसाच्या टी-शर्ट वर लिहिले होते "मृत्यू वरून येतो आहे."

पण त्याचा अर्थ काही सोहमला त्या वेळेस समजला नाही. "कदाचित, हा सुद्धा काहीतरी भास असेल". असे समजून सोहमने दुर्लक्ष केले.

पण पुढे गेल्यावर, रस्त्यात विजेची तार डोक्याच्या उंचीवर लटकलेली आढळली. सोहम त्या तारेखालूनच गेला. पण, नंतर समजून आले "विजेची तार मृत्यू बनून आली होती. आणि देवाने वाचवले.

रस्त्यात लघु शंका करण्यासाठी सोहम अश्या ठिकाणी थांबू लागला होता, जिथे काही ना काही संदेश मिळत होता. एकदा सनी देवलच्या "सलाखे" सिनेमाची सी.डी. सापडली. सिनेमा पाहताना समजले, त्यामध्ये अनुपम खेर यांने सनी देवलच्या वडिलांची भूमिका केली आहे. सिनेमात, त्यांनासुद्धा असाच मानसिक त्रास दिला जात असतो.

तसेच, आत्तापर्यंत पाळलेल्या मांजरांचे आत्मेसुद्धा, सोहमच्या मदतीसाठी देवानेच पाठवले होते.

दरम्यान सोहमला "भगवदगीता" वाचण्याची बुद्धी झाली. कृष्णाने अर्जुनाला गीतेत म्हणले आहे की "तू काय आणले होतेस? जे तू गमावण्याच्या भीतीने युद्ध करायला टाळाटाळ करतो आहेस? उठ, युद्ध कर, या सगळयांचे मरण अटळ आहे. तू युद्ध नाही केलेस. तरी वेळ आल्यावर, इतर कोणाच्यातरी हातून हे मरणारच आहेत. तू फक्त निमित्तमात्र आहेस. जोपर्यंत तू स्वत:ला कर्ता मानशील, तोपर्यंत तुला कर्माची फळ भोगायला लागतील. मी यांना आधीच मारले आहे, तू फक्त निमित्त होऊन बाण चालव. मिटते फक्त शरीर, आत्म्याला कोणी मारू शकत नाही. तू ज्याला मृत्यू समजतोस, तेच खरे जीवन आहे. सगळे मला अर्पण कर आणि युद्ध कर."

हे ऐकून अर्जुन युद्ध करायला तयार झाला.

तर, सोहम आता अर्जुन झाला होता. टी.व्ही वर सुद्धा, महाभारत मालिकेमध्ये हाच प्रसंग वारंवार दिसू लागला होता. अगदी, अर्जुनाप्रमाणेच सोहमचे सुद्धा आयुष्य घडू लागले होते.

पण, सोहमने विचार केला "देवा, मी ब्राम्हण आहे. मी क्षत्रिय नाही. युद्ध करणे हे माझे काम नाही". तेवढ्यात, समोर टी.व्ही मध्ये कर्णाच्या मृत्यूचा प्रसंग घडत होता.

कर्णाचे गुरु साक्षात परशुराम. त्यांने, आई-वडिलांना झालेल्या त्रासाचा राग आल्यामुळे, कितीतरी वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय केली होती. परशुराम सुद्धा ब्राह्मणच होते की. परशुरामांने ठरवले होते "मी माझी विद्या फक्त ब्राम्हणांनाच शिकवीन." पण कर्ण, ब्राम्हण नसतानाही, ब्राम्हणाचा वेश घेऊन, परशुरामांना फसवून, त्यांच्याकडून सर्व अस्त्र-विद्या शिकला. कालांतराने, परशुरामांना कर्णाची चलाखी समजून आल्यावर त्यांनी कर्णाला श्राप दिला "ऐनवेळी तुझी विद्या तुझा घात करेल. आणि तुझा मृत्यू होईल".

आणि तसेच, महाभारताच्या युद्धात, ब्रम्हास्त्र चालवण्याच्या वेळेसच, कर्णाच्या रथाचे चाक जमिनीत फसते. आणि, ब्रम्हास्त्र चालवण्याच्या मंत्राचा सुद्धा विसर पडतो.

अर्जुन कृष्णाला म्हणतो "देवा, हा नि:शस्त्र आहे. रथातून खाली सुधा उतरला आहे. याला मारणे योग्य ठरणार नाही".

तेव्हा कृष्ण अर्जुनाला पुन्हा एकदा समजावतो "जेव्हा तुझा पुत्र अभिमन्यू एकटा होता, नि:शस्त्र होता. तेव्हा याच कर्णाने, सगळया कौरवांसोबत, अगदी मजा घेत तुझ्या मुलाचा वध केला होता. हे तू विसरलास वाटत?" उठ, बाण चालव आणि कर्णाचा वध कर."

अशाप्रकारे, अर्जुन बाण चालवतो आणि कर्णाचा मृत्यू होतो.

तर, जेव्हा सोहम देवाला म्हणत होता "देवा, मी ब्राम्हण आहे. मी क्षत्रिय नाही. युद्ध करणे हे माझे काम नाही". तेव्हाच, समोर टी.व्ही मध्ये कर्णाच्या मृत्यूचा प्रसंग घडत होता. सोहम पेपर वाचता वाचता

टी.व्ही पहात होता. पेपर मध्ये लिहिले होते "उठा, परशुराम बना". सोहमला आता परशुराम बनायचे होते. पण, त्याच्याकडे ना अस्त्र होते, ना अस्त्र-चालवण्याची विद्या होती.

तेवढ्यात आई म्हणाली "सोहम दूध आणतोस का रे?"

आत्ता सोहम परशुराम झाला असल्यामुळे, तेवढ्यापुरता मातृभक्त झाला होता.

सोहम अगदी विनम्रतेने म्हणाला "लगेच आणतो आई". (आईने सुद्धा विचार केला असेल, "हा कधीपासून पहिल्याच हाकेत ऐकायला लागला?")

सोहम दूध आणायला गेला. तेवढ्यात, समोर एक ट्रक येऊन थांबला. ट्रकवर लिहिले होते "शब्द हेच शस्त्र." म्हणजे, देवाने सोहमला दाखवले होते "जरी तू ब्राम्हण असलास आणि तुझ्याकडे अस्त्र-शस्त्र नसली, तरीही तू तुझ्या शब्दांने शत्रूला हरवू शकतोस."

आता देव, सोहमला कधी अर्जुन बनवत होता तर कधी परशुराम. त्याच्याकडे जरी शारीरिक नुकसान करणारे शस्त्र नसले, तरी देवाने त्याला शब्दरूपी शस्त्र देऊन परशुराम बनवले होते.

देवाला, सोहमला या संकटातून वाचवायाचे होते. सोहम मागे देवाला म्हणाला होता "देवा, सगळयांचे चांगले कर." सगळयांना शिक्षा करून फायदा होणार नव्हता. देवाला सगळयांचे चांगलेच करायचे होते.

सोहम त्यांच्याबद्दल चांगला विचार करतो, हे त्यांना माहिती नसल्यामुळे त्रास देणे सुरूच होते. पण, सोहमचा कृष्ण सुद्धा कमी नव्हता. देवाला सगळयांचे चांगले करायचे होते. पण, सोहमला होणाऱ्या त्रासातून त्याला वाचवायचे सुद्धा होते. अशी कोडी सोडवण्यात कृष्ण किती पटाईत आहे, हे सगळयांनाच माहिती आहे.

देवाने सोहमच्या शत्रूंना घाबरवायला सुरुवात केली. लोक सोहमला जश्या प्रकारे त्रास देण्याचा विचार करायचे, तेच त्यांच्यासोबत घडू लागले होते. म्हणजे, जर कोणी सोहमच्या कामाच्या फाईली लपवायचा विचार केला, तर त्यांच्याच फाईली गायब होऊ लागल्या. सोहमला कोणी टोचून बोलायचा विचार केला, तर दुसरेच कोणीतरी त्या व्यक्तीला टोचून बोलू लागले. कोणी सोहमचे ई-मेल अकाऊंट हॅक करण्याचा प्रयत्न केला, की त्यांचेच ई-मेल अकाऊंट हॅक व्हायचे.

आता सोहमला "शब्द हेच शस्त्र" या वाक्याचा अर्थसुद्धा कळू लागला होता.

जसे बाबासाहेब आंबेडकर, भारताचे कायदेपंडित म्हणून ओळखले जातात. त्यांने घटनेत लिहून ठेवले आहे "१०० दोषी लोकांना सोडायला लागले तरी चालेल. पण एकही निर्दोष व्यक्तीला शिक्षा होता कामा नये."

सोहमचे सुद्धा हेच तत्व होते. सोहम विचार करायचा "आपल्याकडे कोणाबद्दलही ठोस पुरावा

नाही. जर ते निर्दोष असतील, तर त्यांना शिक्षा करून काहीच फायदा नाही". असेही, आपण काही न्यायाधीश नाहीत, की आपण कोणालाही शिक्षा करू शकुत. भावनेच्या भरात आपण एखाद्याला श्राप द्यायचो, आणि नेमका तो निर्दोष असला तर? केवढे मोठे पाप होईल आपल्या हातून. त्यापेक्षा देवालाच खरे खोटे पाहू दे" असे म्हणून सोहम सगळे देवालाच सांगू लागला होता.

दुसऱ्या दिवशीच, ऑफिसमधली एक व्यक्ती म्हणाली "अरे सोहम, जर तुझ्याकडे पुरावा नसेल, तर तू काय करू करणार?" या व्यक्तीला सुद्धा सोहमचे मन वाचता येत होते तर. पण, त्याने कधीही सोहमला त्रास दिला नव्हता. सोहमचा त्याच्यावर थोडासा विश्वास होता.

सोहम म्हणाला "मी त्यांना असा श्राप देईन, ज्याने देवच त्यांचा न्यायनिवाडा करेल" मी म्हणेल "जर मी प्रामाणिक असेल, तर मी टिकेल. आणि जर तू प्रामाणिक असशील, तर तू टीकशील". शब्द कसे योग्यप्रमाणे वापरायचे? हे आता सोहमला समजू लागले होते. यामुळे सोहमला, विनाकारण कोणाला श्राप देण्याचे दु:ख होणार नव्हते.

शब्दरूपी शस्त्राचा कसा वापर करायचा? हे आता सोहमला समजू लागले होते. देवाने त्याला परशुराम बनवून टाकले होते.

हेच नाही तर, त्याची गोष्ट सलमान खान पर्यंत सुद्धा पोचली होती. खुद्द सलमान खान सुद्धा आता सोहमच्या मदतीसाठी धावून आला होता. तसे सलमान खान मदत करण्यासाठी प्रसिद्धच आहे. त्याचे गाणे आठवते का ? "मै करू तो साला, कॅरेक्टर ढिला है." हे गाणेसुद्धा याच काळात आले होते. सलमान खान आणि सोहमचा काहीतरी आत्मिक संबंध होता. सोहमला ते हळू हळू समजणार होते.

प्रत्येक वेळेस कामासाठी बाहेर जावे लागले, की सोहम देवाचा नवीनच अनुभव घेऊन येऊ लागला होता.

असेच, पुन्हा एकदा ख्वाजांचे आणि ब्रम्हदेवाचे बोलावणे आले. या वेळेस, काहीही अडथळयाशिवाय, सगळी दर्शन व्यवस्थित पार पडली. गाडी शिवाजीनगरपर्यंत पोचली होती. साधारणपणे, पुणे स्टेशन यायला फक्त पाचच मिनिटे शिल्लक होती. सोहम देवाला मनात म्हणतच होता "देवा, यावेळेस तू काहीच अनुभव दिला नाहीस रे". डब्ब्यात गर्दी असल्यामुळे सोहम जनरल डब्ब्याच्या पायरीवर बसला होता. मागे दोन तीन माणस उभी होती.

गाडी शिवाजीनगर वरून निघाली आणि संचेतीच्या पुलाखालून जाऊ लागली. या ठिकाणी, रेल्वे रुळाच्या बाजूला राहणारे लोक शौचास बसतात. तर, असेच एक अल्लड, साधारणपणे १८-१९ वर्षाचा मुलगा, त्याचा शौचाचा कार्यक्रम संपवून उठलाच होता.

तेवढ्यात, ज्या डब्ब्याच्या पायरीवर सोहम बसला होता, तो डब्बा त्या मुलाच्या समोरून जाऊ

लागला. त्या मुलाने दगड उचलला. सोहम त्याच्यासमोर अगदी २-३ फुटांवरच बसला होता. त्या मुलाने, थेट तो उचललेला दगड सोहमच्या तोंडाच्या दिशेनेच भिरकावला. सोहमचे नशीब बलवत्तर होते. दगड सोहमच्या डोळयासमोरून थेट नाकाच्या बाजूने गेला. मागे बसलेल्या माणसाच्या गुढग्यावरच आदळला. त्या माणसाच्या गुढग्यातून भळा भळा रक्त वाहू लागले.

जर, हाच दगड सोहमच्या डोळयावर किंवा नाकावर लागला असता, तर सोहम थेट रेल्वेतून पडून खालीच पडला असता. कदाचित मेलासुद्धा असता.

या वेळेस, देवाने थेट पुन्हा एकदा सोहमचे प्राण वाचवले होते. त्याला नवीनच अनुभव दिला होता.

ज्यांच्या, इच्छा कर्म पूर्ण होतात त्यांना देव नवीन जन्म देतो किंवा मुक्ती देतो. कदाचित अजूनही, सोहमच्या काही इच्छा किंवा कर्म शिल्लक असावीत. म्हणूनच, देवाने त्याला पुन्हा एकदा वाचवले.

पुढचे काही दिवस, देवाचा हा अतिशय सुंदर अनुभव रंगवून रंगवून सांगताना सोहमच्या चेहऱ्यावरचे भाव बघण्यासारखे होते.

(याच काळात सोहम, मला ही गोष्ट लिहिण्यासाठी मनवण्याचा प्रयत्न करू लागला होता.)

असेच एकदा, चौथ्यांदा पुन्हा ख्वाजा नवाज शरीफ आणि ब्रम्हदेवाचे बोलावणे आले. अजमेर, पुष्कर, नाथद्वारा वरून, सोहम अहमदाबादला गेला. पूर्वी एक गुजराती कुटुंब शेजारी रहात होते. ते आता स्वत:च्या घरी अहमदाबादला रहात होते. सोहम, पूर्वी कधीतरी उधार घेतलेले ३००० रुपये परत करण्यासाठी त्यांच्या घरी पोचला. त्यांने काही पैसे घेतले नाहीत.

तिथून सोहम नाशिकला पोचला. त्र्यम्बकेश्वरचे दर्शन घेऊन, सोहम वणीच्या सप्तशृंगी देवीचे दर्शन घेण्यासाठी गेला. तिथून, शिर्डी आणि शनी शिंगणापूर करून, सोहम पुन्हा घरी पोचला. आता सगळया शक्तीपिठांचे दर्शन घेऊन झाले होते.

एकदा असेच, अजमेरवरून परत येत असताना सोहमच्या मनात आले "आपण द्वारकेला जाऊया". पण खिशात फक्त १००० रुपयेच शिल्लक होते. त्यापैकी ३०० रुपये अहमदाबादला पोचण्यासाठी खर्च झाले. सोहम अजमेरवरून अहमदाबादकडे निघाला. नुकतीच झोप लागली होती. तेवढ्यात, कसला तरी मोठा आवाज आला. गाडीची पुढची काच दगड लागल्यामुळे फुटली होती. सोहम जिथे झोपला होता, ते पहिलेच सीट होते. जोरजोराने येणारी हवा, थेट सोहमच्या अंगावरच येत होती. त्यामुळे रात्रभर सोहम झोपू शकला नाही.

दुसऱ्या दिवशी दुपारी राजकोटला जाण्यासाठी बस मिळाली. राजकोट पर्यंतचे भाडे २०० रुपये

होते.

संध्याकाळी ६-६.३० वाजता, राजकोटवरून द्वारकेला जाण्यासाठी बस मिळाली. राजकोटवरून द्वारकेचे भाडे १५० रुपये. म्हणजे आत्तापर्यंत ६५० रुपये खर्च झाले होते. फक्त ३५० रुपयांमध्ये, द्वारकेचे दर्शन करून पुण्याला येणे शक्य आहे का? नाही ना?.

सोहम कालची पूर्ण रात्र झोपला नव्हता. जेव्हा राजकोटवरून बस निघाली, तेव्हा सोहमच्या डोळयावर अनावर झोप येऊ लागली. अर्धा पेंगत, अर्धा झोपत कसाबसा सोहम वेळ काढत होता.

बस राजकोट वरून निघाली. सोहमच्या शेजारी, साधारणपणे ६० वर्षांची स्त्री येवून बसली. पुढे तिचे स्टेशन आल्यावर ती उतरून गेली. ती उतरल्यावर सोहमच्या लक्षात आले, ती तिचे घड्याळ बसलेल्या जागेवरच विसरून गेली होती. जवळ जवळ पुढचा एक तास, ते घड्याळ शेजारच्याच सीटवर पडून होते. १ तासाने हे सोहमला समजले. पण, ते घड्याळ आता परत करता येणार नव्हते. हे असे घड्याळ मिळण्याचा अर्थ काय होता?

तर, सलाखे नावाच्या सनी देवलच्या सिनेमामध्ये, अनुपम खेर त्याचे वडील असतात. काही गुंड त्यांना मानसिक त्रास देतात. शेवटी सनी देवलचे वडील आत्महत्या करतात. पण, आत्महत्या करण्याअगोदर ते सनी देवलला घड्याळ देतात आणि म्हणतात, "मला खूप मानसिक त्रास दिला गेला. याची आठवण, तुला हे घड्याळ नेहमी करून देत राहील". असेच घड्याळ सोहमलासुद्धा मिळाले होते. आजही हे घड्याळ, सोहमने घरातल्या देव्हाऱ्यात जपून ठेवले आहे.

पूर्वी जे आत्मे सोहमला मदत करत होते. त्यांपैकीच एक आत्मा, थेट शरीर धारण करून आज सोहमच्या शेजारी येऊन बसला होता. आणि घड्याळ सीटवर टाकून निघून गेला होता.

काही वेळाने सोहमला झोप लागली. जाग आली तेव्हा बस शेवटच्या स्थानकावर थांबली होती. दोन तीन उरलेले प्रवासी उतरत होते.

सोहमने एकाला विचारले -

सोहम - भाई साब, द्वारिका कब आयेगा?

भाईसाब - अरे भाई, द्वारिका तो पीछे छूट गया. लगभग ३५ कोंस होगा.

सोहम - तो अब मै द्वारिका कैसे जाऊ?

भाईसाब - देखो भैय्या, अब तो रात के ११ बज चुके है. तुम्हे कल सुबह ही कोई वाहन मिल जायेगा. तब तक आप, बाजुमें जो रेल्वे स्टेशन है, वही पर रुक जाओ.

झाले, भर रात्रीचा, निर्जन ठिकाणी सोहम एकटाच उरला होता. चालत चालत सोहम, शेजारी असलेल्या रेल्वे स्टेशनवर पोचला. रेल्वे स्टेशनचे नाव होते "ओखा".

"ओखा" हे भारताचे पश्चिमेकडचे शेवटचे रेल्वे स्टेशन आहे. इथून पुढे सगळा समुद्र सुरु होतो. समुद्रीमार्गे, २७० किलोमीटर वर पाकिस्तानमधले कराची हे शहर आहे.

सोहम आता कृष्णाच्या नगरीत, म्हणजे द्वारकेशेजारीच होता. कृष्णाच्या राज्यात होता. त्याला झोप का लागली? याचे कारण त्याला अजून समजायचे होते.

तर, स्टेशनवर तसे भरपूर लोक असल्यामुळे भीतीचे कारण नव्हते. पण, खिशात फक्त ३५० रुपये होते. पुढचा दिवस, सगळी दर्शने करून जेवण करायचे होते. परत पुण्याला यायचे होते. जवळ फार कमी पैसे होते.

बोलता बोलता सोहमला समजले, ओखावरून थेट मुंबईला रेल्वे जाते. जिचे तिकीट आहे, फक्त १७५ रुपये. म्हणजे, कृष्णाने परत जाण्याची सोय केली होती. पण रेल्वे निघते सकाळी ११.१५ वाजता. म्हणजे, द्वारकेला जायचे, कृष्णाचे दर्शन करायचे, आणि ११.१५ पर्यंत परत ओखाला पोचायचे होते.

सोहमला अजून एक गोष्ट समजली. ती म्हणजे, पहाटे ३ वाजता एक रेल्वे येईल. ती २० मिनिटात द्वारकेला पोचवेल. देवाने सोहमचे सगळे प्रश्न सोडवले होते. जर सोहमला झोप लागली नसती, तर फक्त ३५० रुपयात परत पुण्याला कसे जायचे? हे समजले नसते.

पहाटे ३ वाजता रेल्वे आली. पहाटे ३.३० वाजता सोहम द्वारका रेल्वे स्टेशनवर पोचला. जवळ फार कमी पैसे शिल्लक असल्यामुळे सोहम चालत चालत द्वारिकाधीश मंदिराकडे निघाला. जणू काही सुदामाच कृष्णाला भेटायला चालला होता. तसे, द्वारकेला जाणारा प्रत्येक जण सुदामाच असतो म्हणा. पण सोहम खरंच, खिशात पैसे कमी असताना निघाला होता.

सुदामा जेव्हा कृष्णाला भेटायला गेला होता, तेव्हा त्यालासुद्धा सोहमसारखीच झोप लागली होती. जेव्हा सुदामा जागा झाला, तो द्वारकेत होता. सोहमसुद्धा खरेच सुदामा वाटत होता.

४.३० वाजता सोहम मंदिरापाशी पोचला.

मंदिराच्या मागच्या बाजूला, गोमती नदी समुद्राला मिळते. म्हणजे, नदी आणि समुद्राच्या संगमावर सोहम पोचला होता. व्यवस्थित, नदी आणि समुद्राची पूजा करेपर्यंत ६ वाजले. मंदिर उघडले आणि, सोहमने अश्रुंने भरलेल्या नजरेने कृष्ण डोळयात साठवून घेतला. ११.१५ पर्यंत ओखाला पोचणे गरजेचे होते.

सोहम चालत चालत रुक्मिणीमंदिरापाशी पोचला. रुक्मिणी मातेचे दर्शन घेताना सोहमला समजले "जवळच महादेवाचे 'नागेश्वर' हे ज्योतिर्लिंग आहे". मनातून वाटले, "देवा अशी काही सोय कर, की मला नागेश्वराचे दर्शन होईल. गोपी तलाव पाहायला मिळेल. तुझी आणि सुदामाची भेट झाली, ते ठिकाण पहायला मिळेल."

देवाने हे सुद्धा घडवून आणले. शेजारीच द्वारीकादर्शन करवणारी बस उभी होती. ५० रुपयात नागेश्वर, गोपी तलाव, आणि भेट द्वारिका, असे दर्शन होणार होते. फक्त, वेळेत रेल्वे पकडून पुण्याला पोचण्याची जबाबदारी सोहमची होती.

तर असे सोहमने, गोपी तलावाचे, रुक्मिणी मातेचे, नागेश्वर महादेवाचे दर्शन घेतले, आणि भेट द्वारकेला निघाला. भेट द्वारका म्हणजे, कृष्णाची आणि सुदाम्याची भेट झाली ते ठिकाण. हेच ते ठिकाण, जिथे सोहम रात्री उतरला होता.

इथेच कृष्ण-सुदामा भेट झाली, म्हणून या जागेचे नाव 'भेट द्वारका'. तसेच, हे ठिकाण अशा ठिकाणी आहे, जिथे चारही बाजूने समुद्र, आणि मधेच बेटावर मंदिर आहे. म्हणून या जागेला 'बेट द्वारका' म्हणूनसुद्धा ओळखले जाते. इथे चारही बाजूने समुद्र असल्यामुळे, इथल्या लोकांचा मुख्य व्यवसाय म्हणजे "मासेमारी". पण या सगळयातही, तिथे अजूनही कृष्णाचे मंदिर टिकून आहे. मंदिराची परिस्थिती फारशी चांगली नाही.

आपण तिथे जे काही पैसे दानपेटीत टाकतो. त्यावरच, इथल्या मंदिरातल्या पुजारयांचे दैनंदिन आयुष्य चालते. मंदिराचे सगळे सण-वार, मंदिराचा सगळा खर्च याच पैश्यातून चालतो. आजूबाजूला सगळा मांसाचा, माश्यांचा वास येत असतो. पण तरीही, कृष्णासाठी आणि कृष्णामुळेच, काही लोक आजही तिथे टिकून आहेत.

जो कोणी "भेट द्वारकेला" जाईल त्याने मोठ्या मनाने, आणि आपल्या ऐपतीप्रमाणे इथे पैसे द्यावेत. "दान करावे" असे मी म्हणणार नाही. ज्याने दिले, त्याला कसले दान करायचे?

आणि हो, सुदामा कृष्णाला भेटण्यासाठी तांदूळ घेऊन गेला होता. जाताना, कमीत कमी मूठभर तरी तांदूळ न्या. इथे तीच प्रथा आहे.

बेट द्वारकेला जाण्यासाठी बोटनी जावे लागते. तर असे सोहमने, अगदी सुदामा बनून, बेट द्वारकेला कृष्णाचे दर्शन घेतले. बरोबर ११ वाजून १० मिनिटांनी, शेजारीच असणाऱ्या ओखा रेल्वे स्टेशनवर पोचला.

जेव्हा सोहम पुण्यात परत पोचला, तेव्हा त्याच्या खिशात अजूनही ५० रुपये शिल्लक होते. देवाची माया अजब असते.

१. सोहम अजमेरवरून निघाला तेव्हा गाडीची काच फुटली. सोहमला झोपायला मिळाले नाही.

२. राजकोटवरून द्वारकेला येताना, शेजारी एक महिला बसली. ती घड्याळ विसरून गेली.

३. द्वारका येण्याच्या अगोदर सोहमला झोप लागली. सोहम, थेट ओखा या जागी उतरला.

४. खिशात फक्त ३५० रुपये असताना, पुण्याला जाण्याची सोय कृष्णानेच केली.

५. सोहम फक्त द्वारिकाधीशाचे दर्शन घ्यायला गेला होता. पण, रुक्मिणी माता, गोपी तलाव, नागेश्वर महादेव आणि भेट द्वारकेचे दर्शन सुद्धा मिळाले.

६. पुण्याला पोचला तेव्हा, खिशात ५० रुपये शिल्लक होते.

वाचकांनो, देवाच्या कृपेचा अनुभव घेऊनच पहा.

गेल्या सहा महिन्यात सोहम, पाच वेळा अजमेरला, पुष्करला आणि नाथद्वाराला जाऊन आला होता.

असे म्हणले जाते की "७ वेळा जो कोणी अजमेरला जाऊन येतो, त्याला एक मक्केच्या यात्रेचे पुण्य मिळते". सोहमचे आता फक्त दोन वेळाच अजमेरला जाणे बाकी राहिले होते.

पुण्यात आला रे आला, की सोहमला दिल्लीला जायचा योग आला. काम फार तातडीचे होते. सोहमसाठी, यायचे आणि जायचे विमानाचे तिकीट पाठवले गेले. सोहम विमानाने दिल्लीला पोचला. तिथून रूडकीला जायचे होते. सोहमसाठी कार पाठवली गेली होती. ६ तासात सोहम रूडकीला पोचला. रूडकीवरून हरिद्वार जवळच आहे. माणूस हरिद्वारला जाऊन आला, की जवळ जवळ तो "हरीकडेच जाऊन

आला" असे समजले जाते.

तर, दुसऱ्या दिवशी काम संपवून, सोहमने हरिद्वारला पहिल्यांदाच गंगेत अंघोळ केली. पुढे मनसा देवीचे दर्शन घेऊन, तो पुन्हा हॉटेल वर परत आला.

तिसऱ्या दिवशी ऋषिकेशला गेला. रामझूला, लक्ष्मणझुला पाहिले, भरपूर मंदिरांचे दर्शन घेतले. ऋषिकेशमध्ये खूप मंदिरे आहेत. इतकी, की दर्शन घ्यायला चार दिवससुद्धा पुरणार नाहीत.

उत्तराखंड या राज्याला देवभूमी असे म्हणले जाते. ऋषिकेश वरून अजून वरच्या दिशेला गेले असता, बद्रीनाथ, केदारनाथ हे धाम लागतात.

पुढच्या दिवशी संध्याकाळी परतीचे विमान होते. परतीचे विमान दिल्लीला जाऊन पकडायचे होते. बद्रीनाथ, केदारनाथला जाणे काही शक्य नव्हते. मध्ये जवळ जवळ २४ तास होते. आता या २४ तासांचा उपयोग कसा करायचा? दिल्लीवरून मथुरा जवळच आहे. सोहम थेट मथुरेला निघाला. पहाटे पहाटे मथुरेला पोचला. यमुनेतच अंघोळ वगैरे उरकली. कृष्ण जन्म-भूमी, वृंदावन, कंस वधाचे ठिकाण, द्वारकाधीशाचे मंदिर, असे दर्शन केले.

साक्षात राधेने बोलावल्याशिवाय आपण वृन्दावानला जाऊ शकत नाही.

ज्या महिलांना सांभाळणारे कोणी नाही. ज्या महिला, त्यांच्या आयुष्यात एकट्या पडल्या आहेत. अश्या महिला मथुरा आणि वृन्दावनात येऊन रहातात. इथल्या मंदिरांमध्ये, अश्या एकट्या महिलांची सगळी सोय केली जाते. या सगळया महिला दिवसभर देवाचे नाव घेत बसतात.

आपण जे पैसे इथे मंदिरात टाकतो. त्या पैश्यातून, या सगळया महिलांची जेवणाची, कपड्यांची, वगैरे सोय केली जाते.

तर, जे कोणी मथुरा-वृंदावनला जातील, त्यांने मोठ्या मनाने, ऐपतीप्रमाणे, जमतील तेवढे पैसे इथे द्यावेत.

तिथून सोहम, दिल्लीला पोचला. तिथून परतीचे विमान पकडून पुणे गाठले.

**१८. सोहमचे पहिले लग्न, राधेची भेट, ९ जुन्या गर्ल-फ्रेंड्स = नव दुर्गा, सीतेची भेट, १३ब चा उलगडा, श्री स्वामी समर्थांचे आगमन, सोहमचे अक्कलकोट्ला जाणे, शनी महात्म्य, सोहमचे संमोहनातून बाहेर निघणे, स्वसंमोहन, (self hipnotization), सहस्त्रनामाचे महत्व, करोडपती सोहम, ऑफिसमधले देव, गुरु महादशा, गुरूंचे आगमन, बालाजीचे लग्न, कालहस्तीची माहिती, शेवटी एकदाची मानसीशी भेट होणे, लग्न टाळण्यासाठी शनी महाराजांने संकेत देणे, सिद्धिविनायक, बालाजीचे लग्न, घर नंबर १३, सोहमचे दुसरे लग्न.**

परत आल्या आल्याच सोहमचे लग्न ठरले. मुलगी चांगली एम.एस.सी शिकली होती. एका कॉलेजमध्ये प्रोफेसर म्हणून कामाला होती.

सोहमला फक्त मानसीसोबतच लग्न करायचे होते. पण घरचे म्हणायचे "तू सगळ्या मुलींमध्ये दोषच काढतोस, तुला कोणतीही मुलगी आवडत नाही." आईचेसुद्धा वय झाले होते. घरात, कोणीतरी कामाची जबाबदारी घेणारे यायला हवे होते. "मानसीचे आपल्यावर प्रेम आहे", हा केवळ एक भास वाटत होता. साक्षात प्रेमाच्या देवीचे, राधेचे दर्शन घडूनही मनामध्ये आत्मविश्वास येत नव्हता. शेवटी सोहमनेसुद्धा लग्नाला होकार दिला.

गणपतीचे दिवस जवळ आले होते. वेगवेगळी गणेश मंडळे, ढोल-ताशा वाजवायची तालीम करू लागली होती. नेमके, सोहमचे लग्न ठरले त्याच दिवशी, शेजारच्या गणेशोत्सव मंडळाने ढोल-ताशा वाजवण्याची तालीम सुरु केली.

मागे सोहम देवाला म्हणाला होता "देवा, माझे लग्न ठरले, तर मी ढोल वाजवून नाचेन". देवाने सोहमचे हे मागणे सुद्धा पूर्ण केले होते. जणू काही गणपती स्वत:, सोहमचे लग्न ठरल्याचा आनंद ढोल वाजवून व्यक्त करत होता.

पण सोहम दु:खी होता. त्याला त्याच्या मानसीसोबतच लग्न करायचे होते. पण घरच्यांना काय सांगणार? "मला अशा मुलीसोबत लग्न करायचे आहे, जी गायब आहे, जी सापडतच नाही." निव्वळ मूर्ख ठरला असता सोहम.

पण, थेट काहीही न सांगता सोहम घरी म्हणाला "आई, मला हे लग्न नाही करायचे. पण तुम्ही ठरवले आहेच, तर उद्या साखरपुड्याला चमत्कार पहा". सोहमने पुडी सोडून दिली होती.

कदाचित, आपल्या आयुष्यावर पुस्तक लिहिण्याचा विचार, सोहमच्या मनात त्या दिवशी पहिल्यांदाच आला असावा. सोहम चुलत भावाला म्हणाला "मी पुढे जाऊन असे पुस्तक लिहील, जे रामायण आणि महाभारताचे कॉम्बिनेशन असेल. या पुस्तकाच्या विक्रीतून मिळणाऱ्या पैश्यापैकी, ४५% रुपये आपण भारतातल्या मंदिरांमध्ये देऊन टाकू. या पैश्यातून, मंदिराचे कार्यकारी लोक येणाऱ्या यात्रेकरूंसाठी चांगल्या सुविधा करतील.

त्यात, तिरुपती बालाजी मंदिरातसुद्धा काही रुपये देऊ. बालाजीने, त्याच्या लग्नाच्यावेळी कुबेराकडून भरपूर कर्ज घेतले होते. आपलाही थोडासा हातभार लागेल देवाचे कर्ज फेडण्यात.

आपण माणूस आहोत. पण, माणूस हा एकच असा प्राणी आहे. ज्याने, इतर सगळया प्राण्यांचे जगणे हराम करून ठेवले आहे. आपण आपली लोकसंख्या वाढवतो, प्राण्यांची जंगलं हडप करतो. कुत्रे, मांजरं, गाय, बैल, कोंबड्या, त्यांची अंडी, म्हणजेच, त्यांची पिल्ल सुद्धा आपण मारून टाकतो. स्वत:ची शरीर वाढवण्यासाठी आपण त्यांचे मांस खातो. आपण समुद्रसुद्धा सोडला नाही. भारतात म्हणे, एका दिवसाला शेकडो टन मासळी खाल्ली जाते. आपण पक्ष्यांनासुद्धा सोडले नाही. शहामृगाचे मांस, म्हणे या रोगावर चांगले आहे, कबुतर किती चविष्ट लागते चवीला, मोर खाल्लाय का कधी? अशी वाक्य, आपण प्रत्येक हॉटेलमध्ये ऐकतो.

अरे माणसांनो जागे व्हा. मांस खाऊन मांस वाढत नसते.

तर, आपण प्राणी-पक्ष्यांसाठी काही तरी करू. आपल्याकडे अनुभव नाही. पण पैसा असेल. आपण उरलेल्या रकमेतला मोठा भाग, प्राण्यांसाठी काहीतरी करण्यात खर्च करू. जमीन विकत घेऊन त्यावर फक्त झाडेच लावू.

देव तर माझ्याकडून हे करवून घेईलच. पैसा कमी पडलाच, तर बुद्धी तर दिली आहे ना देवाने?. पुन्हा एखादे पुस्तक लिहू.

१. माणसांनो, जागे व्हा.
२. जरा चिमण्यांना, तांदळाचे दाणे टाकून पहा.
३. त्यांचा चिवचिवाट ऐकण्याची मजा घ्या.
४. त्यांची भांडणे पहा. खायला देण्यासाठी त्या आपल्याशी कश्या भांडतात? ते पहा.
५. चिमण्या, कबुतरे, कावळे, जेवण दिसताच कसे एकमेकात वाटून घेतात? ते पहा.
६. कुत्रे, मांजरांना न मारता, त्यांना पोळीचा एखादा तुकडा टाकून पहा.
७. कुत्रे किती इमानदार असते? हे समजून पहा.
८. जरा माश्यांना अन्न देऊन पहा.
९. झाडांवर, मुलांसारखे प्रेम करून पहा.
१०. गायीला अन्न देऊन पहा.

१ १. गायीच्या पिल्लाला, तिच्या दुधापासून वंचित ठेऊ नका.

१२. गायीच्या दुधाचा वापर, फक्त पैसे मिळवण्यासाठी करू नका. जास्त दूध मिळावे म्हणून गायीच्या पिल्लांना मारू नका.

१३. गाय दूध देईनाशी झाली की तिला मारून टाकू नका. तिला कसायला विकू नका.

१४. गाय-बैलाचे मांस खाऊ नका.

१५. म्हैस, शेळी, बकरी, यांना सुद्धा मारू नका.

१६. माणसासाठी प्रतिजैविके तयार करता यावीत म्हणून, घोड्यांवर विष-प्रयोग करू नका.

नाहीतर, गाठ रामाशी आहे.

असो, साखरपुडा श्रीकृष्ण जन्माष्टमिच्या दुसऱ्या दिवशी होता. साखरपुडा झाल्यावर, जेवताना भाजी विटलेली होती. नवऱ्या मुलासमोर रांगोळी काढली नव्हती. जेवताना नवऱ्या मुलासमोर फुले मांडली नव्हती. मुलीच्या बहिणीने, सोहमसमोर फुले मांडण्यासाठी सोहमला घातलेला हारच तोडला आणि फुले जमवली.

सोहम म्हणाल्याप्रमाणे चमत्कार झाला होता. पण, छोटीशी चूक झाल्यामुळे, अजून काही साखरपुडा तुटला नव्हता.

रोज संध्याकाळी शीतल (जिच्याबरोबर साखरपुडा झाला ती मुलगी) सोहमला फोन करायची. असेच एकदा बोलता बोलता ती म्हणाली -

शीतल - तुम्हाला माहिती आहे का, आमच्या मैत्रिणी तुम्हाला पुंडलिक राव म्हणून चिडवतात. कारण तुम्ही आईच्या शब्दाबाहेर जात नाहीत.

सोहम - हो का?

शीतल - तुम्ही माझ्याशी लग्नाला होकार का दिला?

सोहम - कारण, एक तर तू शिकलेली आहेस. हुषार आहेस. घर सुद्धा सांभाळू शकशील, असे वाटले म्हणून.

शीतल - मी तुमच्याशी लग्नाला होकार का दिला माहिती आहे?

सोहम - नाही, तूच सांग.

शीतल - तिने थेट खोकायलाच सुरुवात केली. (आठवा, मागे एकदा सोहमने कॉलेजमध्ये असताना मानसीला मेसेज पाठवला होता "तुला कोरडा खोकला झाला आहे. गुळ आणि हळद मिसळून, गोळया बनवून खा.

"मी तुझे मेसेज वाचते" हे दाखवण्यासाठी मानसीने, भर वर्गात, जोरजोरात खोकून खोकून इशारा केला होता).

म्हणजे, एकतर शीतलसुद्धा, सोहम आणि मानसीची भेट व्हावी म्हणून प्रयत्न करत होती. किंवा, मानसीनेच, सोहम आणि शीतलचे लग्न जमवायला मदत केली होती.)

पण हे कळणार कसे? लगेच समजले.

शीतल पुढे म्हणाली - पण, माझे काही नुकसान झाले नाही पाहिजे.

(याचा अर्थ असा होता की, "मला माहिती आहे, तुझे मानसीवर प्रेम आहे. मी लग्न मोडायला तयार आहे. पण आमचाही खूप खर्च झाला आहे. तसेच, साखरपुडा मोडला तर माझ्यावरसुद्धा ठरलेले लग्न मोडल्याचा कलंक लागेल. तर, यामुळे माझे काही नुकसान नाही झाले पाहिजे.).

आता, जिच्याशी लग्न ठरले आहे तीच मुलगी, सोहमची आणि मानसीची भेट करून देण्याचा प्रयत्न करत होती. तिला मदत करण्यासाठी कोणी पटवले असेल? तर, सोहमच्या जुन्या गर्ल-फ्रेंड्सने. यांच्यात हा बदल कोणी घडवून आणला? हे सोहमला अजूनही समजत नव्हते.

सोहमच्या सगळया जुन्या ९ गर्ल-फ्रेंड्सना वाटत होते "सोहमचे आणि मानसीचे लग्न व्हावे". मानसीशी पुन्हा भेट करून देण्यासाठी, जुन्या ९ गर्ल-फ्रेंड्स नव-दुर्गांच्या रुपात सोहमला मदत करत होत्या. सगळे मित्र, मामे-बहिण, सुद्धा प्रयत्न करू लागले होते. "तिची भेट होणारच" असे वाटू लागले होते.

बालाजीला जाऊन जाऊन सोहमचे आयुष्यसुद्धा बालाजी सारखेच झाले होते. जसे, महालक्ष्मीने स्वत: रामाचे आणि वेद्वतीचे लग्न ठरवले होते. ती स्वत:, बालाजी आणि पद्मावतीच्या विवाहाला उपस्थित राहिली. तसेच, जिच्याशी लग्न ठरले आहे ती मुलगी स्वत:, आणि जुन्या गर्ल-फ्रेंड्स सुद्धा, सोहमची आणि त्याच्या मानसीची भेट घडवून देण्यासाठी प्रयत्न करू लागल्या होत्या.

पुढे काही दिवसांने, खरेच हे ठरलेले लग्न मोडले गेले. सोहमचा पहिला साखरपुडा मोडला गेला.

अजून एक कलंक लागला सोहमवर. घरचे अजूनच घाबरले.

सोहमसुद्धा विचार करून करून थकला होता "एक तर, मानसी भेटेल या विश्वासावर, ठरलेले लग्न मोडले. झालेला साखरपुडा मोडला. मानसी येईल का नाही? याची खात्री नव्हती. वय वाढत होते. आईसुद्धा थकली होती. मानसी कुठे आहे? हे माहिती नव्हते. ती समोर का येत नाही? हे माहिती नव्हते. तिचा मोबाईल का बंद आहे? हे कळत नव्हते.

"तिचाही ई-मेल हॅक झाला असेल, तिलाही टोर्चर केले गेले असेल" असे वाटत होते." तिची काळजी वाटत होती. ती कुठे असेल? कशी असेल? काय करत असेल? तिचे प्रेम असूनही भेटत का नाही? समोर का येत नाही? माझ्यावर विश्वास नव्हता का? भेटू शकत नव्हती, तर कमीत कमी सांगायचे तरी होते. एकदा तरी भेटायचे होते. सरळ सरळ लढाई करून आपण जिंकलो नसतो का? आपण भेटू नसतो शकलो का? ती खरेच कधी येईल का? नाही आली तर?"

"ती नाही आली तर आपल्याशी कोण लग्न करेल? कसे होईल?" असे प्रश्न सोहमला पडू लागले होते.

दुसऱ्या दिवशीच ऑफिसमधले साहेब म्हणाले "मित्रा, तुला काहीही अशक्य नाही." सोहमला त्यांच्या बोलण्याचा अर्थ कळला होता. पण, हे सगळे सोहमने केलेच नव्हते. केले कोणीतरी वेगळयाच व्यक्तीने (कृष्णाने) होते. आणि, नाव मात्र सोहमचे झाले.

दरम्यान, मागे सोहमने ज्या कॉलेजमध्ये शिक्षकाच्या नोकरीसाठी मुलाखत दिली होती. तिथून फोन आला. (याच कॉलेजमधले सर म्हणाले होते "शिक्षक उत्तम चारित्र्याचा हवा).

सोहमची निवड झाली होती. निवड करणाऱ्या बाईसुद्धा खोकत होत्या. आजकाल मोबाईल, इंटरनेटच्या जमान्यातसुद्धा, मानसी त्याच्याशी खोकल्याच्या भाषेने संपर्क साधत होती.

सोहमला मोबाईलवर मेसेज येत होते. "राधा आणि कृष्ण कधीही भेटले नाहीत. पण ते एकमेकांच्या भावना, दूर राहूनही समजून घेत होते. ते कधीच वेगळे नव्हते".

म्हणजे, ती राधा होती. आणि तिच्यासाठी सोहम कृष्ण होता.

"तू जहा जहा चलेगा, मेरा साया साथ होगा" असे काही मेसेजसुद्धा येऊ लागले होते.

असेच एकदा, सोहमला अजून एक एस.एम.एस आला

हिरवा रंग = तू माझ्यासाठी स्पेशल (खास) आहेस.
पांढरा रंग = मला तुझा स्वभाव खूप आवडतो.
गुलाबी रंग = मला तुझ्यात इंटरेस्ट (रस) आहे
चंदेरी रंग = हा फक्त टाईमपास आहे, वगैरे वगैरे.

यावरून, मुली रंगांच्या भाषेने बोलतात. कोणत्या रंगाचा अर्थ काय असतो? हे सोहमने केलेले विश्लेषण जवळ जवळ सत्य सिद्ध झाले होते. "सोहम पूर्ण वेडा नाही" हे समजल्यामुळे, माझ्या गालावरसुद्धा चांगलीच चपराक बसली होती. पण, थोडा का होईना, मला अजूनही सोहम वेडाच वाटत होता.

घरी पुन्हा एकदा सोहमचे लग्न ठरवण्याचा जोरदार प्रयत्न सुरु झाला. पुन्हा नव्याने मुली पहाणे सुरु झाले. पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सोहमचे, माझे आणि, सोहम पार्ट टू चे नशीब एकमेकांसारखेच आहे. अगदी माझ्यासारखेच अनुभव त्यालासुद्धा येऊ लागले होते.

कोणी मुली, घर लहान असल्यामुळे सोहमला लग्नाला नकार देत होत्या. कोणाला पैसेवाला नवरा हवा होता, कोणाला घर संभाळणे जमणार नव्हते. कोणाला देवाची पूजा करणे आवडत नव्हते. आईची चिंता अजूनच वाढत चालली होती.

शेवटी, सोहमच्या आईनेसुद्धा नवीन मोठे घर घेण्याचे ठरवले. भाऊ आणि सोहम, आता कामाला लागले होते. थोडे फार कर्ज मिळणार होते. शेवटी, "थोडे कर्ज काढू मोठे घर घ्यायचे" असे ठरले.

घर शोधण्यासाठी, सोहम, त्याचा भाऊ आणि आई दिवस दिवस भर फिरायचे. कधी कात्रज, कधी निगडी, कधी येरवडा, कधी सिंहगड रोड, कधी हडपसर, एकाच दिवसात पालथे घालायचे.

साधारणपणे सप्टेंबर २०११ सुरु असेल. दिवस होता २४ सप्टेंबर २०११. त्या दिवशी सोहम नेहमीप्रमाणे कामावर गेला.

दुपारी एक माणूस घरी आला. तो माणूस "भविष्य सांगतो म्हणून" सोहमच्या घरी आला. तो म्हणाला "दोन महिन्यांने तुमचे फार मोठे काम होणार आहे. तुमचा मोठा मुलगा रामासारखा आहे. मला काहीही पैसे देऊ नका, फक्त थोडेसे तेल द्या."

तेल घेऊन तो व्यक्ती निघून सुद्धा गेला.

जेव्हा ही गोष्ट सोहमला समजली, तेव्हा त्याने अंतर्मनाने विचार केला "मी आणि राम? रामाचा एक टक्का गुण जरी माझ्यात असता, तरी बास झाले असते." मी कुठला आलोय राम?"

पण एव्हाना, सारखे देवाचे दर्शन घेऊन, देवाबद्दल विचार करून करून, मनातले वाईट विचार, म्हणजेच रावणाची, दुर्योधनाची प्रवृत्ती संपू लागली होती. मनामध्ये चांगले विचार येऊ लागले होते. मनातल्या वाईट विचारांवर आता, थोडे का होईना? पण नियंत्रण येऊ लागले होते.

असो, त्या व्यक्तीने सांगितल्याप्रमाणे, दोन महिन्यांने, म्हणजे २४ नोव्हेंबर २०११ रोजी, सोहम आणि भावाला २० लाख रुपयांचे कर्ज मिळाले.

मग तो व्यक्ती कोण होता? ते एक तर साक्षात शनी महाराज होते किंवा साक्षात हनुमान असणार. कारण त्यांने तेल मागितले होते. आपण हनुमानाला आणि शनी महाराजांना तेलच वाहतो की.

कर्ज तर मिळाले. पण, घर अजून ठरले नव्हते. घर शोधले असते, पण घर घेण्याचा अनुभव नव्हता.

अशातच सोहमचा मावस-भाऊ घरी आला. त्याला साक्षात बालाजी प्रसन्न आहे. जशी, काही लोकांच्या अंगात देवी येते. तसेच, बालाजी त्याच्या अंगात येत होता. बालाजी अंगात आला की लोक त्याला प्रश्न विचारायचे. सोहमचा मावस भाऊ त्या प्रश्नांची अचूक उत्तरे द्यायचा. सोहमने सुद्धा त्याला विचारले, "देवा, आमचे नविन घर कुठे होईल?" बालाजी म्हणाला "आपण बसलो आहोत तिथून, पश्चिम दिशेला तुम्हाला नवीन घर मिळेल."

दुसऱ्या दिवशी सोहम कामावर निघाला. रस्त्यात खूप ठिकाणी सिग्नल लागल्यामुळे सोहमला ऑफिसला पोचायला उशीर झाला. तसे सोहमला, कधीच वेळेवर जाग येत नाही. रोजच ऑफिसला जायला उशीर होत होता. त्यातच, लाल सिग्नल लागला की उशीर अजूनच वाढत होता.

सोहम देवाला म्हणाला "देवा, अशा कोणत्या ठिकाणी घर मिळेल का, जिथे एकही सिग्नल न लागता मी ऑफिसला जाऊ शकेल?" "पण पुण्यामध्ये तर हे शक्यच नाही" असे समजून सोहम गप्प बसला.

सोहम, आई आणि भाऊ, संध्याकाळी कामावरून आल्यावर जागा शोधायला फिरायचे. तसेच, सुट्टीच्या दिवशीही हाच प्रोग्रॅम असायचा.

कोणती कागदपत्रे तपासायची, कोणती कागदपत्रे मागायची? काहीच माहिती नव्हते. फक्त कर्ज

मंजूर होऊन चालत नसते. बाकीच्या गोष्टीही जमून आल्या, तरच स्वत:चे घर होत असते. पण, सोहम आणि भाऊ, तसे वयाने लहानच होते. आत्तापर्यंत आई-बाबांच्या छत्राखालीच वाढले होते. त्यांना काहीच अनुभव नव्हता.

अशातच, सोहम आणि भावाचे, टिंगरे नगर या पुण्यातल्या भागात जाणे झाले. जवळच विमानतळ होते. त्या भागात तीन मजल्यांच्यावर बांधकामाची परवानगी नाही. बिल्डिंगी तीनच मजल्याच्या असल्यामुळे, या भागात सगळे कसे सुटसुटीत आहे. लोकसंख्यासुद्धा फार जास्त नाही.

टिंगरे नगरमध्ये, रस्ता नंबर १ ते रस्ता नंबर १४, असे १४ रस्ते आहेत. तर असेच एकदा, सोहमचे रस्ता नंबर १३ मध्ये घर पाहण्यासाठी जाणे झाले. १३ या आकड्याचा आणि सोहमचा आधीच जुना संबंध होता. सोहमसुद्धा १३ या आकड्याला घाबरत होता. तसा, सोहमला १३ नंबरच्या रस्त्यावर घर घेण्यात फारसा काही रस नव्हता. पण, घरच्यांच्या आग्रहाखातर सोहम सोहम तिथे घर पहायला गेला. नेमके टिंगरे नगरमध्ये, या रस्ता क्रमांक १ ते १४ चे उपविभाग पाडले आहेत. ते म्हणजे, रस्ता क्रमांक १४ अ, १४ ब, १४ क वगैरे.

तर, सोहम जे घर पाहायला जाणार होता, ते नेमके "१३ ब" मधेच होते. १३ ब म्हणजे, सिनेमात घडतात त्या गोष्टी, सिनेमामधील हिरोच्या आयुष्यात सुद्धा घडत असतात. सोहमला सुद्धा, या १३ ब आकड्याचा भरपूर अनुभव होता. "तिथे घर घ्यायचे नाही" हे त्याने आधीच ठरवून टाकले होते.




पण, जेव्हा तो "१३ ब" मधले घर पाहायला गेला. तेव्हा, तिथे त्यावेळी रस्त्यावर फक्त एकच बिल्डींग होती. तिचे नाव होते **"समर्थ कृपा".**

आता सोहमला आठवले  "मानसीच्या बाकावर लिहिले होते १३ ब". इथूनच, टी.व्ही वर दिसणाऱ्या गोष्टी सोहमच्याही आयुष्यात घडू लागल्या. काही काळाने "श्री स्वामी समर्थ" टी.व्ही च्या माध्यमातून सोहमशी बोलले.

याचा अर्थ असा होता की, मानसीवर स्वामी समर्थांची कृपा होती. आणि तीच कृपा, सोहम तिच्याशी जोडला गेल्यामुळे सोहमवर सुद्धा झाली होती. आता साक्षात श्री स्वामी समर्थ, ज्यांने साईबाबांना




आशीर्वाद दिला होता, की "तू माझ्यापेक्षाही जास्त प्रसिद्ध होशील". आणि त्या प्रमाणेच, आज शिर्डी हे गाव साई बाबांच्या नावाने ओळखले जाते.

श्री स्वामी समर्थ म्हणजे, साक्षात दत्तप्रभूंचा अवतार. "श्री स्वामी समर्थ" म्हणजे, साक्षात गजानन महाराज, साक्षात गोंदवलेकर महाराज, यांचे गुरु. तर, अश्या या स्वामी समर्थांची कृपा सोहमवर झाली होती. आज सोहमला १३ ब या आकड्याचा अर्थ समजला होता. आता १३ या आकड्याला घाबरण्याचे काहीच कारण उरले नव्हते.

आता सोहमला, स्वामी समर्थांविषयी आपुलकी, प्रेम वाटू लागले होते.

सोहम मनातून देवाशी बोलला रे बोलला "देवा तुला भेटावेसे वाटतंय रे" की त्या देवाकडे सोहमचे काही दिवसात जाणे ठरलेलेच होते. आता सोहमला "अक्कलकोटला " श्री स्वामी समर्थांकडे जावेसे वाटू लागले होते.

सोहमने, समर्थांना मनातून बोलण्याचाच उशीर होता, की लगेच दुसऱ्याच दिवशी सोलापूरचे काम आले. सोहमला हेच हवे होते.

सोलापूरला, पहिल्या दिवशी काम संपवून सोहम अक्कलकोटला गेला. अक्कलकोटला जाताना, रस्त्यात डोळे मिटून बसावेसे वाटले. डोळयासमोर स्वामी समर्थांची मूर्ती प्रकट झाली. मागे दत्त गुरु उभे होते. हा कधीच अक्कलकोटला गेला नव्हता. मूर्ती कशी आहे? स्वामींचा फोटो कसा आहे? हे त्याला माहितीच नव्हते.

पण मंदिरात पोचल्यावर त्याला समजून आले "डोळे मिटल्यावर जी स्वामींची प्रतिमा डोळयासमोर आली, तीच मूर्ती अक्कलकोटच्या स्वामी मंदिरात आहे". तसाच फोटोसुद्धा दिसला. म्हणजे, स्वामींने दर्शनाला येण्याअगोदरच त्यांचा चमत्कार दाखवला होता.

आता सोहमला गुरु भेटण्याची वेळ जवळ आली होती. स्वामी समर्थांबद्दल, जिव्हाळा, प्रेम, आपुलकी आता वाढू लागली होती.

तिथून सोहम गाणगापूरला गेला. ज्यांना कोणाला भूत-पिशाच बाधा झाली आहे. असे लोक, भूतबाधा उतरवण्यासाठी गाणगापूर येथे येतात. नेमका, दुपारच्या आरतीच्या वेळेसच सोहम तिथे पोचला. दत्तगुरूंच्या पादुकांना हात लावायला मिळाला. पादुकांवर अभिषेक करायला मिळाला. तेवढ्यात दुपारची आरती सुरु झाली.

जसे ढोल, नगाडे वाजू लागले, तसे भूत बाधा झालेले लोक त्या तालावर नाचू लागले. सोहम नाचला नाही. पण, त्या तालावर खूप नाचावेसे वाटत होते. कदाचित, आत्तापर्यंत सोहमसुद्धा असाच बाधित असावा. पायाने ठेका धरून, तालावर मान डोलवून, सोहमसुद्धा त्या संगीताची मजा घेऊ लागला.

कदाचित, इथेच त्याची बाधा दूर झाली असावी.

पुण्यात असताना मुली पाहण्याचे कार्यक्रम सुरूच होते. आणि, पुणे सोडले की देवांना भेटणे सुद्धा सुरु होते.

असेच एकदा, सोहम संध्याकाळी अंघोळ वगैरे करून देवाची पूजा करायला बसला. त्या दिवशी शनिवार होता. "आज काय वाचायचे?" हा विचार चालू होता. याने संपूर्ण चातुर्मास काढले आणि चाळू लागला. याची नजर शनी महात्म्याच्या गोष्टीवर पडली. याने विचार केला "आज शनिवार आहे. आपली साडे-साती सुद्धा सुरु आहे. असेही आपले आयुष्य शनी महाराजांच्या अमलाखाली चालत आहे. तर, आज आपण शनी महात्म्य वाचू".

शनी महात्म्यात "राजा विक्रमाची" गोष्ट सांगितली आहे. राजा विक्रम, एकदा अजाणतेपणे शनी महाराजांचा अपमान करतो. नेमके त्याच वेळेस, शनी महाराज विमानात बसून चाललेले असतात. ते राजा

विक्रमाचे बोलणे ऐकतात. त्यांना खूप राग येतो. ते थेट राजा विक्रमाकडे येऊन म्हणतात "खूप टवाळक्या करतोस तू, आता माझा चमत्कार बघ."

त्यावेळेस राजा विक्रमाची साडे साती सुरु होणार असते. पुढे एकदा, शनी महाराज घोडे विकणाऱ्याचे सोंग घेतात. बाजारात घोडे विकायला येतात. राजा विक्रमाला एक घोडा खूप आवडतो. त्याची सैर करावी म्हणून राजा घोड्यावर बसतो. घोडा थेट उडू लागतो. घोडा, राजा विक्रमाला थेट दुसऱ्याच राज्यात आणून उतरवतो. त्या राज्यात कोणालाही माहिती नसते, की विक्रम हा एक राजा आहे.

पुढे शनी महाराजांच्या क्रोधामुळे, राजा विक्रमावर चोरीचा आळ येतो. त्याचे हात पाय तोडले जातात. असे ७-७.५ वर्षं, राजा विक्रम एका तेल्याच्या घरी घाणा हाकण्याचे काम करतो. साडे-साती संपताना, दु:ख खूप अनिवार झाल्यावर राजा विक्रमाला शनी महाराजांची माफी मागण्याची बुद्धी होते.

साक्षात शनी महाराज समोर उभे ठाकतात. शनी महाराज म्हणतात "अरे अज्ञाना, अजूनही तुला कळले की नाही? हे सगळे मीच करवत होतो. तू धर्मात्मा आहेस. तू कधीही अधर्माने वागला नाहीस. फक्त, तुला अभिमान झाला म्हणून मी तुझी परीक्षा घेत होतो."

तुलाच नाही तर, अनेक देवांना, दानवांना सुद्धा साडे साती चुकली नाही.

रामाची साडे साती सुरु झाली, तेव्हा त्याला राज्याचा त्याग करून वनात जावे लागले. रावणाने सीतेचे हरण केले. पण, जेव्हा रामाची साडे साती संपली. तेव्हा, सहा महिन्यांत त्याने रावणाचा वध करून सीतेला परत आणले.

कृष्णाला साडे साती आली, तेव्हा त्याच्यावर सुद्धा स्यमंतक मणी चोरल्याचा कलंक लागला. पण, पुढे तो कलंक पुसला गेला. ही गोष्ट हरिविजय पुस्तकात आहे.

गुरूंना साडे साती आली, तेव्हा शनी महाराजांने त्यांना एका प्रहरात फाशीच्या सुळापर्यंत पोचवले. साडे साती संपताच, त्यांना सोडवले सुद्धा.

पांडवांना, साडेसाती आली तेव्हा वनवास मिळाला. साडेसाती संपताच, कौरवांना पराभूत करून त्यांचे राज्य परत मिळाले.

साक्षात महादेव सुद्धा, कैलासावर एक क्षण लपून बसले.

तर, असे शनीमहात्म्य वाचताना, शनी महाराजांने सोहमला दाखवून दिले होते "अभिमान करू नकोस, मी सदैव तुझ्या पाठीशी आहे."

पण, आत्ता तर साडेसातीची फक्त पाच वर्षं संपत आली होती. अजून अडीच वर्षं शिल्लक होती.

(दरम्यान हे लिहित असताना, सोहमची साडे-साती फक्त दीड महिनाच शिल्लक होती. सोहमने

आधीच शनी महात्म्यात वाचले होते, साडे साती सुरु झाली तेव्हा राजा विक्रमाला त्याचे हात पाय गमवावे लागले होते. आणि साडेसाती संपताना, शनी महाराजांने राजा विक्रमाला, तो होता त्यापेक्षाही सुंदर बनवले होते. अगदी त्याचे हात-पाय सुद्धा परत दिले होते.

सोहमने गेली २-३ वर्ष ही गोष्ट मनातच ठेवली होती. "साडे-साती संपत आली, तरी आपण अजूनही सुंदर कसे नाही झालो?" असे त्याला वाटू लागले होते. गेल्या दोन महिन्यांपासून सोहमलाही सुंदर बनावेसे वाटू लागले होते.

"आता माझी साडे-साती संपताना, शनी महाराज मलासुद्धा सुंदर बनवतील". "कदाचित, आपल्या रक्तात काहीतरी अशुद्धी मिळाली आहे. त्यामुळे आपल्याला चेहऱ्यावर तारुण्यपिटिका होत असाव्यात." असे समजून त्याने "साफी" म्हणून रक्त शुद्ध करणारे औषध आणले. एक महिना हे औषध घेतल्यावर, खरंचच सोहमचा रंग आता उजळू लागला होता. आधीच गेले ३-४ महिने त्याने मिश्या वाढवल्या होत्या. या मिश्यांमुळे तो "भगतसिंग" दिसू लागला होता. त्यातच, रंग उजळल्यामुळे तो अजूनच छान दिसू लागला होता. त्याचे होट अजूनच गुलाबी दिसू लागले होते.

मागे एकदा कॉलेजमध्ये असताना, एका सरांने याचा सावळा रंग आणि गुलाबी होट पाहून त्याला विचारलेच होते "काय रे सोहम, तू काय लिपस्टिक लावतोस की काय?". सोहमचे होट तसे लहानपणापासूनच गुलाबी होते.

तर खरंच, सोहम हसू लागला की किती छान दिसतो, हे आता मलासुद्धा समजू लागले होते. त्याचे मोत्यासारखे दात, तो हसला की अजूनच छान दिसायचे. खरंच, शनी महाराजांने सोहमला, साडे-साती संपताना सुंदर बनवून टाकले होते.

अगदी सुंदर नसला तरी, सोहम आधीपासूनच व्यवस्थित दिसत होता. फक्त हे त्याला माहिती नव्हते. देवानेच त्याला ही जाणीव करून दिली असावी.

पण, पुन्हा एक प्रॉब्लेम. कालच त्याने इंटरनेटवर कुठेतरी वाचले "साफी या औषधात धातू आहेत. या धातूंमुळे पुढे खूप त्रास होतो." आधीच याची रास कन्या, त्यातच हा थोडा मूर्ख. घाबरायला कारणच हवे होते. ठरले तर, "आजपासून साफी घेणे बंद".

पण कालच माझ्या भावाने, व.पु.काळेंचे "माणसं" हे पुस्तक मला वाचायला दिले. या पुस्तकात, "विश्वास ठेवला तर माणूस काहीही करू शकतो" याचे अगदी सुरेख वर्णन केले आहे त्यांने. हे पुस्तक सोहमच्या हातातही पडले. पुस्तक वाचून पुन्हा याच्या मनात घालमेल सुरु झाली. "विश्वास ठेवून साफी हे औषध घ्यायचे की नाही?" हा द्विधा मन:स्थितीत सापडला होता.

पण, जणू काही देवानेच याच्या प्रश्नाचे उत्तर द्यायचे ठरवले होते. आजच त्याच्या ऑफिसमधले दोन साहेब बोलत होते. "माझ्या आईने, डॉक्टरांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून ७०व्या वर्षीसुद्धा पथ्य पाळली.

तिला कर्करोग असूनही, पुढे ती अजून २२ वर्षं जगली."

अर्थातच, हे ऐकून सोहमने "साफी" हे औषध पुन्हा घ्यायला सुरु केले. हे वेगळे सांगणे नकोच.)

असो, पुन्हा अडीच वर्षापूर्वीच्या काळात जाऊ.

असेच ४-५ दिवसांने मिरजला जाण्याचा योग आला. पुन्हा मिरजला काम संपवून, नरसोबाची वाडी, कोल्हापूर, ज्योतिबा, असे करून सोहम घरी पोचला.

"देवाच्या मंदिरात जाताना नाम-जप केला पाहिजे". असे वाटू लागले. हळू हळू सोहम, वेगळी वेगळी स्तोत्रे, नामस्मरण, अश्या गोष्टी करू लागला. करू लागला होता म्हणण्यापेक्षा, देव आणि गुरूच त्याच्याकडून हे करवून घेऊ लागले होते.

सोहमने एक नवीन पद्धत सुरु केली. चालायला लागले, की प्रत्येक पावलाबरोबर देवाचे एक नाव घ्यायचे. अशाने चालता चालता सुद्धा नामस्मरण होऊ लागले. मेंदूला याची इतकी सवय लागली, की पुढे जेव्हा जेव्हा सोहम चालायला उठायचा, तेव्हा आपोआपच मनात "राम,राम, राम" असे नाव घेणे सुरु होऊ लागले.

पण, फक्त चालतानाच नामस्मरण व्हायचे. इतरवेळी, मनाला काही अजून नामस्मरणाची सवय लागत नव्हती. नामस्मरण करताना मधेच कोणाशी बोलायची वेळ आली, की नामस्मरणाची साखळी तुटून जायची.

माणूस सगळे जग जिंकू शकतो. पण, स्वत:चे मन जिंकणे म्हणजे सगळयात अवघड काम. नामस्मरण हे तसे सोपे काम. पण जेवढे सोपे तेवढेच अवघड सुद्धा आहे. मनात नाना शंका येतात, देवावरच संशय येतो. "नामस्मरणाने काही फायदा होणार नाही" असे वाटते. आपलेच मन आपल्याला देवापासून लांब ठेवण्याचा प्रयत्न करत असते. देवाला शिव्या सुद्धा देतो आपण. फक्त "राम राम" म्हणायची सवय तर, मनाला लावणे म्हणजे फारच अवघड काम.

त्यामुळे सोहमने ठरवले "आपल्या मनाला राम, राम म्हणण्याची सवय काही अशी सहजासहजी लागणार नाही.

आपण स्तोत्र म्हणू लागलो तर? स्तोत्र पूर्ण होईपर्यंत आपल्याला बोलावेसे वाटणार नाही."

आपल्या मनाला "एखादी गोष्ट कशीही करून पूर्ण करायचीच आहे" हे आपण वारंवार सांगायला लागते. स्वत:च आपल्या मनाला संमोहित करावे लागते. मनाला संमोहित करण्याची पद्धत म्हणजे "मनाला सारख्या सूचना देत राहायचे."

उदा. आज मी १०००० नामजप करणारच. मी जास्त बोलणार नाही. जेव्हा जेव्हा मी नामस्मरण करायचे विसरेल, तेव्हा तेव्हा देवच मला नाम घेण्याची आठवण करून देणार आहे. वगैरे वगैरे.

अगदी गजनी सिनेमासारखे, प्रत्येक वेळेस मनाला नाम घेण्याची सूचना देणे गरजेचे असते.

आत्तापर्यंत "कोणीतरी बाहेरची व्यक्ती आपल्याला संमोहित करत होती" हे सोहमला समजलेच होते. पण, देवानेच सोहमला या संमोहनातून बाहेर काढले होते. पेपर मधले लेख वगैरे वाचून, आता सोहमला "स्वत:चे संमोहन कसे करायचे?" याची माहिती होऊ लागली होती.

आता सोहमच, नामस्मरण करण्यासाठी स्वत:ला संमोहित करू लागला होता.

सोहमने, ठिकठीकाणी अश्या सूचना नजरेसमोर पडतील, याची सोयसुद्धा करून ठेवली. आधी त्याने कम्प्युटरवर लिहून ठेवले "बी बर्फी (be burfy). बर्फी चित्रपटाचा नायक मुकबधीर असतो. सोहमच्या म्हणण्याचा अर्थ होता "इतर काही गोष्टींमध्ये, चुकीचे ऐकण्यात, चुकीचे बोलण्यात, फालतू गप्पा मारण्यात वेळ घालवू नकोस." मुका होऊन नामस्मरण करत रहा. चुकीच्या गोष्टी कानावर पडू देऊ नकोस, त्यांच्याकडे दुर्लक्ष कर. (थोडक्यात, मुका आणि बहिरा हो).

(मागे एकदा, चुकीच्या गोष्टी कानावर पडल्यामुळे, याला इतरांच्या बायका पटवाव्या वाटू लागल्या होत्या.)

ही पद्धत कामी आल्यावर सोहमने ठरवले "आपण, मोठ्ठे नामस्मरण होईल असे कोणते तरी स्तोत्र पाठ करायचे." "म्हणजे सहस्त्रनाम स्तोत्र पाठ करायचे."

सहस्त्रनाम स्तोत्र पाठ केल्याने काय होते? तर एकाच फटक्यात, देवाची हजार वेगळी वेगळी नाव मनातल्या मनात आठवली जातात.

पण, एक प्रॉब्लेम होता. तो म्हणजे, सहस्त्रनाम स्तोत्र म्हणताना कोणी बोलावले तर? मधेच बोलायला लागले तर? आपण विसरून जातो की आपण कुठे होते?

पण, याच्यावरसुद्धा उत्तर देवानेच दाखवले.

जर ऑफिसमध्ये, घरी, काही कारणाने मधेच बोलायला लागले. तर फक्त लक्षात ठेवायचे, की आपण कुठे होतो?. बोलणे संपले, की पुन्हा तिथूनच सुरु करायचे.

पण कोणत्या देवाचे सहस्त्रनाम पाठ करायचे? महादेवाचे, दुर्गामातेचे की विष्णूचे की गणपतीचे?" शेवटी, "विष्णू सहस्त्रनाम पाठ करायचे" असे ठरले.

"विष्णू सहस्त्रनाम का पाठ करायचे? तर, आजपर्यंत, आपण देवाकडे काहीना काही मागण्यासाठीच

त्याच्याकडे गेलो आहोत. जर आपण शिव-सहस्त्रनाम पाठ करून म्हणू लागलो तर, महादेव भोळा आहे. तो आपली प्रत्येक मागणी काहीही विचार न करता मान्य करेल. असे नको व्हायला, की आपण आपल्या मागण्यांसाठी महादेवाला फसवू लागूत.

(हे लिहित असताना सोहम घरीच होता आणि टी.व्ही वर नवीन मालिका सुरु झाली होती. खंडोबाची मालिका. यात खंडोबा म्हाळसादेवीला म्हणत असतात "आजपर्यंत तुझे प्रत्येक मागणे मी मान्य केले आहे, सांग तुला काय हवे?" जणू काही महादेवच सोहमशी बोलत होते.)

सोहमने ठरवले "त्यापेक्षा विष्णू तसा चतुर आहे. आपल्या मनातले विचार त्याला चटकन समजतील. आपल्या भावना खऱ्या की खोट्या? हे त्याला लगेच समजेल. तो काही आपली मागणी सहजासहजी मान्य करणार नाही. तो आधी आपली पूर्ण परीक्षा घेईल. मगच आपली मागणी मान्य करेल. म्हणजे, आपल्याकडून भोळ्या महादेवाची फसवणूक होणार नाही." तसेही महादेव फार रागीट सुद्धा आहे. जर आपली काही चूक झाली. ती महादेवाला आवडली नाही, तर त्याचा राग सहन करण्याची आपल्यात क्षमता सुद्धा नाही."

असे शेवटी, विष्णूला आपले इष्टदैवत मानण्यासाठी सोहम तयार झाला. सुरुवातीला विष्णू सहस्त्रनाम फार अवघड वाटू लागले. काही काही नावं इतकी मोठी आणि अवघड आहेत, की ती समजत तर नव्हतीच, वरून पाठ करण्याची फार मोठी पंचाईत झाली होती. पण, सोहम प्रयत्न करतच राहिला. हळू हळू २ महिने, ३ महिने झाले असतील. आता विष्णू सहस्त्रनाम स्तोत्र पाठ होऊ लागले होते.

शेवटी तो दिवस उजाडला जेव्हा पूर्णपणे, व्यवस्थित शब्दांच्या उच्चारासोबत विष्णू सहस्त्रनाम म्हणता येऊ लागले.

हळू हळू शनी महाराजांच्या प्रभावामुळे, जीवनाचे वास्तव सुद्धा समजू लागले. "आपण कशासाठी जन्माला आलो?" हे सुद्धा कळू लागले. आपणसुद्धा, इतर लोकांप्रमाणेच देवाचा अंश आहोत, सोहम आहोत, हे समजू लागले.

तसेच, शरीराला कष्ट पडले, मानसिक त्रास झाला, की मुक्ती मिळून एकदाच्या या जीवनचक्रातून सुटावेसे वाटू लागले. पण, देव सहजासहजी दर्शन देत नाही हे माहिती होते.

कुठून तरी माहिती मिळाली. १३ कोटी रामनामाचा जप केला, की देव स्वत: समोर येऊन उभा

ठाकतो. साडेतीन कोटी राम-नामाचा जप केला, की रामाच्या आपल्यावर असणाऱ्या कृपेचा अनुभव येऊ लागतो. लहानपणापासूनच, सोहमला एखाद्या गोष्टीचे वेड लागले रे लागले, की हा बाबा कित्येक दिवस तीच गोष्ट करत बसायचा. आता याला नाम-स्मरणाचे वेड लागले होते.

लहानपणापासूनच, सोहम आकडेमोड करण्यात तसा तरबेज होता. आता १३ कोटी जप पूर्ण कसा करायचा? (इथेही १३चा आकडा आहेच की). "आत्ता वय आहे २८ वर्ष. भारतीय माणूस सरासरी ६० वर्षे जगतो. आपण थोडे कमी जगणार आहोत असे मानू. म्हणजे, ५५ वर्षं मानून चालू. ५५ पैकी २८ गेली. म्हणजे, २७ वर्ष शिल्लक आहेत. २७ वर्षात १३ कोटी जप करायचा आहे.

२७ वर्षांचे एकूण दिवस होतात, २७ गुणिले ३६५ = ९८५५. म्हणजे, ९८५५ दिवसात १३ कोटी जप करायचा आहे. तर, १३,००,००,००० भागिले ९८५५ = १३१९१. म्हणजे, रोज कमीत कमी १३१९१ वेळा रामाचे नाव घ्यायला हवे. १३००० हजारच मानू. इथेही १३ चा आकडा आहेच की. पण, दिवसात इतका वेळ नामस्मरण करायचे म्हणजे, किती वेळ नामस्मरण करायचे?

एकदा विष्णू सहस्त्रनाम म्हणण्यासाठी २५ मिनिट लागतात. आपण ३० मिनिट धरून चालू.

तर, १३००० भागिले ३० = ४३३ मिनिट. म्हणजे, रोज १३ वेळा विष्णू सहस्त्रनाम म्हणण्यासाठी ४३३ मिनिट लागणार. ४३३ मिनिट म्हणजे ७ तास आणि १३ मिनिट..

हे ७ तास आणि १३ मिनिट कसे गोळा करायचे? तर, सकाळी ऑफिसला जाताना ४० मिनिट लागतात. ऑफिसला पोचून, कम्प्युटर वगैरे सुरु करून आवरेपर्यंत २ वेळा विष्णू सहस्त्रनाम पूर्ण होईल. ९.३० चा चहा घेताना एकदा. १२ वाजता जेवण करताना एकदा. दुपारचा चहा घेताना एकदा. संध्याकाळी घरी परत जाताना २ वेळा. संध्याकाळी पूजा करताना एकदा, जेवताना एकदा. असे एकूण ८ वेळा विष्णू सहस्त्रनाम पूर्ण होऊ शकते.

"पण, बाकीच्या ५००० नावांचे काय करायचे? आपण सुरु तर करू". असे वाटून, सोहमने हळू हळू इतर गोष्टींमधला रस काढून घेतला. मोकळया वेळेत फक्त जप करण्यावर भर देण्याचे ठरवले. हळू हळू मनाला, मेंदूला, याची सवय होऊ लागली. विष्णू सहस्त्रनाम आता २०-२२ मिनिटात पूर्ण होऊ लागले.

पण, जर मधेच बोलायला लागले तर "आपण कुठे होतो?" याचा विसर पडत होता. पुन्हा सगळे विष्णू सहस्त्रनाम पहिल्यापासूनच सुरु करावे लागत होते. अश्याने काही विष्णू सहस्त्रनाम, एका दिवसात १३

वेळा पूर्ण होणार नव्हते. मग पुन्हा ठरले - "आपण, अश्या दोन तीन जागा लक्षात ठेऊ, जिथून पुन्हा सुरुवात करता येईल."

उदाहरणार्थ. समजा आपण १ ते १०० हे आकडे म्हणत आहोत. तेवढ्यात, ऑफिसमधल्या मोठ्या सरांने बोलावले. आता सर तर मोठे आहेत. आपल्याला बोलावे लागणारच आहे. पण, बोलण्यासाठी तोंड उघडले की "आपण कुठे होते याचा विसर पडणार आहे".

तर, आपण त्या १ ते १०० आकड्यांमध्ये २५, ५०, ७५, आणि १००. असे ४ वेगळे वेगळे पडाव लक्षात ठेवायचे."

"म्हणजे, साधारणपणे जर २७ या आकड्याला सरांशी काही बोलावे लागले. तर फक्त लक्षात ठेवायचे, की आत्ता २५चा आकडा पूर्ण झाला होता. म्हणजे, बोलणे झाले की पुन्हा २५ पासून पुढे सुरु करायचे. पुन्हा १ पासून सुरु करण्याची गरज नाही".

हळू हळू ही पद्धत लागू पडू लागली.

दिवसभरात आता, ८ च्या ऐवजी १० वेळा विष्णू सहस्त्रनाम पूर्ण होऊ लागले. देव हे सगळे त्याच्याकडून करवून घेऊ लागला.

हळू हळू, काम करता करता सुद्धा विष्णू सहस्त्रनामाचा जप करण्याची सवय लागली. अश्याप्रकारे दिवसभरात १३००० चा जप पूर्ण होऊ लागला होता. हळू हळू रामाचा, विष्णूचा, त्याच्या नावाचा प्रभाव किती मोठा आहे? हे समजून आले.

ऑफिसच्या कामाने बाहेर जाणे झालेच, तर कसेही करून रोज १३चा आकडा पार करणे, एवढेच लक्ष्य होते. देवाच्या दर्शनाला गेल्यावर तर विचारूच नका. कधी सलग ३ तास, कधी ४ तास. असे सलग ८-१० वेळा नामस्मरण झाले, की मगच दिवसाचे सार्थक व्हायचे.

(सोहम जेवत असताना नामस्मरण करू लागला होता. आपोआपच गळयातून आवाज यायचा. आई म्हणायची "अरे सोहम, कमीत कमी जेवण तरी व्यवस्थित करत जा. कसले आवाज काढतोस गळयातून? वेडा झालास असे वाटते." आईला काय माहिती, सोहम नामस्मरण करतो ते?)

ऑफिसमध्ये, प्रवासात, "कोणी नामस्मरण करताना ऐकले, तर आपण वेडे ठरूत". असे समजून, मनातल्या मनातच हळू हळू नामस्मरण होऊ लागले.

मधेच कोणाशी बोलायची वेळ पडली, तर बोलण्याअगोदर फक्त "आपण कुठे होतो?" तेवढे लक्षात

ठेवायला लागत होते. बोलणे संपले, की पुन्हा स्मरण सुरु. मेंदूला, बुद्धीला, मनाला, आता ही सवय होऊ लागली होती. कामावरचे लक्ष विचलित होत नव्हते. आता नामस्मरण जमू लागले होते.

तसेच, "महादेवाच्याच कृपेने आपण इंजिनीअर होऊ शकलो" असेही जाणवत होते. मग, महादेवाला का दूर ठेवायचे? त्याच्यासाठीसुद्धा काहीतरी करायलाच हवे" असे वाटू लागले. मग काय, एकदा विष्णू सहस्त्रनाम स्तोत्र पूर्ण झाले की लगेच, एकदा महादेवाचे द्वादष ज्योतिर्लिंग स्तोत्र म्हणायचे. हे स्तोत्र तर फक्त एका मिनिटात पूर्ण होते.

नामातच राम आहे..... रामाचेच नाव आहे.........
नाम घेता समजून आले...... नामात/नावाला किती भाव आहे.....
तरुन गेला वाल्या कोळी, रावण सुद्धा तरून गेला...
शेवटी प्रत्येक आत्म्याची, त्याच्याकडेच धाव आहे.....

(मागे का कोणास ठाऊक, सोहम ऑफिसमधल्या एका सरांना म्हणाला होता "सर, मी दोन-तीन वर्षांत करोडपती होणारच आहे. खरंच, जरी आत्तापर्यंत पैश्याने नसला, तरी नामाने देवाने त्याला करोडपती करून टाकलाच होता. हे सांगण्याचे मूळ कारण म्हणजे, कोणीतरी स्पर्धक समोर असेल, तर आपोआपच माणूस स्पर्धेत जिंकायचा विचार करू लागतो. सोहमने तुम्हा सर्व वाचकांसमोर स्पर्धा निर्माण केली आहे. उठा, नाम घ्या, नामाने करोडपती व्हा. करोडपती कसे बनायचे? याचे विश्लेषण वर दिलेच आहे).

हळू हळू माणसाच्या आयुष्याची किंमत कळू लागली होती. वेळेची किंमत कळू लागली होती. एक एक सेकंद किती महत्वाचा आहे? हे कळू लागले होते.

बोलणे कमी झाल्यामुळे आणि देवाच्या नामस्मरणाने, आता सोहमचा स्वभाव शांत होऊ लागला होता. शब्दांची किंमत वाढू लागली होती. जे बोलेल ते खरे होऊ लागले होते. कधी कधी तोंडातून वाईट शब्द गेला, तर तो ही खरा होऊ लागला होता. हळू हळू, वाईट न बोलण्यासाठी प्रयत्न करावे लागत होते. यातून एक सकारात्मक उर्जा निर्माण होत गेली. देव आणि स्वामी समर्थ साक्षात पाठीशी उभे होते. स्वामींनी म्हणलेल्या शब्दांप्रमाणे, आता सगळ्यांचे चांगले होऊ लागले होते.

अधे मध्ये सोहमच्या आईला स्वप्ने पडू लागली होती. स्वप्नात कोणीतरी भयंकर व्यक्ती, आपल्या सोहमला इजा करण्यासाठी येताना दिसायची. तेवढ्यात, साक्षात श्री बालाजी आणि श्री राम धनुष्यबाण घेऊन येऊ लागले होते. रामाला आणि बालाजीला पाहून सोहमचे शत्रू पळून जाऊ लागले होते. तसे सोहमच्या कुटुंबाचे कुलदैवत, साक्षात श्री बालाजीच होते.

अशातच एकदा ऑफिसमधल्या एका सरांने, ऑफिसमधली न लागणारी पुस्तके बाजूला काढायचे ठरवले. जरी ते ऑफिस असले, तरी त्यात बरीचशी धार्मिक पुस्तके होती. त्यापैकीच, नेमके "श्री स्वामी समर्थ" नावाचे पुस्तक एका सरांने सोहमला वाचण्यासाठी दिले.

"रात्री घरी येऊन कधी एकदा पुस्तक वाचतो" असे झाले सोहमला. तर, जेवल्यावर सोहम पुस्तक वाचत बसला होता. पुस्तक थोडे मोठे असल्यामुळे एका रात्रीत पूर्ण होणे शक्य नव्हते. थोडा वेळ वाचल्यावर सोहमला झोप येऊ लागली. पण, "झोपण्याअगोदर एक शेवटचे पान वाचून पूर्ण करावे" असे वाटले. "कदाचित, देवाचा काहीतरी संकेत असेल" असेही वाटू लागले.

नेमके तसेच झाले, पुढच्याच पानावर लिहिले होते "अरे, झोपायला काय जातोस? तू ज्याला शोधतो आहेस तो मीच आहे. तुझी आणि माझी भेट "श्री स्वामी समर्थच" करून देणार आहेत. जा, अक्कलकोट्ला जा".

सोहम रात्री १२ वाजताच निघाला होता. पण आईने थांबवले.

सोहमला आता, त्याचे ऑफिसमधले सगळे सर म्हणजे देवच वाटू लागले होते. "कसे काय बरे सरांने हे पुस्तक आपल्यालाच दिले?" असा विचार करून पुन्हा डोके दुखू लागले होते. पण, देवाच्या आणि गुरूंच्या चमत्काराला अंत नसतो. देव, गुरु हे सगळे कसे करतात? विचार न केलेलाच बरा.

पुढे ४-५ दिवसातच पुन्हा सोलापूरला जायचे काम आले. झाले "पण, मी कोणाला शोधतच नव्हतो. फक्त मानसीला शोधत होतो. मग ही मानसी तर नसेल? मागेही आपण तिला देवी म्हणत होतो. कदाचित ही मानसीच असेल" असे वाटू लागले."

सोहम पुन्हा अक्कलकोट्ला पोचला. तिथे स्वामींचे दर्शन घेऊन निघण्याची वेळ झाली. तरी, ना मानसी दिसली ना कोणी बाकीची व्यक्ती, जिला हे माहिती होते.

शेवटी सोहम, पुन्हा तुळजापूर, या वेळेस पंढरपूरला सुद्धा गेला. कळत असल्यापासून सोहम पहिल्यांदाच एकटा पंढरपूरला गेला होता. चंद्रभागेत स्नान करण्याची काय मजा आहे? हे त्याला समजले होते. पहिल्यांदाच विठ्ठलाच्या पायांवर हात लावायला मिळाला. पहिल्यांदाच त्याच्या पायांवर डोके टेकवायला मिळाले. स्वर्गीय आनंद याच्यापेक्षा काय वेगळा असणार होता? पण, अजूनही कोणी भेटले नव्हते. आणि

सोहम पुन्हा घरी पोचला.

"मानसी सोडून आपण कोणाला शोधतो" हेच सोहमला माहिती नव्हते. फक्त, मानसी एके मानसी, मानसी दुणे मानसी, एवढेच माहिती होते.

दरम्यान, ऑफिसमध्ये नवीन मॅडम आल्या. सोहमने विचार केला, "मानसी मोठ्ठी झाली की या मॅडम सारखीच दिसेल" असे समजून सोहम वारंवार त्यांच्याकडेच पहात राहिला. पण बहुतेक, मॅडमचा सोहमबद्दल काहीतरी गैरसमज झाला असावा. त्या सुद्धा आधीच्या लोकांप्रमाणे टोचून बोलू लागल्या.

त्या फार कडक शिस्तीच्या होत्या. सोहम आजपर्यंत, रोज ऑफिसला १०-१५ मिनिटे उशिरा येत होता. मॅडमला काही हे चालत नव्हते. दोन तीन महिने पगार कपातसुद्धा झाली.

सोहम नवीन पिढीचा होता. त्याची कामे तो वेळेआधीच पूर्ण करत होता. त्याला काम संपवायला जास्त काही वेळ लागत नव्हता.

सोहम रोज ऑफिसवरून आला, की पूजा करून, थोडा वेळ टी.व्ही वगैरे पाहून झोपायला रोज १-२ वाजायचे. आणि त्यामुळे, सकाळी थेट ८ वाजताच जाग यायची. सोहम मनापासून "वाल्याचा वाल्मिकी" बनायचा प्रयत्न करत होता. पण त्यासाठीही वेळ लागतोच की.

जुन्या पिढीचे लोक रात्री लवकर झोपायचे. सकाळी लवकर उठायचे. नवीन पिढीत स्पर्धा फार वाढली आहे. अजूनही वाढतच आहे. नवीन पिढीतल्या मुलांची लाईफ-स्टाईल फार वेगळी आहे. नवीन पिढीची मुले जुन्या लोकांसारखी सुदृढ नाहीत. लहान वयातच त्यांना कसले कसले त्रास सुरु झालेले आहेत. फार लवकर थकवा येतो. त्यातच, इंजिनिअर होणारा प्रत्येक मुलगा रात्रभर सबमिशन करण्यासाठी जागतो. आणि हीच सवय त्याला लागून जाते. अर्थातच, तो उठतो सुद्धा उशिरा. (काहीजण लवकर उठत असतील, पण हा सोहम आहे).

सोहमचेही तसेच होते. सोहम फक्त ५-६ तासच झोपू शकायचा. त्यातच त्याचे, गेल्या दोन वर्षातले आयुष्य फार कठीण चालले होते. त्याने किती मानसिक त्रास सहन केला होता?

१. ऑफिसच्या कामाला बाहेर जाताना, रेल्वेचे तिकीट काढणे माहितीच नव्हते. त्यामुळे याने नेहमी बसने प्रवास केला. अर्थातच, बसने ३६-३६ तास प्रवास करणे काही सोपे काम नाही.

२. काम संपले, की हा आराम न करता देव-दर्शनासाठी फार लांब लांब फिरू लागला होता. हे सुद्धा बसनेच.

३. ऑफिसवरून परत आले की अंघोळ, देव पूजा करेपर्यंत १०-१०.३० व्हायचे. त्यापुढे जेवण. मग

थोडा वेळ टी.व्ही पाहून १-२ वाजता झोपायचा.

४. कधी कधी, ऑफिसवरून परत आले की नवीन घर शोधायला बाहेर पडावे लागायचे. घर पाहून आले की मग, पूजा वगैरे करून, पुन्हा जेवण करून झोपेपर्यंत १-२ वाजायचे.

५. कामासाठी बाहेरगावी जाणे झाले तर, जेवण कधी मिळेल याचा नेम नव्हता. जेवण कसे मिळेल याचाही अंदाज नव्हता. मग, जसे आणि जेव्हा मिळेल तसे जेवण करावे लागायचे.

६. शरीर आता साथ देईनासे होत होते. शरीर म्हणजे, वात, पित्त, कफ याचा साठा असणारे ठिकाणच होऊ लागले होते.

७. जेव्हा सोहम झोपायला जायचा तेव्हा ५ मिनिटाच्या आत झोप लागायची.

८. सकाळी कितीही गजर लावला, कोणी कितीही उठवले, तरी जाग यायचीच नाही.

९. सोहम जेवण करायचा ते भूक लागली म्हणून नव्हे. तर, जेवणाची वेळ झाली म्हणून. भूक म्हणजे काय असते, भूक लागली हे कसे समजते?. हे तर गेल्या काही वर्षात, सोहम विसरूनच गेला होता.

१०. अगदी माझ्याप्रमाणेच, सोहमलासुद्धा शारीरिक व्याधी जडल्या होत्या.

आणि अश्या प्रकारे, ऑफिसला जायला रोजच उशीर होऊ लागला होता.

एके दिवशी, ई-मेलच्या प्रती काढताना सोहमच्या हातून चहाचा कप खाली पडला. मॅडम पुढेच उभ्या होत्या. त्या म्हणू लागल्या "सोहम, माझा खून करतोस की काय?" अरे, उद्याच पेपरला बातमी येईल "ऑफिस मधील कर्मचाऱ्याने, डोक्यात कप मारून बॉसचा खून केला." दुसरे मोठे सर सुद्धा मॅडमला शामिल झाले. ते म्हणाले "नाही, तशी बातमी नाही येणार. बातमी येईल की "ऑफिस मधील कर्मचाऱ्याने, बॉसच्या खुनाचा प्रयत्न केला. बॉस वाचल्या, पण तो माथेफिरू कर्मचारी गजाआड गेला".

सगळे, ऑफिसमध्ये सोहमवर विनाकारण हसू लागले. सोहमला, फक्त हातून कप खाली पडला म्हणून, सगळे माथेफिरू ठरवून मोकळे झाले होते.

"पुन्हा पहिले दिवस परत येतात की काय?" असे सोहमला वाटू लागले. पुन्हा दिवसभर चैन पडले नाही. सोहमने थेट अर्ध्या दिवसाच्या सुट्टीचा अर्जच टाकला आणि ठरवले, आपले दु:ख केतकावळेच्या बालाजीलाच जाऊन सांगावे. त्या दिवशी एकादशी होती, मंगळवार होता. सोहमने उपास धरला होता.

सोहम गाडी काढून थेट केतकावळेला निघाला. वाकड, चांदणी चौक, कात्रज, अश्या मार्गे पुन्हा खेड

शिवापुरचा कंवर अली दुर्गेशांचा दर्गा, तिथून पुन्हा बनेश्वरचा महादेव. तिथेच खिचडी खाऊन निघाला. पुढे जवळच एक भवानी / काली मातेचे मंदिर होते. सोहम आज तिथेही निघाला.

मंदिराजवळ पोचल्या पोचल्या, एक पेपर उडून येऊन सोहमच्या पुढ्यात पडला. त्यावर लिहिले होते "तुला लवकरच सगळया गोष्टींचा उलगडा होईल". साक्षात भवानी मातेनेच सोहमला दिलासा दिला होता. साक्षात भवानी मातेला सोहमचे दु:ख समजले होते.

दर्शन घेऊन, सोहम केतकावळेच्या बालाजीला भेटण्यासाठी निघाला. पुन्हा, बालाजीचे दर्शन घेताना सगळया दु:खाचा विसर पडला. आता सोहम खुष झाला होता. रस्त्यात मस्तपैकी, कधी नामस्मरण करत, कधी गाणे म्हणत, सोहम नारायणपुरला पोचला. पुन्हा दत्ताचे दर्शन घेऊन हडपसरमार्गे घर गाठले. बहुतेक देवाचीच काहीतरी योजना होती, की त्याने ऑफिसमधल्या लोकांकडून सोहमचा अपमान करून घेतला. आणि एकादशीच्या दिवशी इतक्या सगळया देवांचे दर्शन घडले.

दुसऱ्या दिवशी, पुन्हा ऑफिसला जाताना नकोसे वाटू लागले. "जाउदे ती नोकरी, आपण काहीतरी धंदा करू. नाही जमले तर रिक्षा चालवू. पण नोकरी नको करायला" असे वाटू लागले. पण, नोकरी सुटेपर्यंत तर ऑफिसला जाणे गरजेचे होते.

सोहम ऑफिसला पोचला. मागूनच कालच्या मॅडमसुद्धा आल्या. अचानकच मॅडम जवळ आल्या. सोहमने नजर चोरली आणि कामात लक्ष देऊ लागला. मॅडम जवळ आल्या. जवळ असणारी लिमलेटची गोळी सोहमला दिली. काहीच न बोलता पुन्हा स्वत:च्या जागेवर जाऊन बसल्या. दोन मिनिटात खोकायला लागल्या. जणू काही मानसीनेच मॅडमला सोहमबद्दल पटवून दिले होते. मॅडमसुद्धा आता, गेला अर्धा तास, खोकून खोकून सोहमला जाणीव करून देऊ लागल्या होत्या "घाबरू नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे". मानसीचे आणि तुझे प्रेम मला माहिती आहे. तिनेच मला सगळे सांगितले आहे."

तेवढ्यात, पुन्हा सोहमला एस.एम.एस आला "राधा आणि कृष्ण कधीही भेटले नाहीत. पण, कधीही वेगळे सुद्धा झाले नाहीत".

कृतयुगात, रामाने सीतेचे रक्षण केले, तिला रावणाच्या तावडीतून सोडवले. द्वापर युगात, कृष्णाने राधेचे रक्षण केले. कर्तव्याचे महत्व ओळखून राधेशी दुरावा पत्करला. पण, कर्तव्य पूर्ण केले.

आज कलियुगात, जेव्हा तिचा राम, तिचा कृष्ण, दुबळा, कमजोर पडला होता. तेव्हा तीच सीता, तीच राधा, तिच्या रामाचे, तिच्या कृष्णाचे रक्षण करायला पुढे आल्या होत्या. जणू काही कृतयुगात रामाने सीतेला आणि द्वापर युगात कृष्णाने राधेला वचन दिले असावे "माझ्या पुढच्या अवतारात तूच माझे रक्षण करशील". एवढेच नाही तर, जुन्या ९ गर्ल-फ्रेंड्स सुद्धा, नवदुर्गांच्या रुपात सोहमचे रक्षण करत होत्या.

तेवढ्यात एक साहेब येऊन म्हणाले "अरे ती किर्लोस्करांची ई-मेल काढ रे जरा, मी दोन मिनिटात जाऊन येतो". सोहमने ती ई-मेल काढून ठेवली आणि संदर्भासाठी वाचू लागला. ई-मेल मध्ये शेवटी सुविचार लिहिला होता "if god is with you, who can बe against you?" "(जर तुझ्याबरोबर देव असेल, तर कोण तुझ्या विरुद्ध जाऊ शकते?")

खरेच, मानसी आणि सोहमची म्हणावी तशी भेट झाली नव्हती. पण, तिला सोहमचे आणि सोहमला तिचे मन मात्र समजत होते. मानसी कुठे होती? माहिती नव्हते. पण, सोहमला जराही त्रास झाला, तर तिला समजत होते. आणि लगेच, सोहमला त्रासातून सोडवण्यासाठी ती सोहमच्या बाजूने उभी रहात होती. ऑफिस मधल्या सगळ्या लोकांना सुद्धा आता सोहमची प्रेम कहाणी समजू लागली होती. एक जण म्हणायचा "मानले यार सोहम तुला. तुझी मानलेली बायको कुठे आहे ते माहिती नाही. पण, तुला जराजरी त्रास झाला तर, लगेच ती तुझ्या मदतीला धावून येते." (सोहमने कधीही, ऑफिसमध्ये कोणालाही, त्याची गोष्ट सांगितली नव्हती. पण, कसे काय दुसऱ्यांना त्याची प्रेम कहाणी माहिती झाली  हे कोडे कधीच सुटले नाही.)

"ऑफिसमध्ये हे काय आणि कसे चालले आहे?" हे सोहमला समजतच नव्हते.

तेवढ्यात, अजून एक एस.एम.एस आला "नशीब म्हणजे काय असते? एक मुलगा एका मुलीला प्रपोज् सुद्धा करत नाही. पण, तीच मुलगी अरेंज लग्नात त्याला पाहण्यासाठी त्याच्या घरी येते."

म्हणजे, सोहमचे मित्र-मैत्रिणी, जिच्याशी ठरलेले लग्न मोडले ती मुलगी, अनोळखी कृष्ण जो कधीही समोर आला नाही आणि जुन्या गर्ल फ्रेंड्स सुद्धा, सोहम आणि मानसीची भेट करून देण्यासाठी प्रयत्न करत होते. आज खरेच सोहमला, "आपण बालाजी झालो की काय?" असे वाटू लागले होते.

कोणाच्या आधीच्या गर्ल-फ्रेंड्स, एखाद्याचे लग्न, त्याचे प्रेम आहे त्या मुलीसोबत करून देण्याचा प्रयत्न करू शकतात का? तर हो, सोहमच्या बाबतीत तरी हे खरेच घडत होते.

"मुली फसवत नाहीत, त्या फक्त भावनिक असतात" हे सोहमचे वाक्य खरे ठरले होते. पण, हे तो

बोलला कोणासमोर होता? तर शायनासमोर. म्हणजे शायनासुद्धा शत्रू नव्हती. ती मित्रच होती. सगळया मुली सोहमला नव-दुर्गाच वाटू लागल्या होत्या.

पण मानसी मात्र स्वत:ला राधा समजून पुढे येतच नव्हती. जाउदे, गोष्ट एकदम मस्त चालली होती. प्रत्येक व्यक्ती देव वाटू लागली होती. तसे समर्थ म्हणूनच गेले आहेत की "सगळी सृष्टीच रामरूप आहे".

हळू हळू मानसीमुळे, मॅडम आणि मोठे सर सुद्धा सोहमवर विश्वास टाकू लागले होते. "सोहमकी उंगलिया घी मे और सिर कढाई मे था". ऑफिस मधले लोक आता मदत करू लागले होते. महत्वाची कामे सोहमला विश्वासपूर्वक सांगितली जाऊ लागली होती.

दरम्यान, ऑफिसमधला एक सहकारी म्हणाला "सोहम, तू त्या रुद्राक्ष सिनेमामधल्या संजय दत्त सारखा आहेस, तू महादेवाची पूजा करणे सुरु कर." या एक वाक्यानेच सोहमचे महादेवाबद्दलचे प्रेम जागृत झाले होते. पण, महादेव काय आणि विष्णू काय, दोघेही शेवटी एकच आहेत. त्यामुळे महादेवाचे स्मरण केले काय किंवा महाविष्णूचे स्मरण केले काय, दोन्हीही एकच होते.

आत्तापर्यंत, आपले आयुष्य विलक्षणपणे घडते आहे. हे सोहमला अजूनच ठळकपणे जाणवू लागले होते. कदाचित, स्वत:वर गोष्ट लिहिण्याचे त्याने याच काळात ठरवले असावे.

(दरम्यान, वरच्या दोन ओळी लिहित असताना. सोहम विचार करतच होता "मी गोष्टीचा अंत सकारात्मक करेन. पण, स्वत:ची स्टाईल सोडणार नाही. ज्यांच्या ज्यांच्या आयुष्यातून मी पुढे गेलो, ते सगळेच नेहमी माझी आठवण काढतात. गोडबोले सर, डोंगरे सर, इंजिनिअरिंग कॉलेजचे सर्व शिक्षक नेहमीच माझी आठवण काढतात. मग मी असे काही लिहील, की कोणी मला विसरूच शकणार नाही." तेवढ्यात याला टी.व्ही मध्ये आवाज ऐकू आला "झूठ बोले कौंवा काटे, काले कौंवे से डरियो". आणि सोहम वास्तवात आला.

जणू काही देवच म्हणत होता "अरे बाबा, ढुंगण एवढे पोळले आहे, तरी तुझ्या फेका मारणे बंद कसे होत नाही?"

"काय करू देवा, फेका मारल्याशिवाय बरं वाटतच नाही. माझा आत्मविश्वास फेका मारल्यानेच वाढतो रे. आणि असेही, तूच मला असा स्वभाव दिलास की. मग, तूच जर काही देत असशील? तर त्याला नाही कसा म्हणू?")

पण, एक गोष्ट आठवली तर समजते की, कदाचित ज्ञानेश्वर महाराजांची साडे-साती सुरु असतानाच, त्यांना जगाचे इतके कठोर अनुभव आले. आणि महाराजांने ज्ञानेश्वरी लिहिली. असेच काही तुकाराम महाराजांचे झाले असेल का? मीराबाईचे, असेच काही तर नसेल झाले? एकनाथ महाराज? संत

चोखामेळा? निवृत्तीनाथ तर ज्ञानेश्वरांचेच मोठे भाऊ,,,, सोपानदेव, मुक्ताबाई,,,,, किती संतांची नावे घ्यायची?

सोहम गेले कित्येक दिवस, गोष्टीमध्ये ज्ञानेश्वर महाराजांचे नाव टाकायचे विसरत होता. कदाचित त्यांनेच आठवण करून दिली असावी "मित्रा, मला न घेता गोष्ट पूर्ण कशी काय करतोस? तुझा जन्म तर आळंदीच्या एकादशीचाच ना? तुझे नावसुद्धा ज्ञानेश्वर, आणि हाती कथलाचा वाळा घेतोस काय रे?

दु:ख झाले की माणूस आपोआपच देवाकडे वळतो आणि त्याचाच होऊन जातो. असेच काही सगळया संताचे झाले होते का? ही सगळी शनी महाराजांचीच कृपा असावी.

सोहम म्हणतो "मी संत नाही बरं का" पण, मला सुद्धा काही लिहावेसे वाटले. म्हणून थोडा हात साफ करून घेतला. देवा, तू एवढे प्रेम दिलेस की, तुझ्याशिवाय काहीच सुचत नाही रे.

दरम्यान, आत्तापर्यंत अवघड काळ संपत आला होता. आता राहू महादशा संपून, गुरु महादशा सुरु होणार होती. त्यातच शनी महाराजांची कृपा प्राप्त झाली होती. शनी महाराजांने, सोहमला पुन्हा एकदा चांगल्या रस्त्यावर आणून सोडले होते.

घरी नवीन मोठे घर शोधणे सुरूच होते. तसेच, अधून मधून सोहमला दाखवायचा कार्यक्रम सुद्धा चालूच होता. मानसी काही येत नव्हती. आधीच, पहिले ठरलेले लग्न मोडल्यामुळे घरी थोडे चिंतेचे वातावरण होते. आईला वाटायचे "आता कसे होणार? याचे आधीच एक लग्न मोडले, दुसरी मुलगी याला पसंत करेल का?" तसे आईचेही वय वाढत चालले होते.

जेवढी धावपळ या गोष्टीत सोहमने केली आहे, त्या पेक्षा तिप्पट चौपट धावपळ त्याच्या आई-बाबांनी केली होती. त्यांचेही वय वाढत चालले होते. घरी पुढची जबाबदारी घेण्यासाठी कोणीतरी हवे होते. सोहमचे लग्न लवकर करणे गरजेचे होते. आईला कष्ट होत नव्हते. आईचे कष्ट पाहून मन खचत होते. पण काहीही करता येत नव्हते.

आईसुद्धा, दिवसभर काम करून नवीन घर शोधण्यासाठी, कधी सोहम बरोबर तर कधी त्याच्या भावाबरोबर फिरतच होती की. म्हणजे, या दोघांपेक्षा तिचे फिरणे दुप्पट होते. पण, कधीही कंटाळा न करता ती माउली जातच राहिली. घरी, पहाटे ५ वाजता उठून, अंघोळ करून पूजा करणे, दोघांचा डब्बा भरून कामावर पाठवणे, घरची धुणीभांडी करणे, आल्या गेल्या पाहुण्यांचे आदरातिथ्य करणे, घराची स्वच्छता ठेवणे, सण-वार संभाळणे, अशी सगळी जबाबदारी आत्तापर्यंत आईच पाहत होती. त्यातच, या घरी सुद्धा आत्तापर्यंत ५-६ मांजरे झालीच होती. कष्ट वाढतच चालले होते.

पडणाऱ्या कष्टांमुळे आणि वाढणाऱ्या वयामुळे आईची चिडचिड होऊ लागली होती. आईला राग आला आणि तिने बोलायला सुरुवात केली, तर ती तास तास भर बोलतच रहायची. याच काळात, वयापरत्वे आईचा मासिक धर्म विस्कळीत होऊन बंद होण्याच्या मार्गावर पोचला होता. याने आईला आता मानसिक त्रास सुरु झाला होता.

काही दिवसांअगोदर घरी एक माणूस येऊन गेला होता. तो म्हणाला होता "तुमचा मोठा मुलगा रामासारखा आहे". सोहमने ठरवले "आईसाठी राम बनायचे." देव बनूनच आईला शांत ठेवायचा प्रयत्न करायचा. राम बनूनच, आईला आशीर्वाद देऊन तिच्यात काही फरक पडतो का?" हे पाहायचे. सोहमने ठरवले "आपण देव बनून आई-बाबांना आशीर्वाद द्यायचा. आणि, आशीर्वाद खरा कर म्हणून देवालाच सांगायचे"

अधेमध्ये, आईला शांत ठेवण्यासाठी, तिचे संसारातले कष्ट कमी करण्यासाठी, सोहम तिला नामस्मरणाच्या वाटेवर घेऊन जायचा प्रयत्न करू लागला. पण, सोहम काही खरा राम नव्हता, की ज्याने म्हणले आणि खरंच घडले.

दोन-चार दिवस व्यवस्थित जायचे. आणि पुन्हा आईला काही त्रास झाला, की पहिले पाढे पंचावन्न.

पण, आईचे कष्ट कमी झाल्याशिवाय हे शक्य नव्हते. आईचे कष्ट कमी होण्यासाठी वॉशिंग मशीन वगैरे सुविधा होत्या. पण, मुलांचे आहेत म्हणून, आई कपडेसुद्धा हातानेच धुवायची. तिला कितीही सांगितले तरी ऐकायचीच नाही.

शेवटी सोहमने लवकर लग्न करायचे ठरवले. "जी मुलगी फार अभिमान न दाखवता आपल्याला पसंत करेल" त्या मुलीशी लग्न करण्याचा निर्णय घेण्यात आला.

दरम्यान, इलेक्ट्रिकल कंपन्यांचे मोठे शिबीर मुंबईमध्ये ठरले होते. शिबीर ३ दिवस चालणार होते. सोहम तीन दिवस सरांच्या मुंबईच्या घरी, मुंबईमधेच राहणार होता. घर होते प्रभादेवीला. हाकेच्या अंतरावर सिद्धिविनायकाचे मंदिर होते. रोज सकाळ - संध्याकाळ सिद्धी विनायकाचे दर्शन घेणे, हा सोहमचा नियमच झाला होता. तसे अधे मध्ये, कधीतरी दादरला जाणे झाले की सोहम सिद्धी-विनायकाला जातच होता.

सोहमने, प्रत्येक देवाचे जास्तीत जास्त वेळा दर्शन घेण्याचा विश्वविक्रम करण्याचे ठरवले होते. गेल्या दिड-दोन वर्षातच, आत्तापर्यंत ७-८ वेळा बालाजीचे, ५ वेळा अजमेरच्या ख्वाजा गरीब नवाजांचे, तेवढ्याच वेळा पुष्करच्या ब्रम्हदेवाचे, १२ ज्योतीर्लिंगांपैकी ५-६ ज्योतिर्लिंगांचे, २-३ वेळा गजानन महाराजांचे, ७-८ वेळा महालक्ष्मीचे, ३-४ वेळा तुळजापूरच्या भवानी आईचे, ३-४ वेळा स्वामी समर्थांचे, १-२ वेळा पंढरपूरच्या विठ्ठलाचे, ज्योतिबाचे, शनी महाराजांचे, नाथद्वाराच्या कृष्णाचे, द्वारकेचे, मथुरेचे,

हरिद्वारचे, हृषीकेशचे, गंगामाईचे, सरस्वती देवीचे, गायत्री देवीचे, सप्तश्रुंगीचे, रेणुका देवीचे, अम्बाजोगाईचे, नरसोबा वाडीचे, शिर्डीच्या साई-बाबांचे, सिद्धी विनायकाचे, औंढा नागनाथाचे, पद्मावतीचे, भरपूर संतांचे असे कित्येक देवांचे, कित्येक वेळा सोहमला दर्शन घडले होते. भारतातील १०-१२ राज्य फिरायला मिळाली होती.

देव बोलावत राहिला आणि सोहम जात राहिला. या मागे अजून एक कारण होते. ते म्हणजे "सोहमची आई". सोहमची आई रोज, सत्संगाचे टीव्ही वर लागणारे कार्यक्रम पहात होती. त्यामध्ये कधी निर्मल बाबा, कधी स्वामी देवकीनंदन महाराज, कधी कृपाळू महाराज, कधी सुधांशू महाराज, कधी आसाराम बापू, अश्या संतांचे आवाज सोहमच्या कानी पडत होते". त्यांची सुद्धा कृपा सोहमवर होऊ लागली होती. भागवत ऐकायला मिळत होते.

१३ चा आकडा म्हणजेच, १३ कोटीचा आकडा. "१३ चा आणि आपला जन्मापासून संबंध आहे" हे समजले होते. १३ चा आकडा अशुभ नसतो हे समजले होते.

श्री विष्णूच्या नावातही १३ चा आकडा आहेच की.

a=1

b=2

c=3

d=4

e=5

f=6

g=7

h=8

i=9

j=10

k=11

l=12

m=13

n=14

o=15

p=16

q=17

r=18

s=19

t=20

u=21

v=22

w=23

x=24

y=25

z=26

आता श्री विष्णूचे नाव पाहू, श्री विष्णू = SHREE VISHNU = s = 19, h = 8, r =18, e = 5, e = 5....v=22, i=9, s=19, h=8, n=14, u= 21....

( SHREE VISHNU = 19+8+18+5+5+22+9+19+8+14+21 = 148 = 1+4+8 = 13). आहे की नाही गंमत?

एवढेच नाही, आपण ज्याला मोक्ष म्हणतो,

मोक्ष = MOKSHA =

m = 13

o = 15

k = 11

s = 19

h = 8

a = 1

MOKSHA = 13+15+11+19+8+1 = 67 = 6+7 = 13

आता थोडे संशोधन तुम्ही सुद्धा करा. तेवढेच देवाचा सहवास वाढेल.

"१३ चा आकडा पूर्ण केल्यावरच माणसाची जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका होते" हे समजले होते. "आपला जन्म मुक्त होण्यासाठीच झाला आहे" हे समजले होते. तळ हातावर योग्य ठिकाणी त्रिशूळ, मत्स्य, गुरूच्या उंचवट्यावर फुली, शुक्राच्या उंचवट्यावर मोठासा त्रिकोण, चंद्राच्या भागावर चौकोन, अंत:करण रेषेवर चौकोन, दोन तीन ताऱ्यांची चिन्ह, दोन यश रेषा (सूर्य रेषा), तीन चार धनरेषा, अश्या हातांवर असणाऱ्या शुभ - खुणांने तळहात भरून गेला होता.

देवाने भरभरून दिले होते. हा देवाला शरण गेला, आणि देवाने हात दिला. ५ वेळा अजमेरच्या ख्वाजा गरीब नवाजांचे दर्शन झाल्यामुळे, काही मुस्लीम मित्र याला "अल्ला का बंदा म्हणू लागले होते." "येशू तुमच्यावर प्रीती करतो" हे वाक्य तर सारखे सारखे नजरेसमोर पडत होते. साई-बाबा म्हणल्याप्रमाणे "सब का मालिक एक है" याचा प्रत्यय येऊ लागला होता. हिंदू-मुस्लीम-ख्रिश्चन ज्यांना मानतात, अश्या सगळया देवांकडून आशीर्वाद मिळू लागले होते. हे पुस्तक संपवताना गुरु नानकांचा आशीर्वाद मिळाला.

ही सगळी शनी महाराजांच्या साडे-सातीची कृपा होती. पण अजूनही, "आपण कोणाला शोधत होतो आणि आपल्याला पुस्तकामधून कोणी संकेत दिला" हे समजत नव्हते.

हळू हळू, कुंडली पाहणे, तळहातावरच्या रेषा पाहणे जमू लागले होते. फेका मारणे, पुड्या सोडणे. म्हणलेले खरे नाही झाले की गप्प बसणे. खरे झाले की म्हणणे "बघ मी सांगितले होते ना?" असे सुरु झाले. थापा पचल्यामुळे, ऑफिसमधले एक दोन साहेब सोहमला ज्योतिषी समजू लागले. पण ही सगळी कमाल

होती कृष्णाची.

अशातच ,एकदा ओळखीच्या क्षीरसागर काकांकडे जाणे झाले. नेमके, काका-काकु सुद्धा आत्ताच घरी पोचले होते. काका म्हणाले "आज गोंदवलेकर महाराजांचा जन्मदिवस आहे." ४ फेब्रुवारी होता त्या दिवशी.

तर काका पुढे म्हणाले "अरे सोहम, गोंदवलेकर महाराजांने एक छान पुस्तक लिहिले आहे." पुस्तक म्हणण्यापेक्षा ही एक रोजनिशी आहे. या पुस्तकात, १ जानेवारी ते ३१ डिसेंबर, याप्रमाणे गोंदवलेकर महाराजांची ३६५ प्रवचने आहेत." आपण रोज त्या दिवशीचे पान वाचायचे.

उदा. आज ४ फेब्रुवारी आहे. तर आपण ४ फेब्रुवारीचे पान काढून वाचायचे." असे करत हेच पुस्तक आपण रोज वाचायचे." हे घे पुस्तक. आज गोंदवलेकर महाराजांचा जन्मदिवस आहे. नेमके आजच तुला इकडे येण्याची, आणि मला, तुला हे पुस्तक देण्याची बुद्धी झाली.

तर अश्याप्रकारे, गोंदवलेकर महाराजांची सोहमच्या आयुष्यात एन्ट्री झाली होती. ते ही त्यांच्या जन्मदिवसाच्या दिवशी. गुरु महादशा येईपर्यंत कसा बसा सोहम जगला. आणि, गुरु महादशा सुरु होताच गुरु मिळाले.

गोंदवलेकर महाराज म्हणजे साक्षात रामच. त्यांनी रामाशिवाय दुसरे काहीही आठवले नाही. रामनामाशिवाय काहीच केले नाही. रामाशिवाय इतर कोणत्याही गोष्टीवर प्रेम केले नाही. त्यांने देह असेपर्यंत आणि, देह पंचातत्वांत विलीन झाल्यावरही लोकांना रामाशी जोडण्याचा प्रयत्न केला. महाराजांच्या प्रवचनातून ते नेहमी एक गोष्ट सांगायचे "मला, स्वत:चा संसार कसा करतात? हे कळले नाही. पण, माझ्या लोकांचा, रामाच्या लोकांचा संसार कसा चालवायचा? हे व्यवस्थित जमते". मी इथे तुमच्यासाठीच आहे. तुम्ही फक्त नाम घ्या. जिथे नाम आहे तिथे राम आहे. तिथेच मी आहे. तुम्ही काळजी करू नका. मी तुमची पूर्णपणे जबाबदारी घेतली आहे. तुम्ही फक्त नाम घ्या, पुढचे मी पहातो. तुम्ही शुद्धीवर, जागेपणी नाम घ्या. मी तुमच्यासाठी, तुम्ही झोपलेले असताना नाम घेईन."

खरेच, तुम्ही झोपताना नाम घ्या. झोपेतून उठल्या उठल्या तुमच्या तोंडी नामच असेल. मी स्वत: अनुभव घेतला आहे. (हे मी लेखक सांगतो आहे. गोंदवलेकर महाराजांचा अनुभव मी स्वत:घेतला आहे).

हळू हळू, पुस्तक वाचताना एक गोष्ट जाणवली, ती म्हणजे - आपण दिवसभरात काय करणार आहोत, हे आधीच पुस्तकात लिहिलेले होते. एखाद्या प्रसंगानंतर आपल्याला काय वाटेल? आपण काय करायला हवे? इत्यादी सगळी माहिती पुस्तकात मिळते. प्रत्येक पुस्तक वाचणाऱ्या व्यक्तीला वाटते "अरे, हे पुस्तक आपल्यासाठी तर नाही लिहिले? आज असेच घडले की माझ्यासोबत". असे अनुभव फक्त मलाच नाही तर, जे कोणी महाराजांच्या सान्निध्यात जातात, त्या सगळ्यांनाच येतात.

गुरूंच्या कृपेचा अंत नसतो.

जेव्हा गोंदवलेकर महाराज म्हणतात "आता किती दिवस शिल्लक आहेत? माहिती नाही. मी पुढे, तुमच्यासोबत शरीराने नसलो तरी तुमच्यासोबतच असेन. "पण जाताना तुमच्याकडून एक वचन घेऊन जातो, की तुम्ही मनापासून नाम घेण्याचा प्रयत्न करत रहाल. आता मी निरोप घेतो".

हे वाचल्यावर, डोळ्यातून पाणी आल्याशिवाय रहात नाही.

जरी महाराज, शरीराने सोहमच्या सोबत नव्हते, तरीही सोहम सोबतच असतात. महाराज म्हणतात "जिथे नाम, तिथे राम, तिथेच मी. जिथे साखर तिथे मुंगळे असणारच की". म्हणजे "तुम्ही नाम घ्या, गुरु तुम्हाला शोधत तुमच्यापर्यंत पोचतील. अगदी, साखर शोधण्यासाठी मुंगळे येतात तसेच." महाराजांने स्वत:ला मुंगळा म्हणून घेतले.

पुढे आयुष्यभर, गुरु स्वत: आपल्याला शोधत आल्याचा, सोहमला खूप आनंद आणि अभिमान वाटणार होता.

**महत्वाची गोष्ट:** गोंदवलेकर महाराजांने कोणता मंत्र सांगितलाय बरं?

"श्री राम जय राम जय जय राम".

किती अक्षरे आहेत या मंत्रात?

आहेत की नाही "१३"?

एखादी व्यक्ती मरण पावल्यावर, तिला अंतिम क्रियेसाठी घेऊन जाताना आपण काय म्हणतो?

म्हणतो की नाही, "श्री राम जय राम जय जय राम"?

का गोंदवलेकर महाराजांने का १३ अक्षरी मंत्र सांगितला होता? सापडले का उत्तर?

तर, आता सोहमला समजले होते "मागे ऑफिसमधल्या साहेबांने एक पुस्तक दिले होते. ते वाचताना एक वाक्य आढळले "झोपतोस काय? अक्कलकोट्ला जा, स्वामीच तुझी आणि माझी भेट घडवून देणार आहेत".

तर, हे म्हणणारे दुसरे तिसरे कोणीही नसून, साक्षात "गोंदवलेकर महाराजच" होते.

इथेच सोहमला त्याचे गुरु भेटले होते.

तर, ०४ फेब्रुवारीला गोंदवलेकर महाराज सोहमच्या आयुष्यात आले होते. रोज त्यांनी लिहिलेली प्रवचने वाचताना वाटू लागले होते "अरे, महाराजांने तर हे पुस्तक कमीत कमी ७०-८० वर्षापूर्वी लिहिले असेल. आज माझ्या आयुष्यात काय घडणार आहे, हे त्यांना एवढ्या पूर्वीच कसे काय माहिती झाले?" खरेच, सोहमला सुद्धा गोंदवलेकर महाराजांच्या कृपेचा अनुभव येऊ लागला होता.

दिवस हळू हळू सरकत होते. मार्च मध्ये पुन्हा एकदा ऑफिसच्या कामासाठी तिरुपतीला जाणे झाले. परत आल्यावर, असेच एकदा कॅलेंडर पहात असताना सोहमला आठवले "वैशाख शुद्ध दशमीला, शुक्रवारी बालाजीचे आणि पद्मावतीचे लग्न झाले होते. कित्येक वर्षांने हा योग पुन्हा जुळून आला होता. मे महिन्यातच वैशाख चालू होणार होता. शुद्ध दशमी नेमकी शुक्रवारीच पडणार होती.

सोहमने पुन्हा एकदा तिरुपतीचे तिकीट काढले. मे महिन्यात पुन्हा एकदा तिरुपतीला जाणे झाले. बालाजीचा लग्न सोहळा पाहायला मिळाला. बालाजीची, लग्नानंतरची पालखी खांद्यावर उचलण्याचे सौभाग्य मिळाले. तिरुपती जवळच, कालहस्ती नावाचे एक अति प्राचीन आणि सुंदर असे मंदिर आहे. इथे पार्वतीचे मंदिर आहे, महादेवाचे मंदिर आहे, नवग्रहांचे मोठे मंदिर आहे. ज्या कोणाच्या कुंडलीत काल-सर्प दोष आहे, त्यांने कालहस्तीमध्ये येऊन राहू-केतूंचे पूजन केले, की त्यांच्या कुंडलीतला काल-सर्प दोष नाहीसा होतो, असे म्हणले जाते.

पुन्हा पद्मावती आणि कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे दर्शन मिळाले. सोहम पुण्याला परत आला.

आता, घरी सोहमसाठी पुन्हा मुली बघण्याच्या कामाला वेग आला होता. प्रत्येक मुलीला नकार देताना सोहम नवीन नवीन कारणे शोधत असायचा. घरातले याच्या मुलींना नकार देण्याला अजूनच कंटाळू लागले होते. आता जवळ जवळ सगळी कारणं सुद्धा संपत चालली होती.

आधीच "मुलाचे ठरलेले लग्न मोडले" म्हणून घरातले चिंताक्रांत होते. त्यातच काही मुलींचे नकार येऊ लागले होते. ज्या मुली होकार द्यायच्या, त्यांना सोहम मुद्दामच नकार द्यायचा. फक्त एकाच आशेवर "मानसी कधीतरी येईल."

दर वेळेस, कोणतीही मुलगी पाहायला येणार असेल तर सोहमला वाटू लागले "ही मानसीच असेल. कदाचित, तिच्यावर लोक पाळत ठेऊन असल्यामुळे ती नाव बदलून येणार असेल." पण, दर वेळेस निराशाच पदरी पडायची. पहायला आलेली मुलगी मानसी नसायची.

आईच्या तब्येतीकडे पाहून वाटायचे "जाउदे, करून टाकू लग्न". तसेच, सगळया गर्ल-फ्रेंड्स जरी मदत करत असल्या, तरी त्यांना मनातूनच आशा होतीच "याचे लग्न आपल्याबरोबरच होईल". सोहमचे लग्न न झाल्यामुळे, या सगळया जुन्या गर्ल-फ्रेंड्सचे लग्न सुद्धा खोळंबले होते. "आपले लग्न झाले तर या सुद्धा लवकरच लग्न करतील" असे समजून, वाट पाहून पाहून सोहमने लग्न करायचा निर्णय घेतला.

शेवटी पुन्हा एकदा सोहमचे लग्न ठरलेच. "गेल्यावेळीप्रमाणेच, होण्याअगोदरच हे सुद्धा लग्न मोडले जाईल" असे सोहमला वाटले. "पण, समजा हे लग्न नाही मोडले तर काय?"

जुलै मध्ये साखरपुडा होणार होता. अजून एक महिना शिल्लक होता. मानसी येण्याची शक्यता धूसर होत चालली होती. मन मानसीचा जप करत होते पण, मानसी येत नव्हती.

दरम्यान, घर घेण्यासाठी जे कर्ज मंजूर झाले होते. ते कर्ज उचलण्याची मुदतसुद्धा संपत आली होती. कर्ज मंजूर झाल्यापासून, ६ महिन्याच्या आत, घर शोधून, कर्ज उचलून, घर विकत घेणे गरजेचे होते. असे न केल्यास, कर्जाची सगळी प्रक्रिया पुन्हा करावी लागणार होती.

पण, घर घेण्याचा अनुभव नसल्यामुळे काहीच निर्णय होत नव्हता. अशातच एक आशेचा किरण दिसला. आशेचा किरण म्हणजे, टिंगरे नगरमधेच यांना एक घर आवडले. बिल्डींग बांधणारे बिल्डरसुद्धा चांगले मिळाले. त्यांने सगळी कागदपत्रे तयार करण्यापासून, घर सोहमच्या भावाच्या नावावर होईपर्यंत सगळी जबाबदारी निभावली. कर्ज मिळाल्यावरसुद्धा, त्यांचे एक लाख रुपये देणे बाकी असतानाही, ते एक वर्ष थांबण्यासाठी तयारसुद्धा झाले.

अशा प्रकारे सोहमच्या कुटुंबाला नवीन, मोठे घर मिळाले. देवाने इथेही, सोहमची अजून एक इच्छा पूर्ण केली होती. ती म्हणजे - मागे एकदा सोहम देवाला म्हणाला होता "देवा, असे कुठे घर मिळेल का, जिथून ऑफिसला जाताना एकही सिग्नल लागणार नाही. आणि ऑफिसला पोचायला उशीर होणार नाही"?

पुण्यात असे घर मिळणे सोहमला शक्य वाटले नाही. पण, देवाला काहीच अशक्य नसते. खरेच, टिंगरे नगर पासून भोसरीपर्यंत अंतर आहे १५ किलोमीटर. पण दिघीमार्गे गेले तर, मध्ये कुठेही एकसुद्धा सिग्नल लागत नाही. आणि घराचा नंबर आहे १०३. म्हणजे, ० काढून टाकले तर १३च. इथेही १३चा आकडा आहेच की. आणि हो, मावस भाऊ म्हणल्याप्रमाणे, जुन्या घरापासून पश्चिम दिशेलाच नवीन घर आहे.

पण, ऑफिसला जाताना रस्त्यात एकही सिग्नल लागणार नसला, तरी यामुळे सोहम ऑफिसला लवकर थोडीच पोचणार होता?

असो, सोहम आता ऑफिसमध्ये मॅडमचा लाडका कर्मचारी झाला होता. त्या सोहमशी चांगले

बोलायच्या. नेहमी सोहमवर विश्वास ठेवायच्या. त्यांने सोहमचे प्रमोशनसुद्धा करून टाकले. आता सोहम मॅनेजर झाला होता.

सोहमचे दुसरे साहेब म्हणायचे "सोहम, तू लोकांना मंत्रमुग्ध करून टाकतोस". सोहमला त्यांच्या बोलण्याचा अर्थ समजत होता. पण, उत्तर काय द्यायचे ते समजत नव्हते. (जो माणूस बोलतच नाही, तो कसा काय कोणाला मंत्रमुग्ध करू शकेल? हे सगळे कृष्णाने केले होते.)

जुलैमध्ये पुन्हा एकदा सोहमचा साखरपुडा झाला. साखरपुडा अतिशय थाटामाटाने पार पडला. सोहमचा थाट पाहून काकू म्हणाली "सोहम, ऐश आहे तुझी. तुझ्या कुंडलीत "राजयोग" आहे ना." "आपली कुंडली काकुला कशी काय समजली?" हे मात्र अनुत्तरीतच राहिले. आता लग्न होईपर्यंत जरी मानसी आली, तरीसुद्धा सोहम हा साखरपुडा मोडायला तयार होता.

महिन्याने श्रावण महिना सुरु झाला. पुण्यातल्या घराची वास्तुशांती पैशाअभावी होऊ शकली नव्हती. पण, आता व्यवस्थित पैसा हाती येऊ लागला होता. नवीन घराची वास्तुशांती करायचे ठरले. त्याबरोबरच, गेली कित्येक वर्षं आईने फक्त १६ सोमवारचे व्रतच केले होते. परंतु, महादेवाला एकदाही अभिषेक घडला नव्हता. वास्तुशांती बरोबरच, महादेवासाठी रुद्राभिषेक सुद्धा करण्याचे ठरवले.

"सोहमचे लग्न ठरले आहे" हे अजूनही, ऑफिसमध्ये कोणालाच सांगितले गेले नव्हते. वास्तुशांतीच्या दिवशी सोहमची होणारी पत्नी येणार होती. आणि तसेच, ऑफिसमधले सगळे लोक सुद्धा येणार होते. पण त्यादिवशी, सोहमची होणारी पत्नीच नव्हे, तर सोहमची देवी, राधा, सीतासुद्धा, वास्तुशांतीला आली होती.

सोहमच्या दोन्हीही पत्नी (एक होणारी आणि दुसरी होऊ न शकलेली), एकाच दिवशी त्यांच्या घरी उपस्थित होत्या. पण, हे सोहम व्यतिरिक्त कोणालाही माहिती नव्हते. सोहमच्या होणाऱ्या पत्नीची तर ओळख झाली सगळ्यांशी पण........ (खरे तर मानसी नव्हती आली. पण, येणाऱ्या पाहुण्यांपैकी कोणीतरी मिनरल वॉटरची बाटली आणली होती. बाटलीवर नाव होते "मानसी मिनरल वॉटर).

मी बाटलीत बुडून गेलो होतो, जेव्हा तू गेलीस...
अचानक तू कशी काय, बाटलीच बनून आलीस?

तू नसलीस म्हणून काय? बाटलीनेच काम भागवले...
जणूकाही तू आल्याचे, स्वप्नच पुन्हा जागवले....

आलीच आहेस तर आत ये, दोन क्षण बरोबरच जग.....
पाणी तुझ्याच बाटलीतले, किती गोड आहे बघ.....

तू येणार नव्हतीस म्हणून, बाटलीच जपून ठेवली होती.....
नजरेस कोणाच्या पडू नये म्हणून, माळ्यावर लपवून ठेवली होती....

तुला वाटते राधा कृष्ण, पुन्हा कधीच भेटले नसतील?
भालका तीर्थी जाऊन पहा.....कृष्णाचे चरण आणि राधेचे अश्रूच दिसतील....

मनामध्ये तुझ्याशिवाय, कोणालाही ठेवणार नाही.... (फक्त कवितेपुरतेच बरं का. कारण, लग्न ठरलय आता...)

तर, मनामध्ये तुझ्याशिवाय, कोणालाही ठेवणार नाही
तुझ्या बाटलीतल्या पाण्याशिवाय, कधीच मी जेवणार नाही.....

असो, महादेवाची पिंड जुन्या घरून आणली होती. ती आता परत न्यायची होती. सोहम आणि बाबा दुचाकीवरून निघाले. महादेवाची पिंड परत नेत असताना, त्यादिवशी खरेच सांगतो, इतका मुसळधार पाऊस पडला होता, की जणू काही पाऊसच महादेवाला जलाभिषेक करण्यासाठी, आतुरतेने गेले कित्येक दिवस बरंसला नव्हता. आणि जसा महादेव गाडीवर बसला, तसा इतका मुसळधार पाऊस पडला, की दोन पिशव्यांच्या आत, प्लॅस्टिकच्या पिशवीत ठेवलेल्या डब्यात ठेवलेली, महादेवाची पिंड जेव्हा बाबांनी बाहेर काढली, तेव्हा ती पूर्णपणे पाण्याने भिजली होती.

दुसऱ्याच दिवशी सोहमला आणि त्याच्या एका साहेबांना कलकत्त्याला जायला लागले.

मागे एकदा सोहमने त्याच्या कलकत्त्याच्या गर्ल-फ्रेंडला वचन दिले होते "मी कलकत्त्याला आलो, की नक्की तुला भेटेन.". सोहमने कलकत्त्याला पोचल्यावर तिला फोन केला. पण, फोन तिच्या आईने उचलला. असो, सोहमने त्याचे वचन तर निभावले होते.

३ दिवस कलकत्त्याला राहिल्यावर, सोहमच्या साहेबांना पुढे छत्तिसगढला जायचे होते. सोहम एकटाच होता. सोहमने ठरवले "आपण वाराणसीला जायचे." आत्तापर्यंत, बाबांचे, आईचे आणि भावाचे, असे तिघांचेही वाराणसीला जाणे झाले होते. फक्त सोहमचेच वाराणसीला जाणे बाकी होते. जणू काही, महादेवाने रुद्राभिषेक मान्य केला होता. आणि प्रसाद म्हणून सोहमला वाराणसीला दर्शन घेण्यासाठी बोलावले होते.

सोहम पश्चिमेकडून म्हणजेच, पुण्यावरून निघून थेट पूर्वेला कलकत्त्याला गेला होता. तिथून उत्तरेला म्हणजे, वाराणसीला पोचला. काशी विश्वेश्वराचे दर्शन घेऊन पुन्हा मथुरेला पोचला. मथुरेवरून दिल्लीला पोचला आणि दिल्लीवरून विमानाने परत पुण्याला पोचला.

७ दिवसांपैकी ३ दिवस तो कलकत्त्यात राहिला. फक्त ४ दिवसात, पुणे ते कलकत्त्याचा २८ तासांचा प्रवास, कलकत्ता ते वाराणसी १४ तास, वाराणसी ते मथुरा १२ तास, मथुरा ते दिल्ली ४ तास. दिल्ली ते पुणे २ तास. असा ६००० किलोमीटरचा प्रवास, देवाने सोहमकडून करून घेतला होता. मध्ये महादेवाचे, कृष्णाचे दर्शन सुद्धा घडले होते.

पुण्याला परत आल्यावर, "लग्नात मदत होईल" म्हणून आज्जीला आणायला सोहम गावी पोचला.

जसे सोहमला गोंदवलेकर महाराज गुरु म्हणून मिळाले होते. तसेच, मामाला 'समर्थ रामदास' गुरु म्हणून मिळाले होते.

मामा सोहमला म्हणाला "हे घे दासबोध, कोणतेही पान काढ आणि वाच. तुझ्या प्रश्नाचे उत्तर मिळून जाईल."

सोहमने एक पान काढले आणि वाचू लागला. नेमके, त्याची नजर पडली त्या ओळीवर लिहिले होते "आणि, शुभमंगल सावधान म्हणताच, समर्थांनी भर लग्न मंडपातून धूम ठोकली."

या वाक्याचा अर्थ होता की, सोहमने हे लग्न करू नये, मोडून टाकावे. पण आत्तापर्यंत, पहिला साखरपुडा मोडल्याची बातमी सगळीकडे पसरली होती. सगळीकडे नाचक्की झालीच होती. दुसराही साखरपुडा मोडला असता, तर आई-बाबांना जीवच द्यावा लागला असता.

आता फक्त "मानसी आली तरच हे लग्न मोडायचे" असे सोहमने ठरवले होते.

लग्न नोव्हेंबर मध्ये ठरले होते. सोहमचा वाढदिवस असतो ३० नोव्हेंबरला आणि लग्न ठरले होते २९ नोव्हेंबरला. "लग्न मानसीनेच ठरवून दिले की काय?" असे वाटत होते.

अशातच, एका शनिवारी कॅलेंडर पहात असताना, सोहमची नजर एका शब्दावर पडली. तिथे लिहिले होते "शनिदर्शन". "देवाचा काहीतरी संकेत असेल" असे समजून सोहम शनी मंदिरात पोचला. शनी महाराजांचे दर्शन घेताना, डोळ्यासमोर फणा काढलेला नाग दिसू लागला. सोहम शनी महाराजांना म्हणाला "महाराज घाबरवता कशासाठी?" आता तर मी चांगला व्यक्ती बनण्याचा प्रयत्न करतो आहे.".

पण, नाग दिसण्याचा अर्थ सोहमला घरी आल्यावर समजला.

अचानक सोहमला, ज्या मुलीबरोबर लग्न ठरले आहे, तिची पत्रिका पाहण्याचे सुचले. सोहमने तिची पत्रिका तयार केली. पत्रिका तपासत असताना सोहमला समजले. मुलीच्या पत्रिकेत राहू महाराज पंचमस्थानी म्हणजे, पाचव्या घरात होते. राहू महाराज पाचव्या स्थानात असणे म्हणजे, संतती (मूल बाळ) होण्यात अडचण. राहू महाराज म्हणजे नागाचे तोंड असे मानले जाते.

एवढेच नाही तर, सोहमच्या स्वत:च्या कुंडलीतसुद्धा राहू महाराज पंचमस्थानीच होते.

याचा अर्थ असा होता की, दोघांच्याही कुंडलीत राहू पंचम स्थानी असल्यामुळे, दोघांनाही मूल होण्यात अडचण होऊ शकणार होती. जोडीदारापैकी एकाच्या कुंडलीत जरी राहू महाराज पंचम स्थानी असले, तरी काही जणांना मूल-बाळ होण्यात अडचण होते. इथेतर, सोहमच्या आणि त्याच्या होणाऱ्या बायकोच्या, अश्या दोघांच्याही कुंडलीत राहू महाराज पंचम स्थानी होते.

म्हणूनच, देवाने सोहमला संकेत देऊन शनी दर्शनाला पाठवले आणि पुढच्या संभाव्य धोक्याची सूचना दिली.

पण, सोहमने ठरवले होते.

१. देवा, मानसी आली तरच मी हे लग्न मोडेल. नेहमीच माझ्यामुळे आई-बाबांची इज्जत वेशीला टांगली जाते. त्यामुळे, मला हे लग्न करण्याशिवाय पर्याय नाही. आधीचे ठरलेले लग्न मोडल्यामुळे आई-बाबा आधीच दु:खी आहेत. मी त्यांना अजून दु:खात टाकू शकत नाही.

२. असेही, तूच माझा पाठीराखा आहेस. तुला काय शक्य नाही. कुंडलीमध्ये काहीही लिहिले असले तरीही, तुझ्याच कृपेने मला मुल होईल.

काही दिवसांने सोहमला पुन्हा सांगलीला जायचा योग आला.

सांगलीच्या एस.टी स्थानकावर उतरल्या उतरल्या, एक कागद उडत उडत हातात आला. त्यावर लिहिले होते "बाबा, तुम्ही आम्हाला मदत करू शकता का?" (daddy, can you help us?). याचा अर्थ काय होता? तेवढ्यात, तथास्तु साडीच्या जाहिरातीचा बोर्ड दिसला. जणू काही, देवच तथास्तु म्हणाला होता.

सोहमची ट्यूब पेटली. मागे कधीतरी, मानसीच्या वडिलांना हृदय विकाराचा झटका आल्याची बातमी कानावर आली होती. (सर, तुम्ही ठीक असावात हीच इच्छा आणि ही बातमी खोटी असावी). मग, तिच्या वडिलांचे काही.....

असो वा नसो, आपण मदत करायलाच हवी. सांगलीला गेल्यावर नरसोबाची वाडी करणे ठरलेच होते. सोहमने दत्त-गुरूंच्या चरणी प्रार्थना केली. पण कदाचित "आपण ऐकलेली बातमी खोटी असेल". "तसेच, हे सगळे आपल्या मनाचे खेळ असू शकतात" म्हणून त्याने मानसीच्या नावानेच थोडेसे पैसे मंदिरात द्यायचे ठरवले. त्याने काही पैसे दिले आणि पावती घेतली. त्यावेळेस जे सुचले, ज्या मन:स्थितीत सोहम होता, त्याप्रमाणेच सोहमने केले.

तर, सोहम जेव्हा नरसोबाच्या वाडीला पोचला. तेव्हा, रात्रीचे ११ वाजले होते. पण "देवा, तूच माझ्यासाठी झोपण्याची काहीतरी सोय करूनच ठेवली असशील" असा विचार करून सोहम मंदिराजवळ पोचला. खरेच, त्या रात्री फक्त ५० रुपयात, सोहमची मस्तपैकी मंदिराच्याच धर्मशाळेतच झोपायची सोयसुद्धा झाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी दर्शन घेताना, सोहमची नजर एका बोर्डावर पडली. तिथे लिहिले होते "तुला माझा आशीर्वाद आहे. तुला मुलगा होईल."

सगळयात मोठी चिंता दत्तगुरुंने जाणून हरली होती.

पुढे, "गेल्या कित्त्येक वर्षांत आपण गोंदवलेला गेलो नाहीत". हे आठवून सोहमने, आपल्या गुरूंकडे गोंदवल्याला जायचे ठरवले.

कळत असल्यापासून सोहम पहिल्यांदाच गोंदवलेला गेला होता. तसे, आठवीत एकदा सहल गेली होती. पण तेव्हा, दर्शन घेण्यात फार काही रस नव्हता.

या वेळेस मात्र गोंदवलेकर महाराजांचे दर्शन घेताना, "रामाचे प्रेम म्हणजे काय असते?" हे समजून आले. महाराजांची रहायची खोली, महाराज ध्यान करत होते ते ठिकाण, महाराज प्रवचन सांगायचे ते ठिकाण, महाराजांचे समाधीस्थळ, महाराजांचे मंदिर अशा प्रत्येक ठिकाणी "महाराजांचे रामावर किती प्रेम होते?" हे समजून येते.

गोंदवलेकर महाराज म्हणजे रामाच्या प्रेमाने भरलेला रसगुल्ला, गुलाबजामून. रसगुल्ला कसा असतो? तर, साखरेच्या गोड पाकाने भरलेला खव्याचा गोळा. महाराज पण तसेच. खव्याचा गोळा म्हणजे महाराज स्वत: (अगदी मऊशार लोण्याच्या गोळयासारखे). आणि साखरेचा पाक म्हणजे, त्यांचे रामाबाद्दलाचे प्रेम, त्यांची आपणा सर्वांना रामनामाचे प्रेम लावायची तळमळ. महाराज नेहमी म्हणायचे "माझ्यातून जर रामाचे प्रेम काढून टाकले तर मी काहीच नाही." अगदी तसेच, जर रसगुल्ल्यातून पाक काढून घेतला, तर तो कसा बेचव लागेल?. यावरूनच महाराजांचे रामाबद्दलचे प्रेम व्यक्त होते.

गोंदवल्याला गेल्यावर, महाराजांचे दर्शन घेताना डोळयातून अश्रू आल्याशिवाय राहत नाहीत. महाराजांने देह ठेवला तेव्हा स्वत: राम रडला असेल.

पुढे सोहमने, महाराजांच्या रामाचेसुद्धा दर्शन घेतले. परत निघत असताना एक कागद, उडत येऊन समोर पडला. त्यावर लिहिले होते "मानसी पेंटर्स". आणि शेजारीच, "दिल्या घरी तू सुखी रहा" या झी मराठी या वाहिनीवर लागणाऱ्या मालिकेची जाहिरात आणि पोस्टर होते".

जणू काही मानसीनेच सोहमला सांगितले होते "आपली भेट अशक्य आहे. आता तू लग्न कर आणि सुखी रहा".

गेली ३ वर्ष जिची वाट पाहिली, तिने या अश्या वळणावर येऊन माघार घेतली होती. मानसी, खरेचं तिने म्हणल्याप्रमाणे राधा झाली होती. तिच्या कृष्णाला कधीही न भेटण्यासाठी ती तयार झाली होती. पण, कृष्णाला हे नवीनच होते. त्याला तर हे आजच, आणि तेही गुरूंच्या दारी समजले होते "मानसी त्याला कधीही भेटू शकणार नाही."

सोहम पुन्हा पळत पळत रामाकडे गेला. आज सोहम रामाशी भयंकर भांडण करणार होता. मूर्तीसमोर जाऊन सोहम थेट रडायलाच लागला. सोहम म्हणाला "देवा, जर ती मला भेटू शकणार नव्हती. तर, गेली तीन वर्षं का रे मला स्वप्न दाखवलीस?" मी तर प्रत्येक वेळेस माघार घायला तयार होतो. पण आज या अश्या वळणावर, जेव्हा माझ्या लग्नाला फक्त एकच महिना शिल्लक आहे, तेव्हा तू मला सांगतोस होय? "म्हणे दिल्या घरी तू सुखी रहा."

घरी येऊन "तुमचा मोठा मुलगा रामासारखा आहे, हे सांगणारा तर तूच होतास". मी म्हणालो होतों का, की "मी राम आहे?" तूच म्हणालास. मग का तू माझ्या सीतेची आणि माझी भेट नाही घडवलीस?" तुझे आणि माझे आयुष्य एकसारखे होते, म्हणून तू म्हणाला होतास का?"

सोहम रामासमोर खूप रडला. राम जणू काही सोहमची होणारी उलघाल हसून हसून पहात होता. जणू काही राम म्हणत असावा "अरे, थोडी प्रतीक्षा कर आणि तुला सगळे समजेल." शेवटी, "जे काही होते, ते देवाच्याच इच्छेनेच होते" हे समजून सोहम घरी परत निघाला.

रामाशी भांडताना सोहम एक गोष्ट विसरला होता. ती म्हणजे "जर हाय-फाय मुलीशी सोहमचे लग्न झाले, तर ती घरातली काम करेल का? असा संशय सोहमला आणि आईला येत होता." अर्थातच, सोहम हा मध्यमवर्गीय कुटुंबातला मुलगा आणि मानसी म्हणजे अतिशय श्रीमंत घरातली. त्यामुळे, तीने घरातली जबाबदारी सांभाळली असती का?" हा प्रश्न अनुत्तरीतच राहिला.

कदाचित, सोहमला जरी हा प्रश्न पडला नसेल. तरी, मानसीला सोहमच्या आईचे बोलणे आणि विचार माहिती असावेत, आणि म्हणूनच तिने प्रेमाचा त्याग केला असावा.

'कोल्ह्याला द्राक्ष आंबट' ही म्हण इथेच चांगली रुजू होऊ शकते. जर, एखादी आवडती वस्तू, गोष्ट आपल्याला मिळू शकली नाही. तर त्या वस्तूतले, त्या व्यक्तीतले दुर्गुण. किंवा ती व्यक्ती, वस्तू "आपल्यासाठी कशी योग्य नव्हती" हे आपल्याच मनाला सांगून, मनाचे सांत्वन करणे आता हळू हळू सोहमला जमणार होते.

असो, लग्नपत्रिका निवडायला जाताना सोहमच्या भावाची गाडीच पंक्चर झाली. जणू काही देवच कोणत्या ना कोणत्या रुपात संकेत देऊन हे लग्न थांबवायचा प्रयत्न करत होता. पण, आता पुढे टाकलेले पाऊल मागे फिरणे शक्य नव्हते.

ऑक्टोबर संपला. नोव्हेंबर लागला होता... दिवाळी आली होती.... पत्रिका वाटून झाल्या. लग्नाची बहुतेक तयारी पूर्ण झाली होती. मानसी आज येईल, उद्या येईल असे वाटत होते. पण, मानसी काही येत नव्हती.

एक दिवस एस.एम.एस आला "तू आमची काळजी करतोस, याचे नाटक करण्यासाठी धन्यवाद". तळपायाची आग मस्तकात पोचली होती. "मी नाटक करतो काय?" थांब आता, तुला दाखवतो".

आज धन-त्रयोदशीचा (१३वा) दिवस होता. १३ नोव्हेंबरच होता. (१३.११.२०१२). तू भेटून ३

वर्ष पूर्ण झाली होती. एव्हाना, 'देवाचे टायमिंग अफलातून असते' हे सोहमला समजले होते. सोहमने सुद्धा, देवाच्याच स्टाईलने आजचा योग साधला.

आजच मी तुझ्या घरी आलो होतो. घराला आतून कडी होती. घराबाहेर पणती लावलेली होती. नरसोबाच्या वाडीला, तुझ्या नावाने फाडलेल्या पावतीची झेरॉक्स मी तुझ्या घराच्या दाराबाहेर कडीला अडकवली. त्या वर लिहिले होते "मी काळजी केली होती" (I cared). बास, याशिवाय काहीच नाही. (हे देवानेच करून घेतले १३च्या आकड्यालाच).

माझ्या तत्त्वांप्रमाणे, त्याच्यापुढे मी कधीच तुझ्या घराशेजारी फिरकलो नाही. मला समजले होते, कोणीतरी मला संमोहित करते आहे. मी तुला इंटरनेटवर शोधले असते, तर कदाचित तुझी काहीतरी माहिती मला मिळालीच असती. पण, माझ्याबरोबरच ही माहिती, मला संमोहित करणाऱ्या व्यक्तीलासुद्धा समजलीच असती. माझ्या आत असलेल्या, मला संमोहित करत असणाऱ्या व्यक्तीला, तुझ्याबाद्दलची काहीही माहिती मिळू नये म्हणून फार प्रयत्न करावे लागले. मनावर अगदी कडेकोट बंदोबस्त ठेवावा लागला. चुकूनही तुला शोधले नाही मी इंटरनेटवर.

एक एक दिवस पुढे सरकत चालला होता. लग्नाचा दिवस जवळ येत होता. लग्न होते केसरीवाड्यामध्ये. "केसरीवाडा म्हणजे, श्रीमंतांची लग्न होतात ते लग्न कार्यालय", असे सोहमला आणि त्याच्या आईला वाटत होते. कधीच स्वप्नातही विचार केला नव्हता की "केसरीवाड्यात सोहमचे लग्न होईल."

पण, देव म्हणजे देव असतो. एखाद्याच्या सगळया इच्छा पूर्ण करायच्या मागे जर देव लागला. तर तो काहीच कसर सोडत नाही. अगदी लक्षात ठेऊन तो आपल्या भक्तांच्या इच्छा पूर्ण करतो.

दिवाळी जवळ आली होती. सोहमला ऑफिसच्या कामानिमित्त कर्नाटकमध्ये जावे लागले. कर्नाटकमध्ये बेळगावला जायचे होते. बेळगाववरून कोल्हापूर जवळच असल्यामुळे, सोहमने महालक्ष्मीच्या दर्शनाला जायचे ठरवले. साधारणपणे, रात्री १० वाजता सोहम कोल्हापूरला पोचला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच, महालक्ष्मीमातेचे दर्शन घेताना जेव्हा सोहम साष्टांग नमस्कार घालू लागला. तेव्हा अचानक, कधी नव्हे तो मानसीचा चेहरा डोळ्यासमोर येऊ लागला. गेल्या अडीच-तीन वर्षात सोहम, मानसी कशी दिसते हे विसरू लागला होता. पण कोल्हापूरला, आणि तेही महालक्ष्मीचे दर्शन घेतानाच, मानसीचा चेहरा डोळ्यासमोर का येतो आहे? हे काही सोहमला समजू शकले नाही.

दुसऱ्या दिवशी ऑफिसमधल्या सरांने विचारलेच "काय सोहम, झाले का देवीचे दर्शन?"

अरे, सरांना कसे काय समजले "मला महालक्ष्मीचे दर्शन घेताना मानसीच दिसत होती?" नक्की काय भानगड आहे? हे सोहमला समजेनासे झाले होते." हे सरसुद्धा देवच होते की काय?

कदाचित, मानसी खरेच महालक्ष्मी असावी. किंवा महालक्ष्मीचा अंश किंवा अवतार तरी असावी.

असो, सोहमला, ऑफिसमधले सगळे सर सुद्धा देव वाटू लागले होते. एक तर ऑफिसमधल्या लोकांना, सोहमच्या मनात काय आणि कसे चालले आहे हे समजत होते. दुसरी गोष्ट म्हणजे, सोहम काय बोलतो हेही त्यांना समजत होते.

महत्वाचे म्हणजे, ऑफिसमधल्या प्रत्येक सरांचे नाव आणि वागणे पाहिले तर, ते नक्कीच कोणत्यातरी देवाचा अंश वाटत होते.

कंपनीच्या मालकांचे, नावाप्रमाणेच वागणेदेखील अगदी दत्त-गुरुंसारखे होते. त्यांचे वय होते ९० वर्ष. आणि तरीही, ते रोज ऑफिसमध्ये येऊ शकत होते. तसेच, कोणाला काय कामे वाटून दिली आहेत? हे ९०व्या वर्षीसुद्धा त्यांना लक्षात रहात होते. (मी वयाची फिफ्टी तरी क्रॉस करेन का?, माहिती नाही. आणि केलीच तर, नक्कीच डोके शाबूत राहील की नाही? हे सांगता येत नाही.).

तीन अजून सर होते कंपनीत. त्या तिघांचा तर ग्रुपच होता. ते तिघे म्हणजे, साक्षात ब्रम्हा-विष्णू-महेशच वाटू लागले होते सोहमला. तसेच, अजूनही सोहमचा त्या नवीन आलेल्या मॅडमवर विश्वास बसत नव्हता. मॅडम आसपास असल्या की, सोहम स्वत:च्याच मनाला म्हणायचा "ही मोठी लोकं आहेत, यांच्या नादी लागू नकोस".

काही दिवसांने मॅडमच सोहमला म्हणाल्या "सोहम, आम्ही तुझ्या नादी नाही लागणार बरं का?"

म्हणजे, मॅडमसुद्धा देव होत्या की काय?

जणू काही, सगळी देव मंडळी इथेच जमली होती.

एखाद्या राक्षसाला चुकून देवांच्या राज्यात एन्ट्री मिळावी. असे काही सोहमला स्वत:कडे पाहून वाटू लागले होते.

असो, शेवटी तो दिवस आला, सोहम लग्नासाठी तयार झाला. मन मानत नव्हते, "क्षणोक्षणी पळून जावेसे वाटत होते. पण, "नेमका मी पळून जायचो आणि इकडे लग्नात, जिच्याशी लग्न ठरले तिच्याऐवजी मानसीच उभी असायची."

२८ नोव्हेंबर - आज लग्नाच्या आधीचा दिवस होता. संध्याकाळी मुलीचे काका घरी आले. आम्ही कारमध्ये बसून लग्नस्थळी पोचलो. आज मीच उत्सवमूर्ती होतो. सगळ्यांचा गराडा पडला होता सभोवताली. एक एक विधी उरकले जात होते. नजर तुलाच शोधत होती. लग्नाच्या खोलीचा प्रत्येक कोपरा न कोपरा मी तपासत होतो. कोण जाणे, कुठल्यातरी कोपऱ्यात तू असलीस तर? पण एकदाही तू दिसली नाहीस. "कदाचित आजच्या ऐवजी, उद्या तू येशील आणि माझे लग्न तुझ्याबरोबरच होईल" अशी आशा वाटत होती. १०.३०-११ वाजले असतील. सगळे लोक झोपायला गेले होते.

मला मात्र झोप येतच नव्हती. उद्या तूच येशील. माझे लग्न तुझ्यासोबतच होईल. असे मी वारंवार

मनाला समजावत होतो. स्वत:लाच फेका मारून मारून सांगत होतो, "उद्या माझे लग्न मानसीबरोबरच होणार आहे". (मी राम होतो ना, मी बोललेले खरे होणार होते). फेका मारता मारता कधी झोप लागली ते कळलेच नाही.

सकाळी पाच वाजताच कोणीतरी उठवले. हळदी समारंभाचा विधी होणार होता. मी पांढरा कुर्ता-पायजमा घालून येऊन बसलो. रात्री स्वत:लाच मारलेल्या फेकांमुळे, आणि आता मी राम असल्यामुळे मला आत्मविश्वास होता "शेजारी तूच येऊन बसणार आहेस. मी तुला हळदीने पूर्ण रंगवून टाकणार आहे".

तेवढ्यात मनामध्ये, "मेंदीच्या पानावर" मधले गाणे आठवू लागले -

"अजून तुझे हळदीचे, अंग अंग पिवळे ग.....
अजून तुझ्या डोळयातील, मोठेपण कोवळे ग...... मेंदीच्या पानावर....मन अजून झुलतय ग..."

खरंच, तुझ्या डोळयातील मोठेपण आज समजत होते.

तितक्यात कोणीतरी शेजारी येऊन बसले. मी मोठ्या आशेने वळून पाहिले. तू नव्हतीस, जिच्याशी लग्न ठरले, तीच मुलगी होती. मी मारलेली फेक खोटी झाली होती. पण, एक फेक खोटी झाली म्हणून काय?, माझे फेका मारणे बंद होईल, असे वाटते का?

असो, सकाळचा नाष्टा वगैरे आटोपला. आता अंघोळ करून, सप्तपदी वगैरे साठी आवरून तयार व्हायचे होते. मी बाथरूम मध्ये देवाला शेवटचे विनवले "देवा, सप्तपदिला तरी मानसीच असू दे रे बाबा. नाहीतर, काहीही कर, आणि हे लग्न मोडून टाक."

पण, "मानसी नसली तर?" "लग्न करावेच लागेल". ठीक आहे, लग्न करू. पण, शेवटचे रडून तर घेऊ". त्या दिवशी खरंच सांगतो. मी बाथरूम मध्ये धाय मोकलून रडलो होतो.

मी बाहेर आलो, तयार झालो. स्टेजवर येऊन थांबलो. कोणीतरी साडी घालून बाहेर आले. डोक्यावर पदर घेतला होता. ती स्टेजवर आली. पदर सरकला आणि, "आयुष्य तुझ्याविना काढायचे आहे", हे मला समजले होते.

खर सांगतो त्यानंतर, तुझ्या आठवणीत जळलो नाही.......
घरची अब्रू हातात होती.....पुन्हा मागे वळलो नाही...

वाटले नव्हते पुन्हा तू, आयुष्यात या परत येशील.....
गोष्टीमध्ये प्रत्येक माझ्या, थापा मारताना साथ देशील...

तर आज, २९ नोव्हेंबर २०१२ रोजी सोहमचे लग्न झाले होते. (१ डिसेंबर रोजी पहिल्या गर्ल फ्रेंडचे लग्न झाले) अर्थातच, मानसी बरोबर नव्हते झाले. संध्याकाळी सून घरी आली. पुढचे दोन-तीन दिवस, सगळे विधी पूर्ण करण्यात गेले. जागरण-गोंधळ, फलशोधन वगैरे सगळे विधी पूर्ण झाले.

गोष्टीमध्ये ठीक आहे. पण, जर मी खरंच देव असतो, तर तुला नक्कीच शोधले असते.

दोन डिसेंबरला बायकोला रीतीप्रमाणे माहेरी पाठवले. पुढचे १३ दिवस सोहम एकटाच होता. बायको थेट १४ डिसेंबरला परत सासरी आली. पुन्हा पुढचे ४-५ दिवस ओळखींच्या लोकांकडे जाण्यात गेले. गेली कित्येक वर्ष, कोणीही ग्रामदैवतला म्हणजेच, डोंगरकिन्हीला गेले नव्हते. सोहमचे पूर्ण कुटुंब, २० डिसेंबर रोजी ग्राम-दैवताला जाऊन आले.

लगेच ५-६ दिवसात, सोहमला कामानिमित्त हैदराबादला जावे लागणार होते. बायकोला सोबतच घेऊन जावे म्हणून, बायकोला उमरग्याच्या मावशीकडे सोडून सोहम पुढे हैदराबादला गेला. २९ डिसेंबर ते ७ जानेवारी, असे १० दिवस बायको उमरग्यालाच होती. हैदराबादवरून परत येताना तुळजा भवानी आईचे दर्शन घडले. असे सोहम आणि त्याची बायको ७ जानेवारीला पुण्यात परत आले.

जसे सोहम आणि त्याची पत्नी भवानी मातेचे दर्शन घेऊन तुळजापुरवरून परत आले. तसे, सोहमच्या बाबांना, पुण्यातल्या भवानी पेठेतल्या "भवानी माता" मंदिरात पुजारी म्हणून नोकरी मिळाली. देवीने अजून एक प्रसाद दिला होता.

अशातच सोहमला, पुन्हा एकदा राजस्थानला जाण्याचा योग आला. यावेळेस, ऑफिसमधल्या एका कर्मचाऱ्याबरोबर, राजस्थानमधल्या 'सांचोर' या गावी जायचे होते. २५ मार्च ते २९ मार्च, या काळात सोहम राजस्थान मध्ये होता. सोहमने विचार केला "आपण फक्त दोनच वेळा अजमेरला जाणे बाकी आहे. एकूण सात वेळा अजमेरला जाणे झाले, की एका मक्केच्या यात्रेचे पुण्य मिळते". काम संपले की सोहम सांचोरवरून अजमेरला जाणार होता.

पण ते दिवस होळीचे होते. होळीच्या दिवसात, राजस्थानमध्ये कोणीही प्रवास करत नाही. सगळे राजस्थानी लोक राजस्थानमध्ये परत येतात. कोणीही राजस्थानमधून बाहेर पडत नाही. त्यामुळे काम संपल्यावर, सोहमला काही अजमेरला जाण्यासाठी बस मिळेनाशी झाली होती.

शेवटी, अजमेरला जाणे रद्द करून सोहम आणि त्याचा पार्टनर अहमदाबादच्या दिशेने निघणार होते. बस मध्ये बसण्याअगोदर सोहम "ख्वाजा गरीब नवाजांना" म्हणाला. "देवा, तुझी इच्छा असेल, तरच मी अजमेरला आजच पोहोचेन. आणि तुझी इच्छा नसेल, तर मी अहमदाबाद मार्गे पुण्याला परत जाईल."

तेवढ्यात, शेजारून जाणाऱ्या एका ट्रकवर लिहिलेले वाक्य सोहमला दिसले. ट्रकवर लिहिले होते "मिलेंगे मिलेंगे". जणू काही "ख्वाजा गरीब नवाजच" सोहमला म्हणत होते "तू काळजी करू नकोस, आपण भेटणार आहोत.

सोहमने मनावर घेतले नाही. शेवटी, अजमेरला जाण्यासाठी कोणतेही वाहन उपलब्ध न झाल्यामुळे सोहम आणि त्याचा पार्टनर अहमदाबादच्या गाडीमध्ये बसले. जाताना सोहमला झोप लागली.

पण, जेव्हा सोहमला जाग आली तेव्हा "अहमदाबाद अजून किती लांब आहे?" हे पाहण्यासाठी सोहम काचेतून खाली पाहू लागला. रस्त्यावर असणाऱ्या बोर्ड पैकी एक त्याला दिसला. बोर्डवर लिहिले होते "अजमेर - ३०० किलोमीटर".

म्हणजे, इथून अजमेर जवळच होते. फक्त ३०० किलोमीटर. सोहमने रस्त्यातच उतरायचे ठरवले. सोहम गुजरात मधल्या पालमपूर या ठिकाणी उतरला. खिशात फक्त ८०० रुपये होते. एवढ्या ८०० रुपयात अजमेरला जाऊन, ख्वाजांचे दर्शन घेऊन, पुढे ब्रम्हदेवाचे, म्हणजेच पुष्करचे दर्शन घेऊन परत पुण्याला यायचे होते.

८०० रुपयात एवढे शक्य आहे का? नाही ना? पण, देवाची करणी आणि नारळात पाणी.

सोहमचा पार्टनर पुण्याकडे परत निघाला. सोहम मात्र अजमेरला निघाला. त्याला अजमेरला जाणारी बससुद्धा मिळाली.

पालमपूरवरून अजमेरला जाण्यासाठी २५० रुपये लागणार होते. आश्चर्य म्हणजे, कोणीही सोहमकडे तिकिटाचे पैसे मागायला आलेच नाही. अगदी फुकटात सोहम अजमेरला पोचला.

पुढे, अजमेरच्या ख्वाजांचे दर्शन झाल्यावर सोहमला पुष्करला जायचे होते. पण सरकारी बसेस बंद होत्या. पुष्करला जाणारी एकही गाडी नव्हती. सोहम पुन्हा ब्रम्हदेवाला म्हणाला "देवा, तू इथपर्यंत बोलावलेस. आता तूच काहीतरी सोय कर. तुझे दर्शन घ्यायचेच आहे."

पुन्हा आश्चर्य, एक पोलीसांची गाडी पुष्करलाच चालली होती. पुन्हा फुकटात काम झाले. दोन्ही दर्शन व्यवस्थित पार पडली.

आता पुण्याला रेल्वेनेच जावे लागणार होते. बसेस बंद होत्या. खिशात फक्त ३०० रुपये शिल्लक होते. रेल्वेने जायचे म्हणजे जनरल डब्ब्यात प्रवास करावा लागणार होता. मागे असेच एकदा, सोहम राजस्थानवरून येताना जनरल डब्ब्यात घुसला होता. तेव्हा १६ तास उभे राहावे लागले होते. आणि पुढे ५ दिवस सोहम हॉस्पिटलमध्ये होता. हा अनुभव काही फार जुना नसल्यामुळे सोहमला घरी पोचायची चिंता होतीच.

पण, या वेळेस बसायला जागा मिळण्याची शक्यता जास्त होती. कारण, राजस्थान मधून होळीच्या दिवसात कोणीच बाहेर पडत नाही. रेल्वे रिकामीच असू शकणार होती. तसेच झाले, सोहमला बसायलाच काय, तर अगदी ऐसपैस झोपायलासुद्धा जागा मिळाली. पुढे अहमदाबादपर्यंत, सोहम झोपूनच होता रेल्वेमध्ये.

देवाने सगळीच सोय करून ठेवली होती आधीपासून.

अश्याप्रकारे, ७ पैकी ६ वेळा अजमेरला जाणे झाले होते.

पण, लग्न झाले तसे घरात भांडण होऊ लागली. प्रत्येक घरी होते तसेच, सोहमसुद्धा मधल्यामध्ये पिचला जाऊ लागला.

सोहम आता जास्तीत जास्त नामस्मरण करण्यात गुंग राहू लागला होता. घरामध्ये तर सोहमने बोलणेच बंद केले होते. सोहम बोलला नाही, की दोन्हीकडून (आई आणि बायकोकडून) डोके आउट केले जात होते.

ऑफिसमध्ये सुद्धा सोहम चेहऱ्यावर टेन्शन घेऊनच वावरू लागला.

दरम्यान याच टेंशनमध्ये, सोहमचे ऑफिसमधल्या एका व्यक्तीसोबत भांडण झाले. ते थेटपणे सोहमला काहीच बोलले नाहीत. पण, सोहमला उद्देशून, त्याच्या शेजारी बसलेल्या व्यक्तीला म्हणाले "आधी चारित्र्यावर लागलेले डाग मिटव आणि मग भांड".

तर, आत्तापर्यंत सोहमला समजून आलेच होते "आपण परमात्म्याचा अंश आहोत." फक्त आपणच नाही, तर इतर सगळे देखील त्याचाच अंश आहात. फक्त मीच सोहम नाहीये. तुम्ही सगळे सुद्धा सोहमच आहात. तुमच्या शक्तीची जाणीव स्वत:ला करून द्या.

त्याच दिवशी सोहमने ठरवले "देव कलंकी बनून त्याच्यावर लागलेले कलंक मिटवेल".
"पण आपण काही देव नाही". "आपण उलटेच करायचे". "आपण निष्कलंक न बनता कलंकी बनायचे". "इतर कोणीही आपल्यावर कलंक लावण्यापेक्षा, आपणच स्वत:चे कॅरेक्टर जगासमोर ठेवायचे".

त्याच दिवशी तो माझ्याकडे प्रस्ताव घेऊन आला.

बाकी सगळे कलंक सोहमला मान्य होते. पण, जेव्हा सोहम त्या नकली मानसीला कॅरेक्टरलेस म्हणाला, त्यावेळची परिस्थिती समजून सांगण्यासाठी सोहमने ही गोष्ट लिहायची ठरवली. अजूनही काही गोष्टी होत्या, ज्या त्याला शब्दात व्यक्त करता नाही आल्या.

पुढे खरा देव कलंकी हा अवतार घेईल. देव म्हणजे, खरा देव बरं का..... सोहम सारखा नकली देव नाही. कलंकी अवतारात देव, त्याच्यावर लागलेले सगळे कलंक मिटवेल. ही गोष्ट म्हणजे फक्त नमुना होती.

**१९. सोहमने त्याच्या काही प्रिय व्यक्तींसाठी लिहिलेली पत्र (ही पत्र नक्की वाचा, मुख्य रहस्य या पत्रांमध्येच लपले आहे), शेवटचा धक्का.**

**१. माझ्या सर्व जुन्या गर्ल-फ्रेंड्स साठी......**

प्रिय मैत्रिणींनो,

जसे माझ्यामुळे तुमचे मन मोडले गेले. तसेच माझेही मन मोडले गेले. देव न्यायप्रिय आहे. जसे तुमच्याबरोबर घडले. तसेच, माझ्याबरोबरही घडले. माझे काय नुकसान झाले आहे, हे तुम्हालाही समजलेच असेल. चला, फिट्टम-फाट झाली की नाही?

चला, एक कर्ज उतरले माझ्यावरचे. (व.पु काळेंच्या "घर हारवलेली माणस" या पुस्तकाप्रमाणे).

**२. प्रिय पायल,**

तुझा ई-मेल, payuwilseeyou@......... चा अर्थ मला समजला होता. तसेच, मागे एकदा डिप्लोमाला असताना, मला तुझी मैत्रीण आवडते हे तुला समजल्यावर तू म्हणाली होतीस "तू माझ्याकडे आला नाहीस याचे मला फार वाईट वाटले". याचा अर्थही मला समजलाच होता. पण, थोडा उशिरा.

पायावर पाल पडली, त्याच दिवशी मी तुला प्रपोज केले होते.

मला नाकारण्याची, तुलाही संधी दिलीच की नाही देवाने? (हे विश्लेषण मी नंतर केले आहे. आधी नव्हे)

असो, अजून एक कर्ज उतरले माझ्यावरचे.

**३. प्रिय शायना,**

आयुष्यात तुझ्याबरोबर घालवलेले क्षण म्हणजेच, मी खरा होऊन जगलेले क्षण.

आज मी सांगू शकतो, मी एक्स्पर्ट नव्हतो. नाहीतर, आज मानसी माझ्यासोबत नसती का? तुझ्या वाक्याचा अर्थ थोडा नंतर समजला ग. पण, अर्थ समजल्यावर फार वाईट वाटले होते.

**४. सोहमने मला लिहिलेले पत्र:**

प्रिय सोहम पार्ट थ्री,

माणसाला तीन मन असतात. पहिले मन म्हणजे, नाण्याची पहिली बाजू. दुसरे मन म्हणजे, नाण्याची दुसरी बाजू. ही दोन्हीही मने अगदी एकमेकाविरुद्ध सांगतात. एक मन चांगले असते आणि दुसरे मन वाईट गोष्टींकडे प्रवृत्त करणारे असते. तर सोहम म्हणजे, असेच वाईट गोष्टींकडे प्रवृत्त करणारे मन. सोहम पार्ट टू म्हणजे चांगले मन.

**आणि तू म्हणजे, घडून गेलेल्या गोष्टींमागचे कारण शोधणारे, आणि तटस्थपणे सगळे पहात असणारे मन. गोष्टी घडून गेल्यावर, सगळ्या गोष्टींचे विश्लेषण करणारे मन.**

मागे तू म्हणाला होतास. जर सगळे देवाच्या इच्छेनेच घडते, तर आपण सगळे स्वर्गात किंवा नरकात का जातो?

आधी, सगळे देवाच्या इच्छेने कसे काय घडते? ते जरा समजून घेऊ:

तुझा जन्म झाल्यावर, साधारणपणे ४-५ वर्षांने मानसीचा जन्म झाला. आता, तुझी आणि मानसीची भेट घडण्यासाठी तू ४ वर्ष लेट व्हायला हवे होतेस. दहावीनंतर तू आधी कॉमर्स साईड निवडलीस. त्यात दोन वर्ष घालवलीस. डिप्लोमाला एक वर्ष नापास झालास. डिग्रीला एक वर्ष नापास झालास. तू शिक्षणात ४ वर्ष वाया घालवलीस. यानंतरच तू मानसीच्या वर्गात पोचू शकलास की नाही?

१. का तुझे गणित कच्चे होते?
२. का तुला अभ्यास करण्याची इच्छा होत नव्हती? तुला चार वर्ष वाया घालवायची होती, म्हणूनच ना?.

अजून एक गोष्ट सांगतो:

तुला म्हणे मुलगा झाला? कधी झाला? याच वेळेस का झाला तुला मुलगा?

कोणाच्या इच्छेने झाला?

मग होते की नाही सगळेच देवाच्या इच्छेने?

आणि राहिली गोष्ट स्वर्ग आणि नरकाची. आपल्या मनाची स्थिती म्हणजेच स्वर्ग आणि नर्क. देव आपल्याला वेळो वेळी चांगला मार्ग दाखवायचा प्रयत्न करत असतो. आपण वाईट मनाचे ऐकायचे की चांगल्या मनाचे ऐकायचे? हे आपणच ठरवायचे असते.

ज्या दिवशी तू पायलला प्रपोज केलेस, त्याच दिवशी तुझ्या पायावर पाल पडली होती की नाही? ऐकलेस का तू देवाचे? पुढे तू कसा अडचणीत सापडलास? तोच खरा नर्क.

पण, देव देव असतो. त्याच्याकडे नेहमीच प्लॅन ब असतो.

१. पायावर पाल पडल्यावर तू पायलला प्रपोज केले नसतेस, तर काय घडले असते?

- कदाचित, तुला मानसी भेटली असती. हा सगळा त्रास तुला झालाच नसता. तुला १५ सप्टेंबरलाच मुलगा झाला असता. आणि कदाचित, सगळे ९ ग्रह त्याच्या कुंडलीत उच्चेचे असल्यामुळे, तो देवाचा अवतार ठरला असता. गोष्ट संपली असती.

२. तू पायलला प्रपोज केल्यामुळे काय घडले?

- वर, सगळ्यांना लिहिलेल्या पत्रांप्रमाणे, तुझ्यावरचे सगळे कर्ज उतरले नाही का? फिट्टम फाट झाली की नाही? इथेच पापं केली आणि इथेच फेडली.

३. देवाच्या (रामाच्या) मनावर किती आघात झाले असतील?, सीतेच्या मनावर किती आघात झाले असतील? जेव्हा त्यांच्याच लोकांनी त्याला बेजार केले होते. हे देवाने तुझ्याकडूनच लिहून घेतले की नाही?

तूच नेहमी म्हणतोस "ज्यांच्या इच्छा, कर्म पूर्ण होतात, त्यांना देव मुक्ती किंवा पुढचा जन्म देतो, तुझ्या हातून हेच कर्म घडायचे होते" म्हणूनच तू वाचलास की नाही?

मारले की नाही देवाने एकाच दगडात ४-५ पक्षी?

**५. प्रिय मानसी,**

(तुला पत्र लिहील्याविना गोष्ट पूर्ण कशी होणार? आणि हे पत्र लिहिणे गरजेचे आहे. हे असे कसे पत्र लिहिले आहेस? असे तू म्हणशील. पण, कारण तुला कदाचित समजेल किंवा नाही. तसेच इतरांसाठी सुद्धा, ही गोष्ट फक्त माझ्या बाजूच्या विचारानुसार लिहिली होती. तुझ्या/तुमच्या  दृष्टीने गोष्ट वेगळी असू शकते. गोष्टीकडे गोष्ट म्हणूनच पहा. करमणूक म्हणून पहा. एखादा सिनेमा या दृष्टीकोनातून बनवला जाऊ शकतो असे मला वाटते. and, I care).

तर, प्रिय मानसी,

एक गोष्ट सांगतो, मी सोमनाथला चाललो होतो तेव्हाची. मी खिडकी शेजारीच बसलो होतो. विचार करता करता, राजकोट अजून किती लांब आहे? हे पाहण्यासाठी माझे मन पुढच्या ड्रायवरसमोरच्या खिडकीजवळ पोचले. राजकोट अजून १०० किलोमीटर लांब होते. कंटाळा आला म्हणून माझ्या मनाने परत माझ्या शरीरात यायचे ठरवले. जिथे माझे शरीर होते, तिथे माझ्या मनाने पाहिले.

आता, तिथे माझे शरीर नव्हतेच. तिथे तू दिसलीस. तू सुद्धा खिडकीतून बाहेर पाहून, राजकोट अजून किती लांब आहे? हे पाहण्याचा प्रयत्न करत होतीस. मी जिथे बसलो होतो, तिथे आता मी नव्हतोच. तूच होतीस. त्याच दिवशी मला समजले होते. तू माझ्यातच आहेस.

**ते सोड, तू जिवंत आहेस ना?**

असो, अजून एक गोष्ट सांगतो,

मी वाया गेलो, संमोहित झालो, राहुदेवांची माया मला सहन झाली नाही, अजूनही भरपूर काही विचित्र प्रकार आयुष्यात घडले. तू भेटलीस. पुढे कॅरेक्टर हे प्रकरण झाले. काही आत्मे माझ्याशी संपर्क साधू लागले. आम्हाला किती त्रास झाले हे सांगू लागले. याच्यातून देवाचा एक संकेत तुला समजला का?

रामालाही असेच टॉर्चर केले गेले होते. सीतेलाही असेच टॉर्चर केले गेले होते.

रामाला किती त्रास झाला होता, हेच तो माझ्याकडून लिहून घेत असावा. सीतामाईला किती त्रास झाला होता, हेच ती लिहून घेत असावी. महाराज म्हणतात त्याप्रमाणे, आपण देवाचे मशीन आहोत. मी तर फक्त माध्यम आहे. करता करविता तर रामच आहे.

तेही सोड, अजून एक महत्वाची गोष्ट सांगतो,

कालच मी सप्तशृंगीला आणि त्र्यंबकेश्वरला गेलो होतो (०२.११.२०१४). आज दिनांक ०३.११.२०१४, आज सोमवार आहे, प्रबोधिनी एकादशी आहे. गेले चार महिने निद्रिस्त असणारा श्री विष्णू आजच झोपेतून उठतो.

गेले कित्येक दिवस देवाचा काही संकेत मिळाला नव्हता. अचानक रामाने, त्याच्या स्टाईलने एक संकेत दिला. संकेत नेहमीप्रमाणेच होता.

नंतर मला आठवले.

मला, तुझा वाढदिवस कधी असतो तेही माहिती नाही. त्यामुळे अर्थातच, मला तुझी कुंडली बनवता आली नाही. त्यामुळे, तुझ्या आयुष्यात कधी कधी, कोणत्या घटना घडल्या असतील? याची सुद्धा मला काहीही माहिती नाही.

नोव्हेंबर २००८ ते इंजिनिअरिंगचा निकाल लागेपर्यंतच (ऑगस्ट २००९) तू माझ्यासमोर उपस्थित होतीस. इंजिनिअरिंगचा निकाल लागला. त्यानंतर तू कुठे होतीस? काय करत होतीस? हे ही माहिती नाही. आत्ता तू कुठे आहेस? कशी आहेस? काय करत आहेस? हे ही माहिती नाही.

पण, त्यावेळच्या (साधारणपणे, ऑगस्ट २००९ ते एप्रिल २०१०) परिस्थितीचा थोडासा अंदाज होता मला.

या काळातच, माझ्या अंदाजाप्रमाणे, तुझ्याकडून एक महत्वाचा निर्णय घेतला जाणार होता. ज्यामुळे, पुढे तुझ्या आई-वडिलांना धोका निर्माण होणार होता.

नेमके त्याच काळात कॅरेक्टर हे प्रकरण झाले. फक्त तुझ्या माझ्यातच नव्हे तर, आपल्याशी संबंधित इतरही नात्यांमध्ये काही गैरसमज निर्माण झाले. तू जो निर्णय घेणार होतीस, तो निर्णय तुला बदलावा लागला.

आता मला सांग. आत्ता तू कुठे आहेस? कशी आहेस? काय करतेस? गेल्या ५ वर्षात तुझ्या आयुष्यात काय काय घडले?

एव्हाना तुला अंदाज आलाच असेल, की देवाने तुझ्या नशिबात काय लिहिले होते.

तर मग तुला समजले का? का देवाने मला तुझ्या आयुष्यात पाठवले होते? तुला वाचवण्यासाठीच ना?

मी संमोहित होत होतो, हे फक्त देवाला माहिती होते. मग, त्याला वाटले असते तर त्याने मला संमोहित होऊच दिले नसते. पण, जेव्हा देवाला वाटले "मानसीने चुकीचा निर्णय घेण्याची वेळ आली आहे". तेव्हाच त्याने हे सगळे प्रकरण घडवले की नाही? (मला तर त्याकाळी माहितीसुद्धा नव्हत्या काही गोष्टी).

आता थोडे विश्लेषण तू सुद्धा कर... एकही शब्द खोटा असेल तर बोल... आई-वडिलांचे आयुष्य महत्वाचे होते की .....?

गेले २८ तास मी नुसता प्रवासच करत होतो. कारमध्ये जाताना सी.डी. प्लेयरवर एक गाणे ऐकले.

हेच गाणे मी गेले दोन दिवस गुणगुणत आहे.

सुख के सब साठी, दुख मे न कोय,
मेरे राम, मेरे राम,
तेरा नाम, इक सच्चा, दुजा न कोय.....

**ता.क.** कन्या ही रास संशयी नसते. विश्लेषक असते. नुकतीच साडे-साती संपली. साडे-साती संपता संपता, शनी महाराज माझ्या निर्दोष असण्याचा पुरावा देऊन गेले. धन्यवाद शनी महाराज. हे कर्ज घेऊन मरता सुद्धा आले नसते.

**(वाचकांनो: एक नम्र विनंती आहे. कृपया या गोष्टीची सत्यता पडताळण्याचा प्रयत्न करू नये. माझ्या व्यतिरिक्त, गोष्टीतल्या इतर पात्रांचा शोध घेण्याचा प्रयत्न करू नये. फक्त गोष्ट एन्जॉय करा. "इशारो को अगर समझो, राज को राज रहने दो". नाहीतर, गुरूंच्या क्रोधाचा सामना करावा लागेल).**

**६. प्रिय संमोहित करणाऱ्यांनो,**

प्रेमात पडतो, जो तो येता जाता,

पण सावरलो, संमोहित होता होता.....

मला आणि मानसीला लांब ठेवायचा तुम्ही भरपूर प्रयत्न केला होतात. आम्ही एकमेकांशी कोणत्याही प्रकारे संपर्क साधू नये म्हणून तुम्ही प्रत्येक बंदोबस्त करून ठेवला होतात. पण दर वेळेस, जेव्हा तुम्ही प्रयत्न करत होतात, तेव्हा आम्ही अजूनच जवळ येत होतो. आज ती माझ्यातच आहे. का मी तिच्या बाकावर लिहिले होते? का तिने दर वेळेस माझ्यासोबत वेगळ्या वेगळ्या प्रकारे संपर्क साधला?

तुम्हाला नाही समजणार. ही देवाचीच करणी होती.

**७. प्रिय सलमान खान,**

तू एकदा मला मदत केली होतीस. "अब मेरी बारी". तू वयाने माझ्यापेक्षा मोठा आहेस. पण, अजूनही माझ्यापेक्षा खूपच तरुण वाटतोस. म्हणून तुला "आप, तुम्ही" वगैरे म्हणत नाही. "तू" कसे बरे वाटते, अगदी मित्रासारखे.

तू माझ्या आयुष्यात कसा आलास? हे अजूनही या गोष्टीत लिहिलेले नाही. गोष्ट पूर्ण करावीशी वाटली म्हणून करून टाकली.

ते जाउदे,

तुझे पूर्ण नाव आहे - "abdul rashid salim salman khan (अब्दुल रशीद सलीम सलमान खान)" किंवा मराठी प्रमाणे " salman salim khan (सलमान सलीम खान)"

a = 1

b = 2

d = 4

u = 21 = 2+1 = 3

l = 12 = 1+2 = 3

r = 18 = 1+8 = 9

a = 1

s = 19 = 1+9 = 10 = 1 + 0 = 1

h = 8

i = 9

d = 4

s = 19 = 1+9 = 10 = 1 + 0 = 1

a = 1

l = 12 = 1+2 = 3

i = 9

m = 13 = 1+3 = 4

s = 19 = 1+9 = 10 = 1 + 0 = 1

a = 1

l = 12 = 1+2 = 3

m = 13 = 1+3 = 4

a = 1

n = 14 = 1 + 4 = 5

k = 11 = 1+1 = 2

h = 8

a = 1

n = 14 = 1+4 = 5

abdul rashid salim salman khan = 1+2+4+3+3+9+1+1+8+9+4+1+1+3+9+4+1+1+3+4+1+5+2+8+1+5 = 94 = 9+4 = 13.

मराठी नावाप्रमाणे - salman salim khan.

s = 19 = 1+9 = 10 = 1 + 0 = 1

a = 1

l = 12 = 1+2 = 3

m = 13 = 1+3 = 4

a = 1

n = 14 = 1 + 4 = 5

s = 19 = 1+9 = 10 = 1 + 0 = 1

a = 1

l = 12 = 1+2 = 3

i = 9

m = 13 = 1+3 = 4

k = 11 = 1+1 = 2

h = 8

a = 1

n = 14 = 1+4 = 5

salman salim khan = १+१+३+४+१+५+१+१+३+९+४+2+8+1+5 = 49 = 4+9 = 13.

माणसासाठी तू भरपूर केलेस. थोडी मदत प्राण्यांना करून बघ. देव तुला विसरणार नाही. असो, मी म्हणालो होतो ना? तुझ्यात आणि माझ्यात काहीतरी आत्मिक संबंध आहे? तुझा जन्म

एका महान कामासाठी झाला आहे. तुझे लग्न मेष आहे. मंगळदेव, तुझ्या कुंडलीत दशम स्थानी, म्हणजेच मकर राशीत उच्चेचे आहेत. शनी महाराज सुद्धा, एकादश स्थानी म्हणजे कुंभेत आणि स्वगृही आहेत.

देवाच्या कृपेने, तू कोणत्या कामासाठी जन्माला आला आहेस, हे तुला लवकरच समजेल.

**८. प्रिय आईस,**

तू काळजी करणे सोडून दे. आठवतंय का ? मी मागे राम बनून तुला आणि बाबांना आशीर्वाद दिला होता "तुम्हाला पुन्हा जन्म घेणे नाही". मी पुन्हा १६ सोमवार करतोय, ते तुम्हाला मुक्ती मिळावी म्हणूनच (अर्थातच, देवच हे करून घेत आहे). पहिल्यांदा त्याने १६ सोमवार करून घेतले, तेव्हा त्याच्याकडे काहीच मागितले नव्हते. पण, मनातली इच्छा ओळखूनच त्याने त्याने मला बाप बनवले.

**९. प्रिय गुरुजनांनो,**

लहानपणापासून पाठीवर हात ठेवल्याबद्दल धन्यवाद. तुमचे अनंत उपकार आहेत. तुम्ही नेहमी देत होतात. घेणाऱ्यालाच समजत नव्हते. परीक्षक, म्हणजेच देव काय विचारेल? हे तुम्ही व्यवस्थित शिकवलेत. पण, तुम्हीच देव होता, नाही का?

जास्त काही लिहित नाहीत. फक्त भावना समजून घ्या.

**१०. प्रिय साई बाबा,**

कालच दसरा होता. कालच तुमचे दर्शन घडले. दर्शन घेताना, शेजारीच एक गाण्याचा कार्यक्रम सुरु होता. गाणे लागले होते "जब कोई नाही आता, मेरे साई आते है.... मेरे दुख के दिनो मे वो, बडे काम आते है. अंगावर काटा आला होता गाणे ऐकताना. खरेच, मी संकटात पडलो होतो तेव्हा, सगळयात पहिल्यांदा, मंडलेश्वरवरून परत येताना तुमचेच दर्शन घडले होते. तुम्ही मला असे काही सावरून घेतले, की बास.

धन्यवाद,

**११. प्रिय सूर्य महाराज, चंद्र महाराज, मंगळ महाराज, बुध महाराज, गुरु महाराज, शुक्र महाराज, शनी महाराज, राहू महाराज, केतू महाराज, हर्शल महाराज, नेपच्यून महाराज आणि प्लुटो महाराज.**

बास एवढेच म्हणतो, तुम्हीच सगळे माझे माय-बाप.....

**१२. या कथेतल्या प्रत्येक पात्रासाठी:**

प्रिय कथेतल्या पात्रांनो,

तुम्ही सगळेच, या कथेत महत्वाचा भाग आहात. तुमच्यामुळेच मला ही गोष्ट लिहिण्याची बुद्धी झाली. तुम्ही सगळे देवच आहात. जाणून बुझून मला त्रास देण्याचे नाटक केलेत. आणि मला ही गोष्ट लिहायला लावलीत.

देवानेच सगळे घडवून घेतले.

**१३. मला मदत करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीसाठी,**

तुम्ही केलेली मदत, मी विसरणार नाही.

**१४. प्रिय देवा,**

आजच प्रबोधिनी एकादशी आहे. तू आजच झोपेतून उठला असशील. आजचाच दिवस निवडतो तुझ्याशी काही बोलण्यासाठी. बाबा रे, राम बनणे फार कठीण काम आहे. माझे वागणे तुझ्यासारखे नव्हतेच कधी. असेही, मी राम बनलो, तर तुझ्याकडून एखादी गोष्ट मागून घेण्याचा आनंद मला मिळणार नाही. तुझ्याकडे काहीही मागायला फार मजा येते रे. तू जसा पुरुषोत्तम आहेस, तसेच तू जे काही देतोस, ते सर्वोत्तमच असते. तेच जर माझे मी मिळवले, तर ते सर्वोत्तम नसेल. तू देशील तेच सर्वोत्तम.

देवा, मुलगा दिलास. त्याला तुझ्या सेवेत घे. त्याच्याकडून देशसेवा करून घे. त्याला प्राणीमात्रांवर प्रेम करणारा होऊ दे. त्याला तुलाच अर्पण करतो. आत्ता मनात ज्या भावना येत आहेत, त्या तुझ्यापेक्षा चांगले कोण समजणार? तुला सगळे कळते.

मला नव्हे तर सर्वांनाच,

१. आम्हाला, तुझ्या वामन अवताराचा अर्थ सुद्धा समजाव.

तू वामन अवतारात, बळी राजाकडून पृथ्वी मिळवून माणसांना दिलीस. पण आता, आम्ही माणसेच राक्षस झालो आहोत. आम्ही प्राण्यांना, पक्ष्यांना, राहण्यासाठी जागाच सोडली नाहीये रे. आमच्यामध्ये, तुझा वामन अवतार जागा होऊ दे. जमेल तेवढी जमीन, आम्हाला प्राण्यांसाठी ठेवायची बुद्धी दे.

२. आम्हाला, तुझ्या कूर्म अवताराचा अर्थ समाजाव,

थोडासा, गरीबांच्या, पक्ष्यांच्या, प्राण्यांच्या जेवणाचा भार आम्हाला सोसण्याची बुद्धी दे.

३. आम्हाला, तुझ्या मत्स्य अवताराचा अर्थ समजाव.

तू जसे ऋषी-मुनींना मत्स्य अवतारात वाचवलेस. तसेच आम्हालासुद्धा, प्राणी, पक्ष्यांना वाचवण्याची बुद्धी दे. लोकांना शाकाहारी बनण्याची बुद्धी दे.

४. आम्हाला, तुझ्या वराह अवताराचा अर्थ समाजाव.

तू जसे, पृथ्वी चोरून नेणाऱ्या हिरण्याक्ष राक्षसाचा वध करून ही पृथ्वी वाचवलीस. तसेच आम्हालासुद्धा, प्राणी, पक्ष्यांसाठी पृथ्वी शिल्लक ठेवण्याची बुद्धी दे.

५. आम्हाला, तुझ्या नरसिंह अवताराचा अर्थ समाजाव.

प्राण्यांवर अन्याय करणाऱ्यांविरुद्ध भांडायची ताकत दे, बुद्धी दे.

६. बुद्धी दे याचाच अर्थ, की बुद्धाचा अवतार समाजाव.

**हेच आमचे खरे दशावतार.**

डोळयातून येणाऱ्या पाण्याचा अर्थ.....
तुला चांगलाच समजतो?
पुन्हा एकदा माफी मागतो आणि,
गोष्ट इथेच संपवतो....

तू सांगितल्याप्रमाणे ही गोष्ट सुद्धा तुलाच अर्पण करतो. मी कर्ता नव्हतोच कधी. पुढे तूच सांभाळून घे. म्हणजे, मी फेका मारायला मोकळा. करतोस तू आणि नाव माझे होते.

**ताजा कलम:** देवा, कर्ज फिटत आलंय रे. मी तयार आहे सोबत यायला.

**!! ओम तत्सत श्रीकृष्णार्पणमस्तु !!.**

**अजून एक ताजा कलम:** वरची पत्र लिहून झाली होती. देवाकडे भरपूर मागण्या केल्या होत्या. लिहून लिहून कंटाळा आला होता. "कम्प्युटर बंद करून थोडा वेळ टीव्ही वर क्रिकेट सामन्याचा आनंद घ्यावा" म्हणून रिमोट शोधत होतो. रिमोट, टी-पॉय वर एका पेपरवर ठेवलेले होते. मी रिमोट उचलले आणि, खाली पेपरवर मोठ्या अक्षरात, साडीच्या दुकानाची जाहिरात होती. दुकानाचे नाव होते "तथास्तु". आता, देवाने नक्की कोणत्या मागणीसाठी तथास्तु म्हणले आहे? हे समजले की सांगतो.

**!! ओम तत्सत श्रीकृष्णार्पणमस्तु !!.**

**अजूनही काही:** गुरु नानक हे मोठे गुरु म्हणून ओळखले जातात. त्यांना त्यांच्या आयुष्याची दिशा

"१३" या आकड्यातूनच सापडली होती. "१३" म्हणजे तेरा. तेरा म्हणजे तुझे. तू म्हणजे देव. तेरा म्हणजे देवाचे. तर, गुरु नानक सांगून गेले आहेत. सगळे त्यालाच अर्पण करा. हे मला कधी समजले असेल? ६ नोव्हेंबर २०१४ रोजी. हो, आज गुरु नानक जयंती होती. आजच गुरु नानकांची सुद्धा एन्ट्री झाली आयुष्यात.

**शेवटचा धक्का:** आपण जेव्हा तिरुपती वरून तिरुमला येथे चालत जातो तेव्हा, ज्या पायरीवर आपल्याला फुकट दर्शनाचा पास दिला जातो त्या पायरीचा क्रमांक आहे - २०८३ आणि तसेच, शेवटच्या पायरीचा क्रमांक आहे - ३५५०. ३५५० = ३+५+५+०= १३ आणि २०८३ = २+०+८+३ = १३ (पहा जाऊन). काही जण म्हणतात, १३ हा आकडा संघर्षाचा आहे, कदाचीत खरे असावे, ३५५० पायऱ्या चढून



जाणे हा काही छोटा संघर्ष नाही.




आणि, स्वामी समर्थांची पुण्यतिथी कधी असते माहिती आहे? त्रयोदशीच्या दिवशीच.

माझे नाव काहीही असो. पण, माझे नाव संदेश नक्कीच नव्हते. पण, लहानपणी मी आई-बाबांना म्हणायचो "मला संदेश म्हणा". या मागे काय कारण होते? ते कालपर्यंत मला माहिती नव्हते. पण आज माहिती आहे. पुस्तकाचे पूर्ण नाव काय आहे? "सोहम - एक संदेशवाहक"

**ताजी परिस्थिती:** देवाच्या कृपेने सगळे आजार दूर झाले. एव्हाना अजमेर आणि पुष्करच्या ८

वाऱ्या तसेच, बालाजीचे १३-१४ वेळा दर्शन घडले आहे. बिझनेस करण्यासाठी गेले एक वर्ष नोकरी सोडून प्रयत्न चालूच होते. परंतु अद्याप यश मिळालेले नाही. कमी असणारा आत्मविश्वास अजूनच कमी झालेला आहे. तसेच, जन्मत:च भटका स्वभाव असल्यामुळे घरात मन लागत नाही. यात देवाचीच काहीतरी योजना असणार. समजली की सांगतो.

इतरही संकटे आहेत समोर. वाचलो तर नवीन पुस्तकात कळवेलच.

**चूक भूल द्यावी घ्यावी.**

**!! ओम तत्सत श्रीकृष्णार्पणमस्तु !!**